# काळे ढग

( स्वतंत्र सामाजिक कादंबरी )



लेखक

प्रा. विष्णु बापूजी आंबेकर, एम्. ए.

मराठीचे प्राध्यापक—खालसा कॉलेज, मुंबई.

सोल एजन्ट—

महाराष्ट्र ग्रंथ भांडार मुंबई नं. ४

२॥ रुपये.

प्रकाशक—व्ही. व्ही. पटवर्धन
फलॅंडर प्रेस, दादर, मुंबई.



लेखनकाल:— १८ फेब्रुवारी १९३९ ते ४ जानेवारी १९४०



मुद्रक—व्ही. व्ही. पटवर्धन
ज्योत्स्ना कार्यालय, मुंबई. ४

[ या कादंबरींतील पात्रें, प्रसंग व घटना हीं सर्वस्वीं काल्पनिक असून महाराष्ट्रांतील मृत किंवा विद्यमान् व्यक्तींशीं त्यांचा कोणत्याहि प्रकारें संबंध नाहीं. ]

माझ्यावर पितृतुल्य प्रेम करणारे

माझे चुलते

ती. दत्तात्रय वासुदेव ऊर्फ आबासाहेब आंबेकर,

( सदस्य-भारतसेवकसमाज, पुणें )

यांस

आदरपूर्वक अर्पण.

वि. बा. आंबेकर.

# अनुक्रमणिका

# परिचय

माझे स्नेही प्रो. विष्णुपंत आंबेकर यांच्या या पहिल्याच कादंबरीचा पुरस्कार करतांना मला विशेष समाधान होत आहे. त्यांचे मार्मिक टीकालेख आणि मोजक्याच पण गुणपूर्ण गोष्टी यांच्यामुळें आमच्या मागून येत असलेल्या तिशीच्या आंत बाहेरील पिढींत त्यांनीं प्रमुख आणि विशिष्ट स्थान संपादन केलें असून, मराठी वाचकवर्गाला ते अर्थातच सुपरिचित आहेत. त्या दृष्टींनें त्यांच्या या ललितकृतीची सुद्धां ओळख करून देण्याची कांहीं आवश्यकता नाहीं. अशा स्थितींत, आपल्या कादंबरीला माझी प्रस्तावना घेण्याची गरज त्यांना वाटावी याला एक कारण जसें शालीनता हें संभवतें, तसेंच दुसरें बलवत्तर कारण जुना ऋणानुबंध दृढ करण्याची इच्छा हेंहि बहुधा असावें. त्यांचे वडील कै. बापुराव आंबेकर यांचा माझ्यावर फार लोभ होता. त्याचें स्मरण मनांत ठेवूनच त्यांनीं माझी प्रस्तावना मागितली असावी; व मीही त्यांच्या पित्याच्या न फिटणाऱ्या ऋणाच्या जाणीवेनेंच हें अनवश्यक कर्तव्य करीत आहें.

प्रो. आंबेकर यांच्या बुद्धीचा आणि लेखनकलेचा विकास ते विद्यार्थिदशेंत असल्यापासून मी आत्मीयतेनें पहात असून त्यांच्या चपल लेखणीचे आघातही मी कौतुकानें सोसले आहेत. "प्रवर्तितो दीप इव प्रदीपात्" या सुभाषिताची सार्थकता महाराष्ट्रांत फार विरळ प्रत्ययाला येते. पण प्रो. आंबेकर हे आपल्या वडिलांच्या तालमींत तयार झाले असून, वृत्तपत्रव्यवसायाच्या शाळेंत त्यांनीं लेखनकलेचें शिक्षण घेतलेलें आहे. त्यांच्या वडिलांचें मनुष्यस्वभावाचें अवलोकन आणि आकलन

हीं दोन्हीही अत्यंत मार्मिक असत. कै. हरिभाऊ आपटे यांच्या आठवणींचें जें सुंदर पुस्तक कै. बापुराव यांनीं लिहिलें आहे, त्यांत त्यांची ही मार्मिकता छान अनुभवाला येते. बापुरावांचें स्वतांचें मित्रमंडळ अतिशय मोठें असून, त्यांत पुण्यांतील अनेक बड्या व्यक्ती मोडत असत. ते मोठे चतुर आणि बहुश्रुत संभाषक ( conversationalist ) असल्यामुळें रोज सकाळ संध्याकाळ त्यांच्या घरीं स्नेहीमंडळीचा रमणा भरलेला असावयाचा. त्यावेळीं विद्यार्थिदशेंत असलेले टपोऱ्या डोळ्यांचे शालीन पण चाणाक्ष विष्णुपंत या रमण्यामध्यें एका कोपऱ्यांत बसून निमूटपणें श्रवणभक्ति करीत असलेले पुष्कळदां दृष्टीस पडत !

आपल्या बहुश्रुत वडिलांच्या बैठकींत अनेक वर्षें केलेली ही श्रवणभक्ति प्रो. आंबेकर यांनीं प्रस्तुत कादंबरींत मोठ्या मार्मिकपणानें कामीं लावलेली दिसते. पंधराव्या आणि सोळाव्या प्रकरणांत शिरीषकुमारांच्या आजोबांच्या आणि वडलांच्या ज्या आठवणी दिलेल्या आहेत, त्या वाचीत असतांना मला कै. बापूरावांच्या तोंडून ऐकलेल्या कांहीं आख्यायिकांची आठवण झाली; व एक दोन पात्रांचे तोंडवळेही साधारण ओळखीचे वाटले. कै. बापूरावांच्या लिहिण्यांत एक प्रकारचा बोंचक उपरोध असे. त्याचाही आढळ या कादंबरींतील स्वभाववर्णनामध्यें मधून मधून होतो. वर्तमानपत्राच्या कचेरींत लेखनकलेचें शिक्षण घेतलेल्या कलमबहाद्दराच्या लिखाणांत गति, सुबोधता, युक्तिवाद आणि कोणताही विचार वा कल्पना व्यवहारांतल्या समर्पक उपमा-दृष्टांतांनीं विशद करून सांगण्याची हातोटी हे गुण अपरिहार्यतेनें येत असतात. आपण अगदीं सामान्य वाचकांसाठीं लिहीत आहों या जाणीवेनें वृत्तव्यवसायांतील लेखक सुगमतेइतकेंच लक्ष रंजकतेकडे पुरवितो, आणि उपमा-दृष्टांत मुद्दाम तपशीलवार उकलून सांगतो. कै. हरिभाऊ आपटे यांच्या कादंबऱ्यांत हे सारे गुण एकवटलेले असल्यामुळेंच त्या इतक्या प्रसन्न, चित्ताकर्षक आणि लोकप्रिय झाल्या. प्रो. आंबेकर यांच्या प्रस्तुत कादंबरींतही हे सारे गुण निदर्श-

नाला येत असून, शिवाय त्या गुणांतून उद्भवणारा एक स्वाभाविक दोष जो पाल्हाळिकपणा तो मात्र तींत सहसा दृष्टींस पडत नाहीं. अलीकडील मराठी कादंबऱ्यांप्रमाणें या कादंबरींतही प्रचलित राजकारणाची चर्चा आणि चित्रण आलेलें आहे. पण कादंबरीच्या मुख्य कथानकाला राजकीय चळवळीचे संक्षिप्त वृत्तांत मधून मधून जोडून देऊन किंवा वादविवादांचीं पल्लेदार प्रकरणें घालून प्रो. आंबेकर यांनीं तींत राजकारण आणलेलें नाहीं; तर कादंबरींतील पात्रांचें सारें जीवनच मुळीं प्रचलित राजकीय संघर्षामुळें उध्वस्त झालें असल्याचें दाखवून, त्यांतील बऱ्यावाईट घटनांच्या अनुरोधानें निरनिराळ्या विचारप्रणालींचें मार्मिक विश्लेषण त्यांनीं केलें आहे.

त्या दृष्टीनें या कादंबरीचा नायक शिरीषकुमार आणि नायिका नीरा यांचीं प्रो. आंबेकर यांनीं रेखाटलेलीं स्वभावचित्रें प्रातिनिधिक आणि विचारप्रेरक आहेत. राष्ट्रीय सभेच्या चळवळीला पं. नेहरू यांच्या प्रेरणेनें युवक संघाची जोड मिळाल्यापासून तरुण विद्यार्थिवर्ग राजकारणांत प्रतिष्ठितपणानें भाग घेऊं लागला; व या संघाचे तरुण पुढारी हे आपल्या कॉलेजांतील सहाध्यायिनींच्या आकर्षणाचे साहजिकच विषय होऊन बसले. तारुण्याच्या सुरवातीला एक असा उत्तेजक काळ येऊन जातो कीं, त्या वेळीं भावनासुलभ मानवी मनाला धाडसी आणि उदात्त कल्पनांशीं खेळकरपणानें चाळे करण्यांत ( flirt ) मोठी मजा वाटते. देशांतील प्रत्येक मोठ्या आंदोलनांत, लाटेवर हेलकावणाऱ्या हसऱ्या फेसाप्रमाणें तरुण विद्यार्थी जे उत्शृंखलपणानें आघाडीला हुंदडतांना दृष्टीस पडतात, ते याच कारणामुळें. राजकीय चळवळीचा खडतर जीवनक्रम कायमचा पतकरण्याइतकी धडाडी किंवा चिकाटी यांपैकीं थोड्याच विद्यार्थ्यांच्या ठिकाणीं असते. प्रक्षोभक चळवळी आणि उच्च तत्त्वें यांच्याशीं कांहीं वेळ खेळल्यानंतर पहिल्याच दमछाकीला बहुतेक तरुण संसाराच्या सरळ चाकोरीला लागतात ! प्रस्तुत कादंबरीचा नायक शिरीषकुमार हा या

सामान्य नियमाला अपवाद असून, विद्यार्थिदशेंत अंगीकारिलेल्या त्यागमय जीवनाला तो मोठ्या ईर्ष्येनें चिकटून राहातो. या त्याच्या ध्येयासक्तींत आनुवांशिकतेचा प्रभाव किती होता, याची कल्पना, त्याचे आजोबा आणि आईबाप यांच्या ज्या अत्यंत हृदयंगम आठवणी प्रो. आंबेकर यांनीं दिल्या आहेत, त्यांवरून येते. तथापि नीरेचा प्रणय आणि त्याच्यापासून होणारे निरनिराळया प्रकारचे लाभ झिडकारण्यांत मनाचा जो निग्रह आणि करारीपणा शिरीषकुमारानें दाखविला आहे, तो मात्र खरोखरीच लोकोत्तर वाटतो.

नायिका नीरा ही अगदीं भिन्न वृत्तीची आहे. स्त्री ही स्वभावतःच प्रभावपूजक असते; व म्हणून अध्यात्मांत काय, साहित्यांत काय, शिपाईगिरींत काय किंवा राजकारणांत काय, आपले प्रभावित्व प्रकट करणाऱ्या महात्म्यांवर आणि महापुरुषांवर लुब्ध होणाऱ्या स्त्रियांचा मोठा वर्ग समाजांत आढळतो ! नीरा ही याच कोटींतील मुलगी होती. शिरीषकुमारावरील तिचें अखेर सफल न झालेलें प्रेम हा अलीकडील तरुण विद्यार्थिनींत दिसून येणाऱ्या प्रभावपूजनाच्या प्रवृत्तीचाच एक प्रकार आहे. तारुण्यांतील उमेदीचा बहर निरनिराळया प्रक्षोभक चळवळी आणि त्यांत अग्रभागीं चमकणारे कर्तबगार पुरुष यांच्या सान्निध्यांत घालवून अंगांतील उसळत्या रक्ताचा उन्माद शमल्यावर संपत्ति आणि स्वास्थ्य यांचा लाभ करून देणाऱ्या जोडीदाराबरोबर नंतर स्थायिक होणाऱ्या अलीकडील पदवीधारिका याच वर्गांत मोडतील. शिरीषकुमाराबरोबर कष्टमय जिणें कंठण्याचें धैर्य नीरेला न व्हावयास तिचे आनुवांशिक संस्कार कारण झाल्याचें प्रो. आंबेकर यांनीं मार्मिकपणें दर्शित केलें आहे. पण, त्यामुळें तिच्या वर्तनाचें समर्थन होतें, असें मात्र नाहीं. उलट, शिरीषकुमार हा जसा ध्येयासाठीं स्वतःच्या जीविताचें मातेरें करून घेणाऱ्या आगरकरांच्या कोटींतील विरळ कार्यकर्त्यांचा प्रतिनिधि वाटतो, तशीच नीरा ही त्यागी राजकीय जिवनांतील धाडसाची मजा कांहीं दिवस अनुभवून नंतर

निष्प्रेम पण स्वास्थ्यसंपन्न आयुष्यक्रम पतकरणाऱ्या आधुनिक सुशिक्षित तरुणींची प्रतिनिधि आहे. प्रो. आंबेकर यांनीं या दोन पात्रांचा जीवन-विकास उत्कृष्ट रीतीनें चित्रित केला असून, कादंबरींतील सारा रससंघर्ष त्या पात्रांच्या विरोधी भावनांच्या आंदोलनांतून उत्पन्न झाला आहे. प्रमिला आणि आनंदकर ही दुय्यम पात्रांची जोडी अलीकडे उद्भव-लेल्या कांहीं नाजुक सामाजिक प्रश्नांची गुंतागुंत वाचकांना खुबीनें उकलून दाखविते. सारांश, प्रणय आणि राजकारण यांच्या रंगभरणामुळें जरी या कादंबरींत रसचमत्कृति उत्पन्न झाली असली, तरी तिचें खरें नावीन्य आणि उद्बोधनक्षमता तरुण पिढीच्या जीवनाचे कांहीं ठळक विशेष विशद आणि विश्लेषित करण्यांत दाखविलेल्या कौशल्यामध्यें आहे.

रचनेच्या दृष्टीनें या कादंबरीचा अत्यंत आल्हाददायक विशेष सांगावयाचा झाला, तर तो तिच्यांतील समर्पक आणि बव्हंशीं नवीन उपमा-दृष्टांत हा सांगतां येईल. प्रो. आंबेकर यांची कल्पकता आणि सूक्ष्म निरीक्षण यांचा मोठा मनोहर मिलाफ त्यांच्या उपमा-दृष्टांतांतून झालेला आढळतो. केवळ कल्पनातरंगांनीं नटलेले व सुभाषित किंवा अर्थान्तरन्यास यांच्यासारखे ठाशीव पण सामान्य वाचकाला दुर्बोध वाटणारे असे त्यांचे उपमा-दृष्टांत नाहींत. व्यवहारांतल्या अगदीं रोजच्या बघण्यांतल्या गोष्टींवरून सुचलेले आणि मार्मिकतेनें विशद केलेले असें त्यांचे अर्थालंकार आहेत. त्यामुळें त्यांची लेखनशैली अलंकृत असूनही तिच्या सुगमतेला बाध आलेला नाहीं.

रचनेचा आणखी एक स्पृहणीय विशेष हा कीं, सांचेबंद कादंबऱ्यांप्रमाणें रेखीवपणावर फाजील भर न देतां प्रो. आंबेकर यांनीं जीवनाची स्वाभाविकता दाखविण्याकडे जास्त लक्ष पुरविलें आहे. जीवन हें जसें प्रवाही, विसंगत, विस्कळित आणि गूढ असतें, तसा त्याचा आविष्कार या कादंबरींत पाहावयाला मिळतो. अलीकडच्या तंत्रबद्ध कलाकृतींच्या कृत्रिमतेला कंटाळलेल्या वाचकांना प्रो. आंबेकर यांच्या कादंबरीचें हें किंचित् सैल पण स्वभावरम्य स्वरूप निस्संशय आवडेल.

प्रस्तुत कादंबरीच्या सरस अंतरंगाची ओळख व्हावयाला एवढा परिचय पुरा आहे. प्रो. आंबेकर यांची ही जरी पहिलीच कादंबरी असली, तरी ज्या संयमानें, कौशल्यानें आणि जिव्हाळ्यानें त्यांनीं ती लिहिली आहे, ते त्यांचें गुण लक्षांत घेतां मराठी साहित्याच्या या शाखेंतही त्यांना विशिष्ट स्थान आणि यश मिळेल अशी मला खात्री वाटते. विराट् घडामोडींच्या या युगांत प्रक्षुब्ध आणि उध्वस्त अशा समाजजीवनाचें विस्तृत आणि सूक्ष्म चित्रण करणारें कथावाङ्मय जास्त लोकप्रिय व्हावें, हें अगदीं साहजिक आहे; व म्हणूनच महाराष्ट्रांत आज कादंबरीलेखन हें साहित्यक्षेत्रांतील, कर्तृत्व आणि यश यांची कसोटी ठरून गेल्यासारखें दिसतें. त्या कसोटीला उतरण्यासारखी गुणसंपदा प्रो. आंबेकर यांच्या या प्रथम कृतींत दृष्टीस पडते, यांत शंका नाहीं.

शांतानिवास, नागपूर
२२-१-१९४० } ग. त्र्यं. माडखोलकर

# निवेदन

१९३९ सालीं 'ज्योत्स्नें'त क्रमशः सुरू झालेली ही माझी पहिलीच कादंबरी आज वाचकांच्या हातांत पुस्तकरूपानें देतांना मला अतिशय आनंद होत आहे.

प्रस्तुत कादंबरी माझ्यावर अकारण लोभ ठेवणारे माझे ज्येष्ठ स्नेही सुप्रसिद्ध साहित्यिक श्री. विष्णु सखाराम ऊर्फ भाऊसाहेब खांडेकर यांनीं आपल्या प्रेमळ आग्रहाची सक्ति करून लिहून घेतली नसती, तर कदाचित् मीहि इतक्या तांतडीनें ती लिहून हातावेगळी केली नसती. श्री. खांडेकर यांच्याप्रमाणेंच ज्योत्स्नेचे चालक श्री. ग. वि. पटवर्धन यांनीं प्रत्येक अंकाला मजकडून कादंबरीचा मजकूर लिहवून घेण्यांत जी आस्था दाखविली तिच्यामुळेंहि या कादंबरीचें लेखन झपाट्यानें होऊं शकलें. या त्यांच्या आस्थेबद्दल त्यांचे आभार मानणें हें माझे कर्तव्य आहे. त्याचप्रमाणें प्रसिद्ध टीकाकार व कादंबरीकार श्री. ग. त्र्यं. माडखोलकर यांनीं या कादंबरीला परिचय लिहून देऊन जुनें ऋणानुबंध अधिक दृढ करण्याची संधि मला दिली त्याबद्दल त्यांचाहि मी ' ऋणी ' आहे. माझे मित्र श्री. वा. रा. ढवळे यांनीं या पुस्तकाची आकर्षकता वाढावी म्हणून माझ्यापेक्षांहि अधिक श्रम घेतले आहेत; पण केवळ आभार मानण्याइतके श्री. ढवळे यांचें व माझे संबंध अगदींच औपचारिक नाहींत, म्हणून त्यांचें हें ऋण तसेंच राखण्यांत मी आनंद मानतो ! त्याचप्रमाणें छापखान्यांतील कामगार व श्री. दलाल आणि श्री. प्र. भि. चिटणीस हे कलावंत स्नेहीहि या पुस्तकाच्या सजावटीच्या कामीं उपयोगी पडले आहेत, त्यांच्याबद्दल मी कृतज्ञ आहें. ही

कादंबरी कोणत्याहि विशेष हेतूनें लिहिलेली नाहीं. समाजांतील कांहीं प्रचलित प्रश्नांचा विचार करून त्यांच्याबद्दल जें कांहीं वाटलें तें केवळ जिव्हाळयानें आणि मनःपूर्वक लिहून दाखविण्याचा हा एक नम्र प्रयत्न आहे. ज्योत्स्नेंतून ही कादंबरी क्रमशः प्रकाशित होत असतांना अनेक वाचकांनीं तिच्याबद्दल गुणग्रहणपर उद्गार काढले आहेत. त्यावरून इतर वाचकांनाहि हा प्रयत्न प्रोत्साहनार्ह वाटेल अशी आशा बाळगावयास हरकत दिसत नाहीं.

खालसा कॉलेज, मुंबई १९
ता. २८ जानेवारी १९४०

**विष्णु बापूजी आंबेकर.**

# काळे ढग

## प्रकरण पहिलें

### घराबाहेर पाऊल टाकलें !

गाडीच्या भरधांव वेगाबरोबर स्पर्धा करणाऱ्या तिच्या क्षुब्ध अन्तकरणांत त्या तशा स्थितींतही एका विचित्र कल्पनेची लकेर तरळून गेली. आणि ती कल्पना तिला इतकी पटली कीं त्यावेळीं गाडींत आसपास आस्थेवाईकपणानें बोलणारें कोणीही जरी तिला आढळलें असतें तरी तिनें त्या व्यक्तीजवळ ती कल्पना बोलूनही दाखविली असती ! सारें जग म्हणजे एक प्रदर्शन आहे ! आणि त्यांतील माणसांचे व्यवहार प्रदर्शनांतील फेराच्या लाकडी चित्रांवर फेर घरणाऱ्या लहान मुलांसारखे चालू आहेत. कुणी घोडयावर बसतात, कुणी हत्तीवर बसतात, कुणी बांकावर बसतात आणि कळीची किल्ली संपेपर्यंत त्या फेरांत एकसारख्या गिरक्या घेत राहातात. किल्ली संपेपर्यंत गिरक्या घेतल्या पाहिजेत. घेरी आली तरी गिरक्या घेतल्या पाहिजेत ! तिला वाटलें, आपले साऱ्यांचे वर्तनक्रम अगदीं असेच नाहींत कां ? आपल्याला साध्य वाटणाऱ्या गोष्टीच्या हव्यासानें मोठमोठीं माणसेंही असें फेर धरून गिरक्याच मारीत नाहींत कां ? आई, वडील, शिरीषकुमार, वत्सला आणि प्रमिला हीं तिच्या

आयुष्यांतील अगदी निकटची माणसें तिला यावेळीं एकाद्या मोठ्या प्रदर्शनांतील लाकडी चित्रांच्या फेरांत सामील होऊन आपल्याला आवडीच्या चित्रांच्या पाठीवर बसून एकसारखी गिरक्या घेत असल्याचें भासलें. तिची तल्लख कल्पनाशक्ति नेहमींप्रमाणें याही वेळीं तिचें साहाय्य करीत होती. आपल्या सारखाच फेर आपल्या मुलीनें धरावा हा आईचा हट्ट, आपण सांगूं तेंच चित्र फिरण्याकरितां मुलीनें निवडावें हा वडिलांचा आग्रह, फेरांत सामील झालीस तरी हरकत नाहीं पण ज्यावर बसावयाचें तें चित्र नीट निवडून घे, असेंच जणूं काय बजावून सांगणाऱ्या शिरीष-कुमारांचीं प्रेमळ दृष्टी, तूं अजून पहातच उभी, आम्ही पहा, फेरांत दाखल होऊन केव्हांच फिरूं लागलों, अशी तिची चेष्टा करणाऱ्या वत्सला, प्रमिलांच्या भरभरां फिरणाऱ्या आकृति, सारें कांहीं तिनें आपल्या अंतर्दृष्टी समोर उभें केलें. आणि तिच्या व्यथित अंतःकरणाला असाही भास झाला कीं, आज चोवीस वर्षें आपण मात्र या फेराच्या बाहेरच उभें होतों, आणि आज पुण्याला गाडींत चढून जेव्हां कुठेतरी जायला म्हणून निघालों तेव्हां आपणही त्यांत सामील झालों. खरेंच; किती विचित्र! आणि आजचें आपलें हें फेरांत सामील होणें हें किती सहज झालें, अनपेक्षित झालें! तीन दिवसांपूर्वीं कुणी भविष्य वर्तवून जरी सांगितलें असतें, तरी हें आपलें करणें आपल्या हातून इतक्या तडाक्यानें अमलांत येईल असें आपणांस खात्रीनें वाटलें नसतें!

बाहेर पावसाची जोराची झड चालू होती. शुक्ल पक्षाची ती रात्र होती. चंद्रप्रकाशाला भुरक्या ढगांनीं जर वाव ठेवला असता तर त्यावेळची घाटांतील शोभा पाहून तिच्या त्रासलेल्या मनालाही आराम वाटला असता! पण आकाशांत गर्दी केलेल्या काळ्याकभिन्न ढगांनीं जो आज सृष्टीचा नवीनच अवतार तिच्यापुढें उभा केला होता, त्यामुळें तिच्या अंतःकरणाचें कातर्य अधिकच वाढत होतें. पावसाच्या आवाजांत गाडीची शिटी मधून मधून वाजत होती, ती तिला गळ्यावर सुरी चालवितांना बकऱ्यानें काढलेल्या भयाकुल पण आर्तस्वरासारखी भासत होती! गाडीची

गति आणि गाडीचा धडधडाट यांच्या संमिश्र आवाजानें तिचें सर्वांग तिला बधिर झाल्यासारखें वाटत होतें. मध्यरात्र उलटून गेली होती. त्या तशावेळीं शरीराला हिसके बसत असतानांही झोंपेचें सुख अनुभवणाऱ्या उतारूंच्या मनोरचनेचें तिला मोठें कौतुक वाटलें! आणि इतका वेळ आपण या उतारूंच्याबद्दल किती वेडयासारख्या कल्पना केल्या, असें मनांत येऊन तिचे तिलाच हंसू आलें. तिला वाटत होतें, या साऱ्या उतारूंची अंतःकरणें आपल्या सारखींच क्षुब्ध आहेत, साऱ्यांना जीवितांतील अतिशय स्निग्ध पाशांचे तणावे एकीकडे ताणून घेत असतांना महत्त्वाकांक्षेची अनिरुद्ध भरारी मारण्याच्या कामीं पराकाष्ठेचे कष्ट वाटत असावेत! आपल्या अत्यंत प्रीतीच्या माणसांना दुखवून घराच्या बाहेर पडलेले हे सारे प्रवासी आपल्या सारखेच वाट फुटेल तिकडे निघाले असावेत! पण इतका वेळ आपल्या-वरूनच जग ओळखीत बसणाऱ्या तिला साऱ्या उतारूंची ती सुखमय निद्रावस्था पाहून फार चमत्कारिक वाटलें! क्षणमात्रच तिच्या मनांत आलें, कीं आपल्या बांकावरून उठावें, खूप जोरानें आक्रोश करीत गाडीभर फिरावें, आणि साऱ्या उतारूंना जागें करावें!

तिच्या मनांत अशी कल्पना येऊन जाते न जाते तोंच, गाडीला एक जबरदस्त हादरा बसला, आणि रुळांवर घर्षण करणाऱ्या चाकांचा कर्कश आवाज होत असतांनाच गाडी एकदम थांबली. अर्धवट झोंपेंत असलेलें कितीतरी उतारू अस्ताव्यस्त रीतीनें बांकावरून खालीं घसरले आणि चमकून जागे झाले. नीरा जागी होती, आणि चांगली सावरून बसलेली होती तरी तिचाही समोरच्या बांकावर निजलेल्या लहान अर्भकाच्या अंगावर तोल गेलाच! तिनें स्वतांला कसेंबसें सांवरलें आणि डब्यांत खडबडून जागे झालेल्या उतारूंच्या प्रश्नार्थक मुद्रांकडे पाहिलें. एवढया अवधींत गाडीवर दगडांचा वर्षाव होत असावा, असें आवाजावरून सहज ताडतां यावें, इतकी बाहेरून लहान मोठ्या गोट्यांची वृष्टि होत होती. या अनपेक्षित संकटानें सारेच उतारू स्तिमित झाले. अंतरावरच्या एका उतारूनें पावसाकरितां लावलेली खिडकी किंचित् वर उचलली न उचलली तोंच

आंत दगड आणि विटकरांचे तुकडे पावसाच्या तुषारांपेक्षांही अधिक जलद गतीनें घुसले. त्यांतील एक दगड तर दिव्यावरच आपटला आणि त्या दिव्याच्या काचा डब्याभर खळकन् निखळून पडल्या.

गाडी जागच्याजागी उभी ! खिडकी उघडून पहाण्याची सोय नाहीं ! रात्रींची वेळ ! आणि पावसापेक्षांही दगडविटांच्या माऱ्यांनीं बेजार करण्याचा जणूं पण केलेला दिसत होता ! नीरेला वाटलें कुठल्या कुमुहूर्तावर आज आपण घर सोडलें ! आपण घर सोडलें तें उद्विग्न मनानें सोडलें आणि मनाला उद्विग्न करणारा प्रसंग कांहीं सुमुहूर्तावर घडण्यासारखा नव्हता, असाहि विचार तिच्या मनांत डोकावल्याशिवाय राहिला नाहीं. अंतःकरणाला प्रामाणिकपणें योग्य वाटलेली गोष्ट अमलांत आणण्यासाठीं आईबाबांच्या आग्रहालाही न जुमानतां, आपण बाहेर पडलों. आज बाबांनीं इतकें कडक भाषण केलें नसतें तर आपल्याही मनानें इतकी उसळी घेतली नसती ! शिरीषकुमारांच्या ज्या पत्रानें ही क्रांति केली तें पत्र तिनें आपल्या व्हॅनिटीबॅग-मधील सरकफासाच्या कप्प्यांत नीट ठेवलें होतें. आतां तिनें आपली बॅग किंचित् उघडून तें पत्र चापसून पाहातांना तिच्या अंतःकरणाला होणाऱ्या संवेदनाचें अस्फुट प्रतिबिंब तिच्या चर्येवर उमटत होतें. पण गाडीवर होणाऱ्या दगडविटांच्या प्रत्येक नव्या तडतडाटाबरोबर तिची मुद्रा भयाकुल होऊन तें अस्फुट प्रतिबिंबही झाकळून जात होतें.

या अनपेक्षित संकटाचा विचार तिच्या मनांत उभा राहातो न राहतो तोंच गाडींत वाऱ्याच्या वेगानें पसरलेली वार्ता उतारूंच्या बोलण्याचा विषय होऊन राहिली होती. माटुंग्याच्या जी. आय. पी. वर्कशॉपमधील कामगारांनीं संप केला होता. त्याचे प्रतिध्वनि ठिकठिकाणीं उमटले. त्या संपाचा प्रतिकार रेल्वेचे अधिकारी जुलुमजबरदस्तीनें करणार आहेत, अशा कल्पनेने रुळावर पडून राहण्याचा संकल्प केलेल्या कामगारांनीं आगगाडीवर हा दगडविटांचा वर्षाव केला. जुलूम जबरदस्तीला तसल्याच पाशवी साधनांनीं विरोध केला पाहिजे हें अगदीं सामान्य दर्जाचें तत्वज्ञान त्यांनीं मोठ्या आवेशानें वापरायला काढलें होतें. नीरेला ही हकिकत सुसंगत

रीतीनें जुळवून, समजावून घेण्यास कितीतरी अडचण पडली. भोंवतालच्या उतारूंच्या बोलण्याकडे बराच वेळ लक्ष दिल्यावर तिला थोडाफार अंदाज करतां आला. इतक्यांत रेल्वे पोलिस अधिकारीहि ठिकठिकाणीं शिरून लोकांना हुशार राहाण्याची इशारत देऊन धीर देण्याकरितां प्रत्येक डब्यांत शिरले होते. नीरेच्या डब्यांतही रेल्वेचे पोलिस अधिकारी आले. आणि त्यांनीं उतारूंना कोणत्याही प्रकारचा गोंधळ न करण्याची विनंति केली. एका उतारूनें जवळच उभ्या असलेल्या अधिकाऱ्याला या अनर्थाचें कारण विचारलें, त्यावेळीं त्यानें शांतपणानें सांगितलें, "कामगारांनीं संप पुकारला आहे. त्यांच्यापैकीं कांहींनीं हा अत्याचार आरंभला आहे. आमचे अधिकारी गाडीची वाट मोकळी करण्याकरितां त्यांच्या पुढाऱ्याशीं बोलणें करून कांहीं तोड काढण्यांत गुंतले आहेत. अशावेळीं सर्वांनी जागच्याजागीं स्वस्थ बसावें अशी त्यांची विनंति आहे." त्या अधिकाऱ्यानें मोठ्या गोडपणानें हें भाषण केलें, त्याचा फार परिणाम झाला. गोंधळून डब्यांतल्या-डब्यांत सैरावैरा झालेले उतारू पुन्हा जागच्या जागी स्थिर झाले. नीरेला वाटलें, हीं माणसें किती एकमार्गी! वाघाच्या वासानें कान टवकारून सैरा-वैरा धावूं लागणाऱ्या चतुष्पाद जनावरांना चुचकारून जागच्या जागी थोपवून धरल्यावर तीं जशीं निमूट राहतात, तसे सारे उतारू स्तब्ध झाले. यांच्यापैकीं कितींकांना या अधिकाऱ्याच्या बोलण्यांतील संपाची भाषा समजली असेल? आणि यांच्यापैकीं शेंकडो लोकांना जी भाषा समजत नाहीं, ती या कामगारांना कोणी शिकविली? या उतारूंपेक्षां कामगारांची बुद्धि अधिक तीव्र आहे कां? खासच नाहीं. मग यांना हा संप करण्याचें कसें सुचलें? प्रतिकाराचें हें नवें अस्त्र समाजाच्या खालच्या थरापर्यंत जाऊन पोहोचण्याइतकें प्रसार पावलें आहे कां?

गाडींतील उतारू स्तब्ध असल्यामुळें सारा गलबला आणि धांवपळ अगदीं बंद झाली होती. बाहेरच्या बाजूनेंच काय तो आवाज येत होता त्यावरून लोकांचे थवेच्या थवे एकत्र जमून जोराचा कल्ला करीत असावेत असा अंदाज सहज करतां येत होता. तो गलबला पावसाच्या सरीनें

अस्फुट बनत होता, तरी त्याची भयानकता जास्तच वाढत होती. नीरेला वाटलें, संपाचें आधुनिक हक्कसंरक्षणाचें हत्त्यार वापरणारे लोक साधें बोलणें करतांना इतका गलबला कां करतात ? ती ज्या परंपरेंत वाढली होती त्या परंपरेंतील कोणाही व्यक्तीनें या साऱ्या प्रकाराला धुडगूसच म्हटलें असतें ! ती एका न्यायाधीशाची मुलगी होती, आणि नोकरशाहीच्या साऱ्या बडे-जावी आणि कूपमण्डूक वृत्तींनीं ज्याचें मन पुरें माखलें होतें, अशा सरकारी अंमलदार बापाच्या शिस्तींत तयार झालेली एक कॉलेजकुमारी होती ! त्यामुळें संप, कामगारांचे हक्क इत्यादि शब्द ऐकल्याबरोबर तिच्या अंतः-करणांत जर कोणता पहिला उमाळा येत असेल तर तो उपहासाचाच येई. मागें असहकारितेच्या काळांत शिरीषकुमारानीं त्या चळवळींत धडाडीनें उडी घेतली. त्या वेळीं तिला कितीवेळां तरी वाटे कीं, आपणही शाळा सोडावी आणि शिरीषकुमारांचें अनुकरण करून असहकारितेचा मार्ग धरावा ! शेजारधर्मानें निर्माण झालेलें हें आकर्षण त्यावेळीं कदाचित् प्रभावी ठरलेंही असतें. पण तिच्या वडिलांनीं मोठ्या मुत्सद्दीपणानें शिरीषकुमाराला व त्याच्या आईला आपल्या शेजारच्या जागेंतून काढून लावून दृष्टीआड केलें, आणि नीरेच्या समोर असलेली आकर्षणाची नि अनुकरणाची वस्तूच अजीबात दूर करून टाकली !

गाडीला धक्का बसून गाडी चालू झाली आणि ती चालू होत असतांनाच तिची शिटी वाजली. मंदगतीनें जाऊन गाडीनें कसेंबसें कल्याण गांठलें. कल्याणला साऱ्याच उतारूंना गाडींतून खालीं उतरण्यास सांगण्यांत आलें. कारण माटुंग्याच्या बाजूला अद्यापही कांहीं दंगा होण्याचा संभव होता. त्यामुळें त्या तशा रात्रीच्या वेळींहि साऱ्या उतारूंना कल्याणवरच उतरविणें अधिकाऱ्यांना योग्य वाटलें असावें. पोर्टर लोक साऱ्या डब्यांतून भराभरा शिरले आणि त्यांनीं उतारूंना खालीं उतरण्यास मदत केली. कल्याणच्या स्टेशनवर मात्र एक लहानशी वसाहतच तयार झाली. झोंपेच्या अभावामुळें तारवटलेल्या डोळ्यांनीं एकमेकांकडे बघत उभे राहिलेले शेंकडों उतारू आपापल्या सामानाशेजारीं उभे राहून ‘पुढें

काय ? ' अशा प्रश्नार्थक मुद्रांनीं सभोंवार पाहात तिष्ठत राहिले. दुसऱ्या आणि तिसऱ्या वर्गाच्या वेटिंगरूममध्यें शिरून कित्येकांनीं जागा मिळविण्याचे प्रयत्न चालविले होते. रेल्वेचे अधिकारी सारें स्थिरस्थावर व्हावें म्हणून अटोकाट प्रयत्न करीत होते, आणि ' आतां पुढें या स्टेशनांत तरी निदान कांहीं धोका नाहीं ना ? ' अशा घाबरटपणानें विचारलेल्या प्रश्नांना एकसारखीं उत्तरें देत होते !

साऱ्या उतारूंच्या हालचाली पहात नीरा बाजूलाच उभी होती. त्यापैकीं कांहींना दगडधोंडयांचा जोराचा मार बसला होता. एका डब्यांतून तर एका स्त्रीला दोघांतिघांनीं आधार देऊन बाहेर काढलेलें तिनें पाहिलें. किंचित् बारकाईनें पाहिल्यावर तिला आढळून आलें कीं, ती स्त्री गरोदर असून तिला कपाळावर बरेंच लागलें होतें. त्या स्त्रीची ती अवस्था पाहिल्याबरोबर तिच्या अंतःकरणाला चरका बसला. संपाची आणि संप करण्याच्या पद्धतीची तिला मनस्वी चीड आली. आणि तिनें मनाशीं म्हटलेंसुद्धां कीं, " काय ही अघोरी चळवळ ! अशानं का कुठं जग सुधारतं ? आपल्याचपैकीं कांहीं निरपराधी जीवांना यातना देऊन स्वतांला सुख मिळविणारीं माणसं म्हणजे शुद्ध रानटी जनावरं आहेत. हा संप म्हणजे माणसांनीं माणसांना खाण्याची एक नवीन तऱ्हा आहे झालं ! " अन्तःकरणांतून उमटणाऱ्या या उद्गारांनीं तिच्या अंगावर शहारे आले.

बराच वेळ होऊन गेला. उतारूंपैकीं बहुतेकांनीं आपापल्यापुरती जागा मिळवून बैठकी मारल्या होत्या. नीरेला सोईस्कर अशी जागा न मिळाल्यामुळें ती बाजूला उभीच राहिली. पण ती कितीवेळ उभी राहाणार असें वाटूनच कीं काय एका पोर्टरनें तिच्याजवळ येऊन तिला म्हटलें, " तुम्ही अशा किती वेळ उभ्या राहाणार ? "

पोर्टरनें हा प्रश्न कांहींसा धीर करूनच विचारला होता. कारण नीरेची मुद्रा ही पहाणाराला सामान्यतः जरब बसविण्यासारखीच होती. विशेषतः अग्र भागीं खालीं वळलेलें तिचें नाक आणि कांहींशा निर्धारानें ओठ आळवून धरण्याची तिची लकब, हीं पाहून तिच्याशीं सलगी कर-

ण्याची तयारी असलेली कोणतीही व्यक्ति क्षण दोनक्षण थबकल्याशिवाय राहात नसे. तिनें असे ओठ आंवळून धरले म्हणजे तिच्या जन्मदात्या आईलासुद्धां तिच्याशीं थट्टामस्करी करण्याचा संकोच वाटे. आपल्याशीं कोणी सहसा सलगी करूं धजणार नाहीं, अशी नीरेलाही आंतून एक जाणीव असे; आणि म्हणूनच त्या पोर्टरच्या प्रश्नाचें तिला फारच आश्चर्य वाटलें. ती भीतीनें चमकली नाहीं, पण आजपर्यंतच्या अनुभवाला अपवाद निर्माण करणारा हा कोण, अशा विचारानेंच तिनें त्याच्याकडे कांहींशा रोखल्या नजरेनें पाहिलें. तिच्या नजरेंत विस्मय होता. त्या पोर्टरनें पुन्हां तोच प्रश्न तितक्याच साधेपणानें विचारला. तिच्या कॉलेजच्या जीवनक्रमांत तिनें कितीतरी विद्यार्थी पाहिले होते. तिच्याशीं बोलण्या-करितां मनाची तयारी करून आलेले असे विद्यार्थी तिची मुद्रा पाहिल्या-बरोबर मूकस्तंभ बनून जागच्याजागीं बावरून गेल्याचेंही तिच्या पाहाण्यांत होतें. पण त्या विद्यार्थ्यांची दृष्टि आणि या पोर्टरची दृष्टि यामध्यें तिला अंतर दिसलें. तरुणींच्या अंगावर खिळण्याकरितां आशाळभूतपणानें हपापलेली दृष्टि तिनें कित्येक विद्यार्थ्यांच्या ठिकाणीं अनुभवली होती. पण पोर्टरच्या या दृष्टींत तिला आर्जव दिसलें. म्हणून तिनें त्याला उत्तर दिलें, “ इथं कुठंच नीटशी जागा दिसत नाहीं; ” आणि वाक्य अर्धवट सोडून ती तशीच थांबली.

त्यानें लागलीच म्हटलें, “ ह्या इथल्या गडबडींत आपल्याला बरं वाटत नसलं तर इथं जवळच माझी खोली आहे तिकडे येतां का ? ”

गेल्या आठदहा तासांच्या अवधींत ज्या निरनिराळ्या अनपेक्षित गोष्टी तिच्या संबंधांत घडत गेल्या, त्यांच्या लागोपाठ मिळत गेलेल्या धक्यांनीं तिची स्त्रीत्वदर्शक लाजरी मनोवृत्ति कांहींशी बधिर होऊन गेली होती. नाहींतर एका अनोळखी नोकरानें—हलक्या दर्जाच्या नोकरानें—वरील सारखा प्रश्न विचारावा आणि नीरेनें मनांतल्या मनांत न चवताळतां सात्विकपणा कायम राखावा, याचें तिचें तिलाही सूक्ष्म आश्चर्य वाटल्यावांचून राहिलें नाहीं. पण स्वतांच्या आत्मविश्वासाचा दीप पाजळून एकट्यानें

जीविताचा सारा प्रवास करण्याकरितां सिद्ध झालेल्या नीरेला असेंही वाटलें, कीं असाहाय्यपणें परिस्थितीच्या अंकित होण्याचा स्त्रियांचा मनोधर्म आपण बाळगून आतां चालवयाचें नाहीं. इतके दिवस आपण समतेच्या आणि स्वावलंबनाच्या गोष्टी बोलत आलों. कॉलेजच्या आवारांत भरणाऱ्या विद्यार्थ्यांच्या सभांतील व्यासपीठावरून केलेलीं आपलीं भाषणें आजपासून प्रत्यक्ष अंमलांत आणण्याला सुरवात करावयाची आहे. अशा वेळीं आपल्या मनाला आपण निष्ठुरपणानें शिकविलें पाहिजे कीं, "बाबा रे शंका आणि भीति यांनीं एकसारखा संकोच पावण्याची आपली स्वाभाविक वृत्ति सोडून दे. जिनें आजपर्यंत तोंडानें बेधडकपणाची आणि हिंय्याची भाषा केली, तिच्या शरीराला बोलल्याप्रमाणेंच आचरण करण्याची शक्ति दे."

आणि मौज अशी कीं, क्षणमात्र मनांत येऊन जाणाऱ्या या विचारांनीं तिला खरोखरच आपल्या शरीरांत एक प्रकारचें नवीन चैतन्य निर्माण झाल्याचा भास होऊं लागला. तिला वाटलें, 'खरंच, आपल्या शरीराचा अणूनअणू कसल्या तरी नव्या तरतरीनें आणि उत्साहानें उसळ्या घेतो आहे.' तिनें तत्परता दाखवून म्हटलें, "तुमच्या खोलींत येण्यास हरकत नाहीं. पण फार चालावं लागेल का?"

"छे, छे, अगदीं जवळ आहे." असें म्हणून त्यानें तिची सामानाची बॅग घेतली व चालण्यास आरंभही केला. नीराही त्याच्या मागून जाऊं लागली.



# प्रकरण दुसरें

## न पाहिलेल्या जगाचें ओझरतें दर्शन.

त्यानें खोलीचें कुलूप काढलें. पण आंत शिरतांना नीरेला दाराशींच कांहीं वेळ थांबण्याची मोठ्या नम्रपणानें विनंती केली. " अंधारांत माझ्यामागं आलांत तर पायाखालची वाट नसल्यानें कशाला तरी अडखळाल; दिवा लावतो तोंपर्यंत दाराशींच तुम्हाला थोडं उभं राहिलं पाहिजे. " असें त्यानें म्हटल्यावर नीरा बाहेरच उभी राहिली. ती ज्या जिन्याच्या तोंडाशीं उभी राहिली होती तिथें पावसाच्या पाण्याचें थारोळें झालें होतें. तिच्या पायांतील चपला त्या पाण्यांत अगदीं बुचकळून निघाल्या. त्या पाण्यांत आसपासचा कितीतरी केर वाहून आलेला होता. त्यानें आंत जाऊन वास्तविक चटकन् दिवा लवायचा, तों त्याची कितीवेळ अंधरांतच खुडबूड चालली होती. काड्यांच्या पेटीचा आवाज तिनें मघाशीच ऐकला होता. मग दिवा लावायला इतका वेळ कां लागावा याचें आश्चर्य करीत ती बाहेर उभी होती. तिचें सारें शरीर श्रमांनीं अगदीं ताटकळून गेलें होतें. कुठें कां होईना, पण तास दोन तास टेकल्याशिवाय चालायचें नाहीं, याची तिला आतां पळापळाला जाणींव होऊं लागली. अंधारांतच खोलींत पुढें जाऊन खुडबुड करणारा तो पोर्टर कांहींतरी आवरासावर करीत असल्याचा तिला भास होत होता. कारण शुक्लपक्षाच्या उत्तरार्धांतील ती रात्र असल्यामुळें तसल्या पावसाळी हवेंतही त्याच्या खोलींत अस्पष्टशी आकृति हालचाल करतांना दिसावी इतपत धूसर प्रकाश सांठत होता.

पण तिच्या मनाची मौज अशी कीं, स्टेशनवरून त्याच्याबरोबर निघतांना तिला जितकें भय वाटलें नाहीं, तितकें आतां वाटूं लागलें ! या माणसानें आपल्याला ' चला ' म्हटल्याबरोबर आपण याच्याबरोबर

मुकाट्यानें चालूं लागलों कशा, याचें तिला राहून राहून आश्चर्य वाटूं लागलें. ओढाळ जनावराचे पायसुद्धां सरावाच्या वाटेकडे आपोआप वळल्याशिवाय राहात नाहींत, तसें तिचे स्वेच्छाचारी मनहीं परंपरेच्या नि रूढीच्या विचाराकडे आतां आपोआपच वळल्याशिवाय राहिलें नाहीं. तिला एकदम वाटलें, कीं या अनोळखी माणसाबरोबर आपण येण्यांत केवढी तरी चूक केली. यानें कांहीं भलतें सलतें करण्याचें मनांत आणलें, तर आपला अशा ठिकाणीं कोणता उपाय चालणार आहे ? असला विचार मनांत येऊन तिच्या हृदयावर भीतीची पकड बसणार इतक्यांत दिवा लागला. त्या घासलेटच्या दिव्याला असा कितीसा प्रकाश असणार ? पण तेवढ्याही प्रकाशांतले सारे जोरदार किरण खोलींतल्या भिंतीवरच्या एका भागावर खिळवेत अशी दिव्याची मुद्दामच रचना केल्याचें दिसत होतें. आणि भिंतिवर दिव्याचा प्रकाश ज्या ठिकाणीं पडत होता त्या ठिकाणीं बकुळीच्या फुलांची माळ घातलेला एक फोटो होता, तो दारांतून तिच्या दृष्टीस पडला ! त्या फोटोवर दृष्टी गेल्याबरोबर तिच्या मनांतील विचारांची मालिका तुटली, इतकेंच नव्हे तर तिची विचारशक्ति एकदम पंगु बनली. तिच्याकडे वळून, मोठ्या आतिथ्यानें तिला ' आंत या ' असें म्हणण्या-करितां तोंड उघडणाऱ्या त्या पोर्टरनें तिच्याकडे पाहिलें मात्र, तों त्यालाही तिच्या चेहऱ्यावरील सूक्ष्म संवेदनांनीं एकदम थबकविलें ! तिच्या मनाचा गोंधळ उडून ती या फोटोकडे बावरून बघते आहे, हें त्यानें प्रत्यक्ष पाहिलें खरें; पण त्या गरिबाला तिच्या मनांतील हालचालींचें ज्ञान कुठलें होणार ? त्याला वाटलें, खोलींत प्रकाश पडल्याबरोबर आपल्या खोलीची अवकळा थोरामोठ्याच्या पांढरपेशा तरुणीला किळसवाणी भासली असावी. आणि तिच्यासारखीला आपली खोली किळसवाणी वाटू नये तर काय ? तिच्या अंगावरचें उंची पातळ, रेशमी ब्लाऊझ, पायांतलि डौलदार चपला, गळ्यापासून वक्षःस्थलापर्यंत लोळणारी सोन्याची चमकदार सांखळी, आणि चालचर्येंतलि एकंदर श्रीमंती थाट, हीं पाहून तो आधींच बिचकला होता. भोळ्याभाबड्या तत्परतेनें आपण या स्त्रीला

आपल्याबरोबर आणलें खरें, पण अशी विनंति करून तिला बरोबर आण-तांना आपण उभयतांच्या राहणीमधील अंतराचा विचार करावयाला नको होता काय ? अशा विचारानें केविलवाणा होऊन तो तिच्याकडे पाहात होता. इतक्यांत ती कांहींशी पुढें सरकली आणि टक लावून तिनें त्या फोटोकडे पाहिलें ! न कळतच तिच्या तोंडून उद्गार निघाले, " हा फोटो इथं कसा ? " मनाशींच, पण मोठ्यानें विचारलेल्या तिच्या या प्रश्नानें तो पोर्टर अधिकच बिचकला. बकुळीच्या माळेनें पूजिलेल्या या आपल्या प्रिय व्यक्तीच्या प्रतिमादर्शनानें या स्त्रीला कांहीं दुःखतर झालें नाहीं ना, अशा स्वतःशीं विचारलेल्या प्रश्नाला, तिच्या मुद्रेकडे न्याहाळून बघत असतांना तो उत्तर शोधीत होता.

ती भानावर आली आणि खोलीच्या इतर भागांकडे तिची दृष्टि गेली. एका कोंपऱ्यांत एक देवदाराचें खोकें शेल्फसारखें उपयोगांत यावें म्हणून उभे केलेलें होतें. त्याच्या एकच एक मोठ्या कप्प्यांत निरनिराळे पत्र्याचे डबे वेडेवांकडे ठेवलेले होते. कांहीं डब्यावरील गंजाचे दाट काळे ठिपके, त्या डब्याना ऊन किंवा पाणी यांचा कित्येक दिवसांत संपर्क जडला नव्हता याची स्पष्ट जाणीव करून देत होते. खोक्याशेजारींच एक स्टोव्ह होता. त्यावर ठिकठिकाणीं वाहिलेले आणि वाळून गेलेले निरनिळ्या रंगाचे असंख्य ओघळ एकवटलेले होते. स्टोव्हच्या आसपास अस्ता-व्यस्त रीतीनें पितळेचीं आणि ॲल्युमिनियमचीं कांहीं भाडीं पडलीं होतीं. त्या भांड्यांना गळ्यापर्यंत काळा काजळी रंग चढला होता, आणि त्या भांड्यांचे गळे ठिकठिकाणीं वाकले होते. दुसऱ्या कोंपऱ्यांत एक कान फुटलेली बादली पालथी घालून ठेवलेली होती. तिच्या शेजारींच पोंचे आलेला एक गडू होता. भिंतीवरच्या फळीवर आणखी कांहीं सामान होतें. ठिकठिकाणीं उसवलेल्या गोणपाटाच्या तुकड्यांतून गुंडाळून ठेवलेलें तें सामान धुळीनें मांखलें होतें. जमीनीवर बैठक घातली होती, ती एका फाटक्या सुताडयाची होती. त्याच्या चौकटी दोन चार ठिकाणीं फाटून वर्तुळाकृति बनल्या होत्या. बैठकीवर भिंतीशीं टेकून बसतां यावें म्हणून

एका मळक्या नि फाटक्या धोतराच्या तुकड्यांत गुंडाळलेली एक पातळशी गादी होती. वरच्याच बाजूला भिंतीच्या अंगीं एक खुंटी होती, तिच्यावर दोन चार खाकी आणि निळया चड्ड्या व इतर काहीं मळून फाटलेले कपडे रचलेले होते. बैठकीजवळच्या कोपऱ्यांत एक उघडीवाघडी पडलेली आणि जुनी झालेली बाजाची पेटी होती. तिच्याशेजारींच टेंकण्याचा भाग उमळून पडलेली आणि स्टूलवजा बनलेली एक खुर्ची होती! भिंतीचा रंग एकेकाळीं पांढरा असावा अशी मोठ्या मिनतवारीनें कल्पना करतां आली असती. कारण आतांचा रंग चिखलांत पिवडी कालवून ती फासल्यासारखा दिसत होता आणि ठिकठिकाणीं मारलेल्या खिळ्यांच्या भोकांपाशीं ढेकूण नाहींसे करण्याकरितां लावलेल्या जळत्या काड्यांनीं उमटलेल्या काजळ्या उठून दिसत होत्या.

तिची तीव्र दृष्टि या साऱ्या देखाव्यावरून फिरत असतांना त्यानें तिला एकदोनदां ‘ बसा ’ म्हटलें, पण तें इतक्या बिचकत म्हटलें कीं तें तिला ऐकूं गेलें नाहीं. आपण ‘ बसा ’ म्हटलें असतां ही बसत नाहीं, हें पाहून त्याला मात्र वाटलें कीं, असल्या घाणेरड्या खोलींत बसण्याचाच काय, पण उभें राहाण्याचाही तिला संकोच वाटत असला पाहिजे. स्टेशनवर आपण तिला आपल्याबरोबर चलण्याकरितां विनंति केली, तीच करायला नको होती! तिला निवाऱ्याची जागा द्यावी म्हणून आपण अशी विनंति केली खरी, पण ही जागा तिला निवाऱ्याची वाटेल कीं नाहीं, याचा मात्र आपण मुळींच विचार केला नाहीं.

तो आणखीही गोंधळून गेला असता, पण तिनेंच त्याला एकदम म्हटलें, ‘ बसा, तुम्ही उभे कां ? ’

बावरून जाऊन त्यानें आपल्या अंगाची कांहीं चमत्कारिक चाळवा-चाळव केली आणि तीं दोघेही खालीं बसत असतां त्यानें तिला म्हटलें, “ असल्या खोलींत आजपर्यंत तुम्ही कधीं पायसुद्धां ठेवला नसेल ? ” त्यानें विचारलेल्या प्रश्नाचें उत्तर वास्तविक ‘ हो ’ असें होतें! एरवीं हवा तसा बोलघेवडेपणा करणाऱ्या नीरेनें दुसऱ्या एकाद्या प्रसंगीं ‘ हो ’ असें

उत्तर देऊनही टाकलें असतें. पण त्या खोलींत भरून राहिलेल्या मूर्तिमंत कारुण्याच्या दर्शनानें तिच्या अंत:करणाला अननुभूत दु:ख झालें. आणि अशा कारुण्यानें भरलेल्या जागेंत शिरीषकुमारांच्या फोटोचें आस्तित्व पाहून तिच्या मनाला एक विचित्र संकोच वाटला. राजप्रासादाशींही स्पर्धा करणाऱ्या अनेक रमणीहृदयांतून अहमहमिकेनें ज्याला स्थान दिलें जावें, नव्हें, दिलें जात होतें, अशा पराक्रमी पुरषाच्या प्रतिमेनें असल्या ओंगळ जागींहीं प्रवेश करण्यांत आनंद मानावा या घटनेनें, तिच्या पूर्वीच्या जीवनक्रमांत शिरीषकुमारांच्या संगतीचें जे कांहीं संस्मरणीय क्षण तिला लाभले होते, त्या साऱ्यांची तिला आतां मोठया उमाळयानें आठवण झाली! त्याच्या प्रश्नाला कांहीं उत्तर दिलेंच पाहिजे म्हणून तिनें म्हटलें! "छे. त्यांत काय झालें? मी जरी फारशी अशा जागांतून कधीं गेले आलें नाहीं, तरी असल्या जागा या जगांत आहेत हें केव्हां तरी कळायला पाहिजेच ना?"

तिच्या या बोलण्यानें त्याला बराचसा हुरूप आला आणि त्यानें सरसावून बोलण्यास आरंभ केला. "आमचे शिरीषकुमारही असेंच म्हणत असतात."

शिरीषकुमारांचें नांव ऐकल्याबरोबर तिच्या शरीराची न कळतच चाळवाचाळव झाली. त्या नांवाच्या उच्चारानें आनंदित झाल्याचें दाखवीत तिनें विचारलें, "काय म्हणतात शिरीषकुमार?"

"शहरांतून पुढारी म्हणून काम करण्याऱ्या लोकांचं जग फार लहान असतं. ज्या ठिकाणीं आगगाडयाच काय पण साध्या बैलगाडयाही जात नाहींत अशा ठिकाणींही देशांतलीं हजारों माणसें वसति करून राहातात याची ह्या पुढाऱ्यांना जाणीव नसते. हें जग पाहण्याचा, त्याच्याशीं समरस होण्याचा प्रयत्न केला पाहिजे. शिरीषकुमार म्हणतात, त्यांनीं साऱ्या आप्तेष्टांना सोडून देऊन या जगाचा रस्ता धरला, आणि म्हणूनच त्यांना देशहित म्हणजे काय चीज आहे याची जाणीव झाली."

त्यानें सांगितलेलें शिरीषकुमारांचें हें तत्त्वज्ञान तिला अगदीच परिचयाचें नव्हतें असें नाहीं. कधीं कधीं वर्तमानपत्रांतून त्यांचीं भाषणें तिनें वाचलीं होतीं, किंवा अगदीं अधूनमधून तिला जीं त्यांचीं पत्रें येत त्यांतून तिला अशा प्रकारचीं वाक्यें वाचावयाला मिळालीं होतीं. पण थंडगार लोखंडी खिळ्यांच्या साहाय्यानें उमटविलेलें वर्तमानपत्रांतले शब्द, किंवा औपचारिक पत्रलेखनांत भावनांच्या वरवरच्या पापुद्र्यांना स्पर्श करणारे शब्द, आणि शिरीषकुमारांना दैवत मानून, त्यानीं बोलून दाखविलेले विचार, आपल्या अंतःकरणांतील जिव्हाळ्याची सारी धग त्यांत ओतून हृदयस्पर्शी आणि सरळ भावानें बोलणाऱ्या कामगाराचे शब्द, यांत जमीन अस्मानाचें अंतर होतें! या ठिकाणी त्या शब्दांत एक नवीनच जीवंतपणा निर्माण झाला होता. आणि माणसाचें मन असें विचित्र असतें कीं जिव्हाळ्याच्या व्यक्तीचे शब्द कुठल्याही माध्यमांतून प्रकट झाले तरी त्यांचीं पारायणें व्हावीं अशी त्या मनाला एकसारखी आतुरता लागून राहाते. प्रियकरानें पोपटाला पढविलेले शब्दही त्याच्याकडून पुन्हां पुन्हां म्हणून घेण्यांत विरहिणी कृतकृत्यता मानते! नीरेचें तसेंच झालें. तिला वाटलें, या पोर्टरनें, शिरीषकुमारांच्या नांवाचा वरचेवर उच्चार करून त्यांनीं बोललेले शद्ब आपल्याला एकसारखे सांगत रहावें! आणि त्यांतून या उभयतांच्या जिव्हाळ्याचें स्थान एकच होतें. त्यानें आणखी बोलावें, न बुजतां बोलावें, म्हणून तिनें त्याला अगदीं विश्वासांत घेतल्यासारखें करून विचारलें, "शिरीषकुमार तुम्हाला नेहमीं पुष्कळ गोष्टी सांगत असतील नाहीं?"

तिच्या या प्रश्नानें तर त्याला बोलण्याचें एक प्रकारें स्फुरणच चढलें! त्यानें कांहींशा आवेशानें भाषण करीत म्हटलें, "त्यांच्या बोलण्यांतून आम्हांला पुष्कळ गोष्टी कळतात हें तर खरेंच, पण त्यांच्या स्वभावानें आणि प्रत्यक्ष वर्तनानें तर त्यांनीं शेंकडों कामगारांची मनें जिंकून घेतलीं आहेत! त्यांच्यापूर्वी आम्ही ज्यांना पुढारी म्हणत होतों ते लोक आमच्याशीं प्रेमानें वागत नव्हते असें नाहीं. पण त्यांचें येणें जाणें म्हणजे मोठा उत्सवाचा

कार्यक्रम झाल्यासारखा वाटे. पूर्वींचे आमचे पुढारी आमच्याकडे येत, आमच्या सभा भरवीत, आम्हाला मागण्या मागायला शिकवीत, पण त्यांचें स्वतांचे येणें अगदीं ठराविक वेळेपुरतें. यायचे तें मोटारींतून किंवा चौचाकी गाड्यांतून ! त्यांचें पोषाख मळू नयेत म्हणून आम्ही दक्षता घेऊं लागलों तर त्यांनीं कधीं तशा करण्याला मोडता घातला नाहीं. उंची सिगारेट ओढणें, झकपक पोषाख करणें, आणि आमच्याकडे येऊन आम्हांला उपदेशाच्या गोष्टी सांगणें इत्यादि प्रकार करतांना कामगारांच्यावर किंवा समाजांतील खालच्या दर्जाच्या लोकांवर आपण फार मोठे उपकार करीत आहों, असें त्यांना वाटे. त्यांनीं 'आम्हाला केलेलीं मदत ही त्यांची आमच्यावरची कृपा आहे, असें आम्ही मानावें, असा त्यांच्या बोलण्या-चालण्यांत एक आग्रह दिसे ! ”

शिरीषकुमारांच्याविषयीं पुन्हां बोलणें निघावें, आणि त्यांची स्तुति ऐकण्यास सांपडावी, म्हणून नीरेनें मुद्दाम म्हटलें, “ शिरीषकुमार तरी यापेक्षां जास्त काय करत असतात ? ”

नीरेच्या या प्रश्नानें त्याला चेवच आला, आणि चढ्या स्वरांत त्यानें उत्तर केलें, “ त्यांनीं आम्हांला पहिल्यांदा शिकविलें, कीं या कृपेच्या देखाव्यांत कांहीं अर्थ नाहीं म्हणून. तास अर्धातास आमच्या समाजांत येऊन आमच्यासमोर उभे राहून नुसतीं भाषणें करून चालतें होणें म्हणजे आमची सुधारणा नव्हे. आमची सुधारणा करण्यांत कृपा नाहीं. उलट पुधारलेल्या जगांतल्या साऱ्या सोईसवलती आम्हांला मिळाल्या पाहिजेत. त्या मिळण्याचा आमचा हक्क आहे. ते हक्क आम्ही आग्रहानें बजावले पाहिजेत ! ”

नीरेला वाटलें, या पोर्टरच्या मध्यस्थीनें, आपण मनानें शिरीष-कुमारांच्या कितीतरी जवळ गेलों. त्याच्या बोलण्यांतलीं तळमळीचीं वाक्यें ठेकठिकाणीं संपत असतांना तिची दृष्टि तिच्या नकळत शिरीषकुमारांच्या भिंतीवरील फोटोकडे वळे ! इतकेंच नव्हे तर त्या फोटोवर लोंबणाऱ्या माळेंतील बकुळीच्या फुलांचा दरवळ आपल्या साऱ्या शरीराला मंद मंद

स्पर्श करीत असल्याचा सूक्ष्म भास तिच्या अंतःकरणाला झाल्याशिवाय राहिला नाहीं. तो पोर्टर बोलतच होता. " शिरीषकुमारांनीं कधीं घाण पाहिली नाहीं, अडचण पाहिली नाहीं, अवेळ मानली नाहीं किंवा आपण मोठे आहों असें आम्हाला कधी जाणवून दिलें नाहीं! रोगराईच्या किंवा सांथीच्या वेळेस तासचेतास आमच्या उशापायथ्याशीं बसून त्यांनीं काढले आहेत. जगावें कसें हें त्यांनी आम्हाला शिकविलें; आमच्यांत वर्तमानपत्रें नाहींत, जाहिराती नाहींत, बातमी पोचविण्याची नवीन साधनं नाहींत. पण शिरीषकुमारांनीं आमच्यामध्यें चालू केलेली 'सीताराम' ही आरोळी आमच्या समाजांतलं खरं वर्तमानपत्र आहे! 'सीताराम' हा जयशब्द उच्चारला कीं आमच्या समाजांतील भिंतीचे कोपरेन्‌कोपरे बोलके होतात. त्याच आमच्या जाहिराती! आमच्यांत जिवंतपणा आणण्याकरितां त्यांनी, आपल्या हाडांची काडें केलीं, आणि हृदयाचा असाध्य विकार जडवून घेतला!"

" हृदयाचा असाध्य विकार जडवून घेतला," हे शब्द ऐकल्याबरोबर नीरेचें तोंड लालबुंद झालें. तिची दृष्टि आपल्या हातांच्या बोटांकडे गेली, आणि डाव्या हाताच्या तळव्यावरून तिनें आपल्या उजव्या हाताची बोटें अगदीं हळुवारपणें फिरविलीं. शिरीषकुमार मागें तिच्या शेजाराला राहात असत, त्यावेळीं ती शाळेंत जाणारी एक मुलगी होती. अहोरात्र व्यासंग करणारा एक लोकप्रिय कॉलेजयुवक म्हणून शिरीषकुमारांबद्दल त्यावेळीं तिला आदर वाटे. त्यांच्याकडे आपल्या अभ्यासांतल्या अडचणी विचारण्याच्या निमित्तानें कितीदां तरी ती जात असे. एके दिवशीं संध्याकाळी अशीच ती गेली असतां शिरीषकुमार आपल्या अंथरूणावर विव्हळत पडले असल्याचे तिनें पाहिलें. ती लगबगीनें त्यांच्याजवळ गेली. त्यावेळीं त्यांनी होऊन तिचा हात आपल्या हृदयभागावर ठेवला, आणि तिच्याकडून कितीवेळ तरी आपली छाती चोळून घेतली. आतां या पोर्टरच्या बोलण्यांत त्या हृदयाच्या असाध्य विकाराचा उल्लेख आल्याबरोबर तिला या प्रसंगाचें स्मरण झालें. ही आपली स्थिति लपविण्याच्या मिषानें तिनें त्याला

विचारलें, " संपांतल्या आजच्या या मारामारीनं त्यांना आनंद वाटेल नाहीं ? "

त्याचा स्वर अगदीं कापरा झाला. त्यानें म्हटलें, " तुम्हांला असं का वाटतं कीं कामगारांनीं ती मारामारी सुखासुखी केली ? एक गोष्ट नेहमीं लक्षांत ठेवा, कीं आम्हीं माणसं अगदीं साध्यासिध्या स्वभावाची आणि एकमार्गी असतो. आम्हांला लपंडाय येत नाहीं. शब्दाचे खेळ करतां येत नाहींत. जर कोणी असले प्रकार करूं लागलं तर मात्र आम्हांला मनस्वी चीड येते. ती चीड वाढण्यास विरुद्ध बाजूनें आणखी जुलूम करून मदत केली कीं मारामारी होते. ज्या उतारूंना लागलं त्यांच्या शरीरांना झालेल्या जखमा तेवढ्या दिसल्या. झाला हा प्रकार वाईट झाला असं कोण म्हणणार नाहीं ? पण कामगारांच्या, दलित वर्गाच्या मनाच्या जखमा, अपमानाच्या यातना, कधीं कुणी विचारांत घेतल्या आहेत कां ? शिरीषकुमार पुष्कळ माहिती सांगतात; त्यांत ते सांगतात कीं जगाच्या पाठीवर असेहि भाग आहेत कीं तिथं माणसं माणसांना खातात ! खरंच तुम्हाला सांगतों, आम्हालाहि हें म्हणणं पटतं. आमच्याहि समाजाचा हा भाग असाच आहे. हा आमचा समाज म्हणजे देशाची अधिकारसूत्रें चालविणाऱ्या बकासुरांचं राखीव रान आहे ! "

" माणसं माणसांना खातात ! " हें वाक्य ऐकल्याबरोबर ती मनांतल्या मनांत किंचित् वरमली. मघां आपण आपल्या मनाशीं संपाच्या धामधुमीचें वर्णन अगदीं वेगळ्या अर्थानें पण याच शब्दांनीं केलें होतें, हें लक्षांत येऊन ती स्तब्ध झाली.

आणि मग त्यांच्या संपाबद्दल बऱ्याच गप्पागोष्टी झाल्या. त्या गप्पांतून तिला त्या पोर्टरची सारी कौटुंबिक माहिती समजली आणि त्याचा व शिरीषकुमारांचा इतका जिव्हाळा कसा जुळला तेंहि कळून आलें. बोलणें चालू असतांनाच तिनें मनाशीं निश्चय केला कीं आतां थेट दादरला जायचं, परवांच्या पत्रावर शिरीषकुमारांनीं जो पत्ता दिला आहे, त्या पत्त्यावर जाऊन त्यांच्या दाराला ठोठवायचं, आणि त्यांनीं दार उघडल्याबरोबर

एक थोर पुढारी म्हणून त्यांचें अभिनंदन करण्याकरितां म्हणायचं, " **अब** तुम जयजयकार करो ! "

त्या पोर्टरच्या खोलींत एरव्हीं कोणत्याहि मनःस्थितींत तिनें **चहा** घेतला नसता. पण कालपासून तिच्या मनाला जडलेल्या वैतागांचें पर्य-वसान इतक्या कांहीं सुखमय प्रसन्नपणांत झालें कीं तिच्या साऱ्या वृत्ति बधीर होऊन गेल्या. त्यामुळें तिनें त्या तशा जागेंतही चहा घेतला.

इतके होतां होतां सकाळ झाली. त्या पोर्टरचे मनःपूर्वक आभार मानून लोकलमध्यें बसून दादरला जाण्याकरितां ती कल्याण स्टेशनवर आली. जवळ जवळ तासभर गाडींत बसायचें, कांहीं तरी वाचायला पाहिजे म्हणून तिनें इंग्रजी व मराठी वर्तमानपत्रें विकत घेतलीं आणि ती लोकलमध्यें जाऊन बसली. गाडी सुटतां सुटतां तिनें ' नवाकाळ ' उघडला, तों मुख्य पानावरच मोठा मथळा होता—

**कामगार पुढारी शिरीषकुमार यांस अटक !**



# प्रकरण तिसरें

## माई !

नीरा ज्या हुरूपानें दादरला जाण्याकरितां लोकलमध्यें चढली तो सारा हुरूप शिरीषकुमारांच्या अटकेच्या दुष्ट वार्तेनें पार मावळून गेला! एकाद्या कोमल हरिणीनें सरोवराच्या कांठीं जाऊन पाणी पिण्याकरिता मोठ्या तन्मयतेनें मान वाकवावी, आणि अकस्मात एकादा तीव्र शर शरीरांत घुसून व्याकुळ होऊन पडण्याचा तिच्यावर प्रसंग यावा, तसें नीरेला झालें! आणि मग साहाजिकच तिच्या मनांत आलें कीं, आजपर्यंत आपल्याला कुणाचाहि आधार न घेतां आयुष्याची वाटचाल करण्याची संवय नव्हती. परवां पुण्याला घर सोडून आपण मुंबईकडे निघालें, त्यावेळीं आवेशाच्या ओझरत्या उसळींत आपण आईबापांचे पाश तोडले खरे, पण ते तोडून आपला निभाव कितपत लागेल याचा खरोखर आपण विचारच केला नाहीं; घर सोडल्यापासून आतांपर्यंत म्हणजे ही दुष्ट वार्ता देणाऱ्या वर्तमानपत्राची घडी उलगडेपर्यंत आपल्याला वाटत होतें कीं कांहीं हरकत नाहीं, जन्मदात्यांना आपण सोडलें, तरी शेंकडो लोकांचें पुढारीपण अगदीं यशस्वीपणें करणाऱ्या शिरीषकुमारांचा आपल्याला आधार आहे. त्या आधाराला धरण्याकरितां आपण जात होतों. त्यांत एकामागून एक विघ्नेंच येत गेलीं. तिच्या मनाच्या एका खोल कोपऱ्यांत किंचित् पश्चात्तापही चमकून गेला आणि तिला वाटलें कीं, 'आपण आई-बापांचा निरोप घेऊन मोठ्या हिय्यानें बाहेर पडलों खरें, पण केलें हें कांहीं बरोबर केलें नाहीं.'

पण आतां असें वाटून काय उपयोग? असें वाटणें किंवा वाटून घेणें म्हणजे स्वतांलाच आपल्या असाहाय्यतेची कबुली देणें नव्हे काय? अशी

कबुली देणें हा आपला धर्म नाहीं. आपण असाहाय्य नाहीं. किंबहुना जगांतली कोणतीही स्त्री असाहाय्य नाहीं असें अट्टाहासानें भाषण लेखनांतून आपण आजपर्यंत सांगत आलों. ज्या ठिकाणीं आपण हें सांगितलें तें जग किती लहान होतें, आकुंचित होतें. आज मोठया जगांत पाऊल घालून कांहीं तास लोटले नाहींत तोंच आपल्याला आपल्या नेहमींच्या मतांचा विसर पडणें बरोबर नाहीं, असें कांहींसें बुध्याच मनाला भासवून घेत तिचा प्रवास चालू होता. दादर जसजसें जवळ येऊं लागलें तसतसें तिला वाटूं लागलें कीं दादरला आपण उतरणार खरें पण कोणाकडे जायचें ? शिरीषकुमारांच्या घरीं ? शिरीषकुमाराची जागा तिनें कधींहि पाहिलेली नव्हती, तरी एवढया ओझरत्या विचारानेंही तिनें आपल्या मनांत त्या जागेचें चित्र रेखाटलें; आणि अटक करून नेलेल्या शिरीषकुमारांवाचून ती जागा कशी दिसत असेल त्याचीहि कल्पना करून पाहिली. त्या कल्पनेंत तिच्या डोळ्यासमोर ठळकपणानें जर कोणाची मूर्ति उभी राहिली असेल तर ती माईची ! शिरीषकुमारांची आई—माई ! आज सहा सात वर्षे होऊन गेलीं. माई आपल्या शेजाराला राहात असेपर्यंत आपलें तिचें केवढें संघटन होतें ! आणि हें संघटन कां वाढलें, तर माईच्या प्रेमळपणामुळें !

माईच्या या प्रेमळपणाची किंमत तिला लहानपणापासूनच एकसारखी वाटत राहाण्याचें कारण म्हणजे तिच्या घरांतील शिस्त ! स्वतांच्या कर्तबगारीनें नांवलौकिक मिळविलेल्या तिच्या वडिलांना नेहमीं असें वाटे कीं आपण म्हणूं तोच शद्ब खरा झाला पाहिजे, नव्हे, आपण उच्चारलेल्य मताला दुसरी बाजूच असणें शक्य नाहीं ! त्यांची परिस्थिति त्यांची ही मनोवृत्ति एकसारखी वाढीस लागावी अशीच बनत गेली. गरिबींत मिळविलेलें उच्च शिक्षण, अनेक अटी जाहीर करून आणि त्या पाळल्या जाऊन झालेला विवाह, सरकारी नोकरींत एकसारखी मिळत गेलेली बढती, गावांत साऱ्या प्रतिष्ठित संस्थांनीं दिलेला अग्रमान, घरांत गृहिणीनें कधींही मान वर करून उत्तर न देण्याची पाळलेली शालीनपणाची शिस्त, अशा

कितीतरी गोष्टींनीं नीरेच्या वडिलांची मनोवृत्ति दुसऱ्यावर हुकमत गाजविण्याकरितांच जणूं आपला जन्म झाला आहे, अशा अति अभिमानाच्या विचारांनीं माखलेली होती !

घरांतील या काटेकोर शिस्तीचा नीरेवर जसा चांगला परिणाम झाला तसा वाईटहि झाला ! शाळेंतून किंवा कॉलेजांतून घरीं येण्यास तिला थोडासा उशीर झाला कीं दहा पांच माणसें शोधायला निघावयाचीं. नीरा घरीं येईपर्यंत सारें घर तिच्या वडिलांनीं जसें कांहीं डोक्यावर घेतल्यासारखें करावयाचें ! हिंगण्याला एकदां मुलींचें वार्षिक संमेलन होतें , त्यावेळीं तिथल्या एका मैत्रिणीच्या आग्रहाच्या बोलावण्यावरून ती गेली होती. जातांना ती घरांत आईला सांगून गेली होती. पण आपली परवानगी न घेतां स्वेच्छाचारीपणानें वागणें निदान आपल्या कन्येला तरी शोभत नाहीं असें वाटूनच कीं काय, तिच्या वडिलांनीं कोर्टातून घरीं आल्यावर नीरा हिंगण्यास गेल्याची बातमी कळतांक्षणीं गाडी रवाना केली, आणि गाडीवाल्याबरोबर 'ताबडतोब गाडींत बसून घरीं येण्याची ' आपली आज्ञाही पाठविली ! गाडी जी पोंहोचली ती नीरा खेळण्याच्या ऐन रंगांत असतांना ! त्यावेळीं ती किती चिडली, रागावली, पण निमूटपणें गाडींतून घरीं आली. तिच्या शाळेच्या आणि कॉलेजच्या आयुष्यक्रमांत तिच्यावर असे प्रसंग कितीदां तरी येत. घरीं मैत्रिणी येण्याची सोयच नसे. कारण घराची स्वच्छता आणि टापटीप बिघडायची ! मागील दारच्या आळूची आणि केळीचीं पानें तीं झाडाला असतांनाच पुसून ठेवण्याचा तिच्या वडिलांचा परिपाठ होता. सूर्यप्रकाशाच्या गतीवर घराच्या खिडक्यांची उघडझांप अवलंबून असावयाची ! त्यांत थोडीफार उपेक्षा झाली कीं प्रकरण हातघाईवर यावयाचें ! एकाद्या खिडकीला ताण लागलेला नसला आणि ती सहज वाऱ्यानें भिंतीवर आपटली तर बाबांची बसल्या जागेवरूनच 'नीरा' अशी हाक यावयाची. त्यांच्या अशा हांकांचा जवळ जवळ असा अर्थच ठरून गेला होता कीं, टापटीप बिघडल्याचा

ओझरता संशय उत्पन्न झाला कीं त्यांची हाक उमटावयाची! खाणेंपिणें, उठणेंबसणें, अभ्यासाची वेळ ठरविणें, या बाबतींत नीरेला आपलें मत कधीं प्रदर्शितही करतां येत नसें. नाहीं म्हणायला तीनचार वर्षांपूर्वीपासून म्हणजे कॉलेजांत ती इंटरच्या वर्गांत गेल्यापासून तिला स्वतांला होय नव्हे करतां येऊं लागलें.

अशा स्थितींत आपल्या घराशेजारींच रहाणाऱ्या माईची आणि शिरीषकुमारांची ओळख नीरेनें किती हौसेनें करून घेतली असेल आणि ती ओळख वाढीस लागावी म्हणून तिनें त्यांचे संघटन कसें वाढविलें असेल, त्याची कुणालाही सहज कल्पना करतां येईल. घरांत जो हट्ट पुरला नसेल, जी हौसमौज झाली नसेल त्या साऱ्याची बाकी माईच्या घरांत निघावयाची! आणि माईला स्वतांला मुलगी नसल्यामुळें कितीदांतरी थट्टेनें त्या नीरेला म्हणत असत कीं, "माझी मुलीची हौस तुझ्यामुळें भागली. शिरीषकुमार पोटचा मुलगा खरा, पण किती झालं तरी तो पुरुष आहे. घराच्या चार भिंती फोडण्याची त्याची वृत्ति असणार! तो जसजसा मोठा होणार तसतसा माझ्यापासून दूर जाणार! तूं मात्र मुलीसारखी माझ्या म्हातारपणीं मला आधार दे."

या साऱ्या स्मृतींनीं तिच्या डोळ्यांपुढें माईची मूर्ति अगदीं स्पष्टपणें उभी राहिली. त्या मूर्तीच्या दर्शनानेंच जणूं तिनें मनाशीं म्हटलें, "किती वेडया आहों आपण! शिरीषकुमारांना अटक झाली ही बातमी वाचल्याबरोबर आपण उगीचच हतबुद्ध झालों. वास्तविक आपल्याला माईकडे जाण्याचीच उत्कंठा वाटावयाला हवी होती. एकुलताएक मुलगा तिच्यापासून ओढून नेलेला! ती दुःखानें व्याकुळ झालेली! अशावेळीं आपण आतां कुठें जावें असा प्रश्नच कसा उपस्थित होऊं दिला?" आणि मग मात्र तिनें दादरला उतरण्याची तयारी चालविली. आपल्या व्हॅनिटी बॅगमधील शिरीषकुमारांचें पत्र तिनें बाहेर काढलें. त्या पत्रावर शिरीषकुमारांचा दादरचा पत्ता होता.

प्लॉट नं. ३० व्हिन्सेंट स्क्वेअर! फक्त पत्राच्या वरचा पत्ताच पाहावयाचा आणि पत्राची घडी करावयाची अशा प्रामाणिक उद्देशानें तिनें उघडलेलें पत्र ओझरतें कां होईना, पण वाचून काढल्याशिवाय तिच्या डोळ्यांना समाधान वाटलें नाहीं! पत्रांतील कांहीं अक्षरें डोळ्यांत भरत असतां तिच्या हातून त्या पत्राची तिच्या नकळतच कितीतरी सावकाशीनें घडी झाली!

बी. बी. सी. आय. पोलीस लाइन्सच्या गल्लीच्या तोंडाशींच ३० नंबरची इमारत तिच्या दृष्टीस पडली. ती आंत गेली. तळमजल्यावर उजव्या हाताच्या दरवाज्यावर नांवाची पाटी होती. "एस्. एम्. पटवर्धन." हीं इंग्रजी अक्षरें वाचल्याबरोबर तिनें दारावर टिचकी वाजविली. दार उघडल्याची चाहूल यावयाला बराच वेळ लागला. पुन्हां टिचकी वाजविण्याकरितां ती हात उचलणार इतक्यांत आंतून कडी सरकल्याचा आवाज आला आणि दाराची कडी उघडली गेली. दारांत उभ्या असलेल्या माईला पाहून नीरेनें म्हटलें, " ओळखलंत का माई आपल्या मुलीला ? " पण प्रश्न विचारण्यावेळचा नीरेचा उत्साह क्षणार्धात मावळला! दाराच्या चौकटीवर ठेवलेल्या डाव्या हाताच्या मनगटाला कपाळ टेकवीत माईनें क्षीण आवाजानें म्हटलें. " नीरे, शिरीष.... " आणि बोलतांबोलतां तिला हुंदका आला! वाऱ्याच्या तोंडावर असलेली जाईची सुकुमार वेल जशी थडथडून हालावी तशी माईची क्षीण काया दुःखावेगानें थडथडत होती. तिचें तें अनावर दुःख पाहून नीरेला कसेंसेंच झालें. माईच्या तशा स्थितींत काय बोलावें तें न सुचून ती स्तब्ध राहिली. माईनें दुःख करावयाचें आणि समजूत घालण्याचा प्रसंग नीरेवर यावयाचा हा प्रकारच अगदीं नवीन होता. नीरेनें आपल्या घरांतून उठून शेजारीं माईकडे जावयाचें, कागाळया करावयाच्या, रडावयाचें आणि माईकडून दुःख हलकें करून घ्यावयाचें असा तिचा शिरस्ता होता. सात आठ वर्षें मध्यें खंड पडला, तरी या शिरस्त्याची तिची आठवण बुजली नव्हती. नव्हे, ती आठवण आतां ती अनुभवत असलेल्या दृश्यानें अधिक उसळून वर आली! शिवाय माईच्या दुःखावेगापेक्षांहि तिच्या शरीराच्या

सौष्ठवांत आणि चेहऱ्याच्या मार्दवात पडलेला फरक पाहून ती कांहींशी दचकली.

माई मागें पुण्यास असतांना नीरा आणि माई रस्त्यानें जात त्यावेळीं माईचें रूपवर्णन करण्याच्या मिषानें नीरा चेष्टेनें तिला म्हणत असे, " माई, मी एकटी रस्त्यानं जातांना लोक कधीं इतकं बघत नाहींत. तूं बरोबर असलीस म्हणजे मात्र लोकांचे डोळे एकसारखे आपल्यावर लागलेले असतात. तूं फार चांगली दिसतेस म्हणून हें असं होतं !" आणि त्यावेळीं तिच्याशीं बरोबरीच्या नात्यानें चेष्टा करीत माई म्हणायची, " तर तर, काय विचारावं माझं रूप ! सारखी मी बरोबर राहिलें तर तुलनेंमुळें लोकांच्या डोळ्यांत तूं कधीं म्हटल्या कधींसुद्धां भरायची नाहींस !' असला थट्टाविनोद करणारी खेळकर माई आज किती वेगळी दिसत होती. तिची तेजस्वी अंगकांति निस्तेज झाली होती. पिवळ्या चाफ्याचं फूल कुणीतरी वळलेल्या मुठींत जणूं बराच वेळ चुरगाळून धरलें होतें !

पूर्वी माई सडपातळच होती. पण बांध्याच्या रेखीवपणामुळें मोठी डौलदार दिसे. मागें एकदां अजंठ्याकडील प्रवास करून परत आल्यावर माईची गांठ पडली त्यावेळीं नीरा म्हणाली होती, " माई, तुला पाहिलं कीं वाटतं, तिथल्या भिंतीवरलें एखादें चित्रच जणूं चालतं बोलतं होऊन माणसांत वावरूं लागलं म्हणून ! " आतां माईकडे स्तब्धपणें पाहणाऱ्या नीरेला त्यावेळचें आपलें बोलणें आठवल्याशिवाय राहिलें नाहीं. माईचें तोंड काळवंडून गेलें होतें. तिच्या डोळ्यांच्या खालच्या कडांचा काळेपणा तर नीरेच्या चटकन् लक्षांत आला. आयुष्यांतील आपत्तींनीं जातां जातां आपली निशाणी म्हणूनच जणूं तप्तमुद्रा उठविण्याचा यत्न केला होता, नि त्यांची झळ माईच्या डोळ्यांना लागली होती ! माईच्या विस्तीर्ण भालप्रदेशावर कुंकू लावण्याच्या जागीं नेमकी एक आठी पडली होती. माईच्या कपाळाला कुंकूं नाहीं हेंच जणूं स्पष्ट करण्याकरितां त्या आठीनें अंगुलीनिर्देश केल्यासारखा दिसे ! पूर्वी माईचें वैधव्य इतकें स्पष्टपणें दिसून येत नसे ! उन्हाळ्यानें वाळून गेलेल्या नदींत ठिकठिकाणीं वाळवं-

टांचे तुकडे दिसावेत आणि फक्त दोनच जागीं काळयाभोर पाण्यानें भर-लेले डोह असावेत, तसे माईचे डोळे, तिच्या शुष्क मुद्रेच्या पार्श्वभूमीवर उठून दिसत होते.

पण माईनें आपलें दुःख चटकन् आवरलें. आपल्या अशा कर-ण्यानें नीरा गोंधळून गेली आहे हें चतुरपणानें जाणून तिनें म्हटलें, " नीरे, इतक्या दिवसांनीं तूं आलीस, तुला पाहिल्याबरोबर मला उमाळा आला. दुसरं कांहीं होत नाहीं मला ! जुन्या चालीची मी. खरं म्हटलं म्हणजे मी आतां तुझ्यावरून तुकडा ओवाळूनच तुला आंत घ्यावयास पाहिजे होतें ! "

यावर निरेनें हजरजबाबीपणानें उत्तर केलें, " मला कशाला ओंवाळायला हवं माई. मला थोडीच दृष्ट लागणार आहे ! दृष्ट कुणाला लागते माहीत आहे तुला ? "

माईनें सहज नकारार्थीं मान हालविल्यासारखें केलें; तें पाहून नीरा म्हणाली, " नुसतं चांगलं दिसणाऱ्या माणसालाच दृष्ट लागत नसते, तर चांगलं पराक्रमाचं काम करून येणाऱ्याला दृष्ट लागते. "

नीरेच्या हाताला धरून तिला खालीं बसवीत माईनें तिला विचारलें, " नीरे, तूं काय कमी पराक्रमी आहेस ? किती मोठी झालीस तूं आतां. चांगली शिकलीस. आपल्या पायावर उभी राहायला तयार झालीस. परीक्षेंत पास झाल्याचं तुझं नांव छापून आलं, तें शिरीषनें मला दाखविलं त्यावेळीं मला किती आनंद झाला म्हणून सांगूं. पुढल्या खोलींतून अगदीं धांवत मी माझ्या देवाकडे गेलें, आणि माझ्या बाळकृष्णाच्या मूर्तीपुढें डोकं टेकून त्याला हात जोडून म्हटलं कीं, देवा. माझी नीरा अशीच कर्तबगार होऊं दे ! "

बोलतां बोलतां माई उठली. स्टोव्ह पेटविण्याकरितां ती आंत जाऊं लागली त्यावेळीं तिनें नीरेला म्हटलें, " उगीच मी वेडयासारखी बडबडायलाच लागलें. तुझं अजून सारं व्हायचं असेल. आधीं कळविलं असतंस म्हणजे मी तयारीनं राहिलें असतें. हा पहा कसा सारा

पसारा पडला आहे. अतांशा कामाचा अगदीं कंटाळा आला आहे. त्यांतून काल रात्रीं झोंपही नीटशी आली नाहीं."

माईनें स्टोव्ह पेटविला. नीरेनें स्टोव्हच्या दुसऱ्या बाजूला बैठक मारली, आणि माईला म्हटलें, "माई, मी करतें चहा. कितीतरी दिवसांत तूं माझ्या हातचा चहा घेतला नाहींस!"

"छे. असं कधीं झालंय् कां? आमची जुनी चालरीत! प्रवासांत दमून आलेल्या माणसाला अगदीं हलूं द्यायचं नसतं."

"अन् मग माई, तुला स्वतांला विश्रांति कशी मिळायची?"

"मला विश्रांति कशाला हवी? अन् माझ्या शरीराला विश्रांति मानावयाची नाहीं. शिरीषमध्यें मला वाटतं माझाच गुण उतरला असावा!"

"खरंच माई तुला एक मजा सांगायची राहिली. काल रात्रीं रेल्वेचा संप झाला. त्यामुळें साऱ्या उतारूंची मोठी तारांबळ उडाली."

"सांगत होता खरा शिरीष. काल संध्याकाळीं तो बाहेर पडला तेव्हां मला सांगून गेला कीं आज रात्रीं घरीं यायला उशीर होईल म्हणून. संप होण्याचा रंग आहे आणि कदाचित् आपल्याला थोडा त्रासही होईल असं तो म्हणाला होता."

नीरेला वाटलें, माईला अद्याप शिरीषकुमाराच्या अटकेची बातमी समजली नसावी. पण मघां दाराशीं शोकविव्हळ होऊन तिनें हुंदके दिले ते कशासाठीं? शिरीष नुसता रात्रभर घरीं नव्हता म्हणून, कीं त्याला पकडलें म्हणून? माईच्या चेहऱ्यावर नेहमींचा शांतपणाच होता. अंतःकरणांतला कसलाही उद्वेग लपविण्याची कला माईला साधलेली होती. नीरेला माईबद्दलचा हा अनुभव कांहीं नवीन नव्हता. मागें शिरीषकुमाराला कॉलेजचा अभ्यास सोडून इतर चळवळी करण्या-बद्दल बाबा टाकून बोलले होते. बाबांच्या बोलण्यावर शिरीषकुमाराला वास्तविक उलट उत्तरें देतां आलीं असतीं. आमच्या भानगडींत तुम्ही कां पडतां म्हणून त्यानें बाबांना झाडून टाकलें असतें तर बाबांना

गप्प बसावें लागलें असतें. पण त्यावेळीं शिरीषकुमारांनीं तें बोलणें निमूट सहन केलें. बाबांच्या बोलण्यांत शिरीषकुमाराला लागतील असे कितीतरी शब्द होते. आंत बसलेल्या माईला ते शब्द बोंचतील म्हणून तिची समजूत घालण्याचा आईनें प्रयत्न केला, त्यावेळीं माईच म्हणाली, "अहो, वडिलधाऱ्या माणसांनीं असंच बोललं पाहिजे. तुम्ही आम्ही नाहीं कां सासूसासऱ्यांची बोलणीं खातखातच मोठ्या झालों?" उद्वेग आवरून धरण्याचे माईचे असे कितीतरी प्रसंग नीरेला आतां आठवले. त्यामुळें शिरीषकुमाराबद्दल आतां आपण काय बोलावें हेंच तिला समजेना! त्यावेळीं तिला असे वाटलें कीं, वाईट वार्ता सांगून त्या प्रेमळ माउलीच्या मनाला यातना कशाला द्याव्या! बिचारीला कांहीं वार्ता माहीत नसेल तर ती समजेपर्यंत तरी तिचा काळ सुखाचा जाईल. तिचा असेल तोच मनाचा ग्रह कायम टिकावा, म्हणून नीरेनें म्हटलें,

"परत केव्हां येणार शिरीषकुमार?"

तीव्र दृष्टीनें तिच्याकडे रोखून पाहात माईने म्हटलें, "परत? आईची आठवण होईल तेव्हां! त्याच्या सभा, बैठकी, गिरण्या आणि कामगारांच्या चाळींतील फेऱ्या हीं बाहेरचीं कामें संपतील तेव्हां! भरीला घरांत रात्रीं दोनदोन वाजेपर्यंत जागायचं आणि जाडयाजाडया पुस्तकांतून वह्याच्यावह्या टिपणं उतरून काढण्याचं काम ठेवलेलंच आहे. गांवांतील बहिणभावंडांच्या कागाळ्या, नवरा-बायकांच्या मारामाऱ्या, बापलेकांची भांडणं यांचा निवाडाही आमच्याच घरीं व्हायचा!"

आपल्या मनाचे क्लेश लपविण्याकरतां माईनें हें भाषण केलें. नीरेला तें समजलें नाहीं असें नाहीं. पण माईवर ओढवणाऱ्या दुःखाचा भार सहन करायला माईला आपणही मदत करावी असें वा[illegible]नें उत्तर केलें, "पण माई, साधतात कशा इतक्या गोष्टी [illegible] कुमारांना? कालच पहा ना, संप झाला, त्यावेळीं असंच [illegible]

ाच्या तोंडीं त्यांचं नांव ऐकायला मिळालं. रात्रीं कल्याणलाच साऱ्या ाडया कांहीं वेळ थांबल्या, त्यावेळीं एका पोर्टरच्या घरीं गेलें होतें. ेथें तर शिरीषकुमारांच्या फोटोची देवासारखी पूजा बांधलेली मी ाहिली!"

माईनें चटकन् विचारलें " पोर्टरच्या घरीं?"

नीरेनें शांतपणें उत्तर दिलें, " हो. कां"

" हा कुठला पोर्टर होता?"

" असाच होता इतर शेंकडो कामगारासारखा! ब्राम्हण ाहे तो. धंद्यानं पोर्टर झाला. आईनें मोलमजुरी करून वाढवलं याला. त्याच्या आईला पांढरपेशा समाजानं थारा दिला नाहीं. तोच ांगत होता, अगदीं हालांत दिवस काढून त्याला पोर्टरची नोकरी मेळाल्यावर धन्य वाटलें तिला!"

" पण तूं त्याच्याकडे कशाला गेलीस?"

" कशाला म्हणजे काय? त्यानं मला निवांत जागा मिळावी म्हणून मुद्दाम आग्रहानं घरीं नेलं! त्याचा आग्रह मनापासूनचा वाटला. गेलें झालं मग?

" बापाला कळलं तुझ्या हें, तर उभी फाडून खाईल कीं!"

" बाबांना आतां समजायला लागलं आहे, कीं जगांतील माणसाची लायकी आपल्या मोजमापावर अवलंबून नसते म्हणून! माझी तर उलट खात्री आहे, त्यांनीं आजपर्यंत आपल्यापुढें झालेल्या खटल्यांचा शांतपणें विचार केला तर त्यांना परंपरेनें ठरविलेल्या मनुष्यस्वभावाच्या कल्पना बदलाव्या लागतील. किती तरी संभावित लोक भयंकर गुन्हेगार असतात माई!"

" तें कांहीं असलं तरी रात्रींच्या अवेळीं असं वाटेल त्या हलक्यासलक्या माणसाबरोबर जाणं बरं नाहीं, नीरे! कांहीं तिसराच प्रकार झाला असता तर काय केलं असतंस?"

" तशी भीति मला वाटली नाहीं, असें नाहीं. पण माई, फार मोठ्या

संकटांत माणूस सांपडला म्हणजे बारीकसारीक कल्पना करीत बसायला त्यावेळीं सुचतच नाहीं. मोठ्या थोरल्या घराला आग लागली म्हणजे कोणताही पुरुष कोणत्याही स्त्रीला स्पर्श करून तिला आगींतून बाहेर काढतो कीं नाहीं? तसंच झालं होतं काल त्या संपाच्यावेळीं. अन् शिवाय माई, खूप काळजी घेत आलेल्या समाजानं तरी अशा करण्याला नांवं ठेवण्याइतकी कितीशी नीतिमत्ता शाबूत राखली आहे? आमच्याच शाळेंत नागपूरच्या एका डॉक्टरांची मुलगी होती. बापानं तिला मुद्दाम शाळेच्या वसतिगृहांत ठेवलं होतं. कीड लागूं नये म्हणून हवाबंद टीनच्या डब्यांत जशीं लोणचीं ठेवतात, तशी तिला वसतिगृहाच्या बरणींत चांगली मुरवून टाकली होती. तिचा नागपूरपर्यंतचा प्रवास व्हायचा तो देखील सेकंड क्लासच्या डब्यांतून. एक तर बाप होता श्रीमंत. आणि दुसरें म्हणजे पापी समाजापासून आम्ही दूर राहातों आहों असा कैफ होता त्या बापाला नि त्याच्या मुलीलाही! पण एकदां सेकंड क्लासच्या डब्यांतून नागपुराकडे चालली असतां डब्यांतील संडासांत लपून बसलेल्या दोघां सोल्जरांनीं तिच्यावर धांवत्या गाडींत अत्याचार केला! झालेला अत्याचार कुणाला सांगून सोय नव्हती. निमूट बिचारी घरीं गेली. बापानंही ती गोष्ट ऐकली न ऐकलीशी केली. मला तर तेव्हांपासून नेहमीं असं वाटतं कीं, जितकी जितकी काळजी जास्त घ्यावी तितका तितका नाहीं त्या गोष्टींचा ससेमिरा मागें लागतो! हेंच पहाना, बिचारीनं तिसऱ्या वर्गानं प्रवास केला असता तर काय छातीं होती असल्या संकटाची?"

"तुझ्यापुढं बोलायला कोण टिकणार आहे? पण आम्हा जुन्या माणसांना हें करणं अगदीं पटत नाहीं त्याला काय करायचं?"

शेवटीं माईनेंच गप्पा आवरत्या घेतल्या. नीरेच्या आग्रहाला न जुमानतां माईनें नीरेच्या आवडीचे चार जिन्नस करून स्वयंपाक केला. त्यावेळीं नीरेला शिरीषकुमाराच्या अटकेच्या विचारानें एकसारखा संकोच वाटत होता. जेवीत असतां नीरेला माईनीं आग्रह केला.

त्यावेळीं ती संकोचानें कांहीं पदार्थ घेत नाहीं, असें पाहून माईनें म्हटलें, " आज आहे तर खाऊन घ्यावं. उद्यां कुणी सांगावं ? उद्यां रस्त्यावरही उभं राह्यला जागा मिळायची नाहीं ! "

' परिस्थितीनं माईला स्वतांच्याच जीविताबद्दल किती निष्ठुर बनाविलं आहे हें ! अशी कल्पना मनांत येऊन कांहींशा विषण्णपणानेंच तिनें जेवण उरकलें. रात्रीच्या जागरणाचा परिणाम तिच्यावर झालाच ! जेवणें झाल्यावर माईने थोडीफार आवराआवर केली. नीरा वैठकीवर पडली होती. तिच्याशीं बोलत बोलत माईनें तिथेंच भिंतीशीं एक चटई अंथरली आणि पांडवप्रतापाची पोथी पुढ्यांत घेऊन बसतांना नीरेला म्हटलें, " पड आतां जरा, प्रवासानं अगदीं शिणलेली दिसतेस ! " आणि माईचें थोडथोडें बोलणें चाललें असतांना नीरेचा डोळा लागला. कांहींशा जड आवाजानेंच तिनें म्हटलें, " माई मला लवकर उठीव हं. बाहेर जायचं आहे मला ! "

आणि मग ती चारच्या सुमाराला जागी झाली. तिनें कुठें जाऊं नये म्हणून माईनें तिला खूप आग्रह केला पण रात्रीं जेवायला परत येण्याची अट कबूल करून ती बाहेर पडली. " तूं जेवायला परत आली नाहींस तर मी उद्यां सबंध दिवसभर उपास काढीन बरं कां ? " असें माईनें थट्टेनें म्हटलें; त्यावर नीरेनें बाहेर पडतांपडतां उत्तर केलें, " अग मग चांगलंच होईल. आपल्या देशाला स्वराज्य मिळेल ! स्वराज्य मिळण्याकरितां उपास करण्याचा नवा तोडगा निघाला आहे ! " आणि हास्य हवेंत विरण्यापूर्वीच ती रस्त्याला लागली.

---

## प्रकरण चौथें

# प्रमिलेच्या जगांत

नीरेला टाकुरद्वारांतील नवरोजी स्ट्रीटवर पोंचावयाला पांच वाजले ! त्या रस्त्यावरच्या उजव्या बाजूकडील चौथ्या इमारतीच्या दुसऱ्या व तिसऱ्या मजल्यावर दृष्टि टाकल्याबरोबर तिला हवा तो पत्ता आपोआपच मिळाला ! '**पीपल्स सर्व्हिस सोसायटीचें सामळदास हायस्कूल** ! अशी मोठी पाटी त्या इमारतीवर झळकत होती. इतकी धांवपळ केल्यासारखें आपण नेमक्याजागीं येऊन पोहोंचलों असें वाटून नीरेनें एक समाधानाचा सुस्कारा सोडला आणि त्या इमारतींत प्रवेश केला. गड्यानें मुख्याध्यापिकेच्या खोलीकडे नीरेला नेलें, आणि आंत बसावयास सांगून म्हटलें, " बाई आतां येतीलच! "

या ' बाई ' म्हणजे नीरेची बालमैत्रीण प्रमिला ! गतवर्षी बी. ए. झाल्याबरोबर प्रमिलेला या नवीन धर्तीवर स्थापन झालेल्या संस्थेंत जागा मिळाली होती. प्रमिलेच्या वडिलांचा व संस्थेच्या चालकांचा चांगला परिचय होता. प्रमिलेचे वडील कोल्हापूरच्या एका कॉलेजांत पूर्वी प्रोफेसर होते. आतां सेवानिवृत्त होऊन ते पुण्यांत निवृत्तीचा आनंद उपभोगीत होते. प्रमिला बी. ए. झाल्यावर तिनें नोकरी करावी म्हणून नानांनीं म्हणजे प्रमिलेच्या वडिलांनीं आपला विचार व्यक्त केला. नोकरी करायची हा प्रमिलेचा निश्चय झाला होता. त्याला कारणेंही तशींच होतीं. एक तर प्रमिला ही नानांचीं सर्वांत मोठी मुलगी. नानांना मुलें झालीं तीं अगदीं मोठेपणीं म्हणजे उतार वयांत ? त्यांतून त्यांना मुलगा झालाच नाहीं. प्रमिलेसह त्यांना एकंदर पांच मुली होत्या. साऱ्यांचें शिक्षण चालू होतें. पण प्रमिलेनें नोकरी केली तर आपला संसार बराच निभावून जाईल असें नानांना नेहमीं वाटत

असे. एकदां नाना असेच आजारी असतांना त्याचे एक स्नेही त्याच्या समाचारास आले होते. नानांचा स्वभाव मुळांतच फार घाबरट. त्यांचा घाबरेपणा कमी व्हावा म्हणून त्या स्नेह्यांनीं त्यांच्या शेजारीं बसून बराच वेळ थट्टाविनोद केला. पण थट्टाविनोद चालू असतांही नाना मधून मधून आपली संसाराची काळजी बोलून दाखवीतच होते. त्यावर त्या स्नेह्यांनीं त्यांना म्हटलें होतें, 'चुकतं आहे तुझं नाना! तूं उगीच काळजी करतो आहेस. माझं तर मत आहे मुलांपेक्षां मुलीच जास्त मायेनं संसार करतात. तुझ्या प्रमिलेच्या ऐवजीं तिच्याच वयाचा एकादा मुलगा असता तरच उलट काळजी करायला हवी होती. मुलगे बापापासून फुटून निघतात. मुली तशा कधीं निघतील कां? त्यांतून प्रमिला तर फारच सरळ आणि सालस आहे. ती मनांत आणील तर तुझा संसार आवरण्याइतकी कर्तबगार होईल!" त्यावेळीं नानांनीं उत्तर दिलें होतें, "हरिभाऊ, मुली शिकल्या म्हणजे मनानं आणि मतानं मुलासारख्याच होतात. शिवाय तिच्या बालपणांत तिला आईबापांबद्दल जें वाटलं, तें तरूणपणांतही तसंच वाटत राहील हें कुणी सांगावं?" नानांचे हे उद्गार ऐकून प्रमिलेनें मनाशीं जवळ जवळ ठरवून टाकलें होतें, कीं काय वाटेल तें होवो, नानांची भीति खोटी ठरवून दाखवावयाची!

आणि नानांच्या देखत ही संधी यावी असें तिला नेहमीं वाटे. तेंही योगायोगानें प्रत्यक्ष घडलें. '**पीपल्स सर्व्हिस सोसायटी**'च्या कल्पनेचे जनक नानांचे विद्यार्थीच निघाले. नानांनीं विद्यार्थ्यांवर आपलें सारें वजन पाडून त्यांच्याकडून प्रमिलेची सोय लावून घेतली. सोसायटीच्या सामळदास हायस्कूलच्या शाखेंत प्रमिला मुख्याध्यापिका झाली होती.

प्रमिलेच्या नोकरीचा तो एकंदर रुबाब पाहून नीरेला बुजल्यासारखें वाटलें. 'एकंदरींत प्रमिला मोठी झाली तर—' असा विचार मनांत येत असतांनाच तिनें खोलीचें निरीक्षण चालविलें

होतें. त्या लहानशा खोलीच्या बाहेरच्या बाजूला व्हरांडा होता. त्यांत नीरा सहज गेली, तों तिथल्या विद्यार्थ्यांच्या वार्ता फलकावर कुणीतरी सुवाच्य हस्ताक्षरांत 'आपली संस्था' असें लिहून त्याच्याखालीं वर्तमानपत्राचें एक कात्रण लावलें होतें. सहज जिज्ञासेनें नीरेनें तें कात्रण वाचलें. शाळेंतील विद्यार्थिनींनीं तें वाचावें, म्हणूनच त्याठिकाणीं जाहीर रीतीनें तें लावून ठेवलेलें दिसत होतें. त्या कात्रणांत लिहिलें होतें—

"सोसायटीचा अहवाल सादर करतांना सेक्रेटरींनीं सांगितलें कीं, सध्यां सोसायटीतर्फे मुंबईच्या निरनिराळ्या भागांत एक अँग्लो ऊर्दु, एक अँग्लो गुजराथी, एक अँग्लो मराठी अशा शाळा चालविण्यांत येत आहेत. ठाकुरद्वारांतील सामळदास हायस्कूल हें गरीब मध्यमवर्गीय मुलींकरितां व मुलांकरितां असें कमी फीचें मुद्दाम चालविलेलें हायस्कूल आहे. शिवाय नाईटस्कूल आणि गिरणी कामगारांना विणकाम व कातकाम शिकविण्याकरितां एक टेक्सटाईल टेक्निकल स्कूल चालविण्यांत येत आहेत. या सर्व शाळांत मिळून एकंदर १२७२ विद्यार्थी शिक्षण घेत आहेत. या शाळांत सर्व जातीच्या व पंथाच्या विद्यार्थ्यांना घेण्यांत येतें. कांहीं शाखांतील विद्यार्थ्यांपैकीं बरेचसे विद्यार्थी कामगार वर्गांतील आहेत. सामळदास हायस्कूल विश्वविद्यालयाला जोडण्यांत आलें असून शाळेंत सर्व विषय शिकविण्यांत येतात.

समाजसेवेचीं तत्त्वें व पद्धति समजावून समाजसेवा करण्याची ज्यांची इच्छा आहे अशासाठीं सोसायटीतर्फे गेलीं कित्येक वर्षें, प्रतिवर्षीं 'व्हॉलंटरी सोशल वर्कर्स ट्रेनिंग क्लासेस्,' भरविण्यांत येतात. मॅजिक लँटर्न किंवा चित्रपट यांच्या साहाय्यानें निरनिराळ्या विषयांवर व्याख्यानेंही देण्यांत येतात.

कामगारांची कार्यक्षमता वाढावी यासाठीं टेक्निकल स्कूलमध्यें शिक्षण देण्यांत येतें. आणि त्याकरितां या शाळेंत यंत्रसामग्री ठेवण्यांत आली आहे.

सरकारनें नेमलेल्या प्रौढ शिक्षण कमिटीच्या अहवालापूर्वींच सोसायटीनें साक्षरता प्रसाराची मोहीम हातीं घेतली आहे.—"

नोटीसबोर्डावरील इतरही कांहीं नोटिसा वाचून व्हरांड्यांतून ती पुन्हा खोलींत आली. त्या नोटिसांखालीं प्रमिलेच्या सह्या होत्या, त्या पाहून तिला वाटलें कीं आपल्यापेक्षां प्रमिलेनें बरीच आघाडी मारली. स्वतंत्र जीवनाला झालेली तिची सुरवात ही मोठी धडाडीनें झालेली दिसते! खालीं आसपास, शाळा सुटून घरीं जाण्यापूर्वीं जो काय वेळ लाभेल तो खेळांत घालवून टाकण्यास तत्पर असणाऱ्या कित्येक मुली ठिकठिकाणीं बॅडमिंगटन खेळत होत्या. साऱ्याच मुलींना खेळावयास मिळत नव्हतें. त्यांतलि कांहीं, खेळणाऱ्या मुलींना म्हणत होत्या, 'ए लवकर लवकर तुमची गेम संपवा हं. आम्हांला खेळायचं आहे. नाहीतर आम्ही थोरल्या बाईंना सांगूं.' यावर खेळणाऱ्या एका मुलीनं उत्तर दिलं, 'सांगेनास का थोरल्या बाईंना. थोरल्या बाई कांहीं शिवणाच्या बाईसारख्या भांडखोर नाहींत...' पण या बोलण्याकडील नीरेचें लक्ष प्रमिलेच्या खोलींत येण्यानें एकदम वेधलें, तरी प्रमिला येतां येतां नीरा म्हणाली, 'या, थोरल्या बाई!' त्यावर प्रमिलेनें हसतहसत विचारलें, 'अन् या बाई इथं केव्हां आल्या अशा अचानक?' 'सहज आलें तुला भेटावंसं वाटलं म्हणून. पुण्याला अगदीं करमेनासं झालं!' पण हें उत्तर देतांना नीरेला स्वतांच्याच मनाची केवढी चाळवाचाळव करावी लागली! प्रमिलेसारख्या मैत्रिणीला आपल्या मनाचं दुःख सांगावयाला तिनें कधीं माघार घेतली असती असे नाहीं. पण भेटीच्या सुरवातीलाच आपली कहाणी सांगण्याचें तिच्या जीवावर आलें. त्यामुळें विषय बदलण्याच्या हेतूनें म्हटलें, 'खरंच प्रमिले, तूं फार झपाट्यानं एक स्वतंत्र जग निर्माण केलंस हां, आपल्या भोंवतीं!'

'अग कसलं स्वतंत्र जग नि कसलं काय. नानानीं लावून दिला हा उद्योग माझ्यामागें.'

' नानांनीं ? म्हणजे तुझी इच्छा नव्हती अशी नोकरी करण्याची ? '

' माझी इच्छा होती. पण त्या इच्छेला ताबडतोब व्यवहारी बनविण्याचं काम नानांनीं केलं. '

तें कांहीं असो. पण स्वतांच्या मनगटाच्या जोरावर मिळविलेल्या पैशाचा आनंद तुला मिळतो आहे हें खोटं नाहीं ना ? '

' एकपरीं मला काम करून दाखवायला खूप वाव आहे हें कांहीं खोटं नाहीं. '

' आणि तूंही खूप काम करतेस असं दिसतं. मघा नोटिसबोर्ड पाहिला. तिथें कितीतरी नोटिसा तुझ्या सहीनं लावलेल्या वाचल्या, आणि मला तुझं कौतुकच वाटायला लागलं ! '

' अगदीं आजीबाईच झालीस कीं नाहीं कौतुक वाटायला ! बरं पण, आलीस ती सडी आलीस. सामान कुठं आहे तुझं ? ,

' मी कांहीं आत्तां नाहीं आलें. आज सकाळींच आलें. दादरला माईकडे उतरलें आहे मी. '

' बरोबर आहे. तिकडेच तूं उतरायचीस. शिरीषकुमार तुला स्टेशनवरून न्यायलाच आले असतील मुळीं ! '

प्रमिलेनें सहज थट्टा करण्याच्या उद्देशानें केलेला हा शिरीषकुमारांचा उल्लेख नीरेला किती विचित्र वाटला ! तिच्याकडे रोखून पाहात नीरेनें म्हटलें, ' शाळेच्या कामामुळें बाईसाहेबांना आपल्या भोंवतालच्या जगांत काय चाललं आहे, तें पाह्यला वेळ नाहींसा दिसतो. "

प्रमिला मोठ्यानें हंसली नि म्हणाली, " भोंवतालच्या जगांतलं समजतं ग ! पण त्या जगालाही जें समजत नाहीं तें मला कसं समजणार ? ही बातमी कुठं वर्तमानपत्रांत कां येणार आहे ? काय तर म्हणे नीराबाई जोग सकाळच्या गाडीनें दादर स्टेशनवर उतरल्या, आणि त्यांना पुष्पहारांनीं मंडित करून त्यांचं स्वागत करण्याकरितां शिरीषकुमार

पटवर्धन दादर स्टेशनवर उपस्थित होते ! " 'उपस्थित' या शब्दावर जोर देऊन वाक्य पुरें करतां करतां प्रमिला मनापासून हंसली.

" खरंच प्रमिले; तूं आजचीं वर्तमानपत्रं पाहिलेलीं दिसत नाहींत."

" तशी मी तीं नियमानं पाहातच नाहीं. विशेष कांहीं लक्ष देण्याजोगं असलं तर आमचे कारकून दाखवितात मला ! "

" पण आजची बातमी कारकुनांना महत्त्वाची वाटली नसली तरी तुला खास वाटेल ! "

" कोणती ती बातमी ? "

" शिरीषकुमारांना अटक करून कालच नेलं आहे ! "

मग मात्र प्रमिला एकदम चमकली. आपण केलेला थट्टाविनोद हा अगदीं भलत्याच वेळेला केला हें लक्षांत येऊन ती वरमली आणि नीरेला म्हणाली, " Excuse हं. मला खरंच माहीत नव्हतं. वह्या नि पेपर्स, नोटिसा नि कॅटलॉग यांच्या रगाड्यांत आम्हीं असेच जगाच्या मागें पडणार ! "

" मी माईकडं आज सकाळीं गेलें. पण त्या बिचारीची स्वतःचं दुःख लपविण्याची एकसारखी धडपड चालली आहे. ती पाहून मला तिथं कसं अगदीं बुजल्यासारखं झालं आहे. "

" मग माझ्याकडंच राहीनास इकडे. उद्यां आम्हाला अनायासे सुटीच आहे. मग उद्यां दोघीही मिळून माईकडं जाऊं. मी सुद्धां किती दिवस माईकडं जाईन जाईन म्हणते, पण तिच्या जागेचा मला नक्की पत्ताच माहीत नाहीं. तुला पत्र पाठवून पत्ता विचारावा असं सुद्धां एक दोनदां मनांत आलं. "

" पण तसं नको गडे राह्यला. मी आज संध्याकाळीं नक्की परत येतें म्हणून तिला सांगितलें आहे. आजच नेमकी परत गेलें नाहीं म्हणजे तिला वाटायचं कीं आपल्या दुःखांत सहानुभूति दाखविण्याबद्दल आपण थोडीशीसुद्धां याचना केली नसतांना हिनें आपल्याला कां टाळावें. तिला

खरंच फार वाईट वाटेल."

"बरं पण, निदान गांवदेवीला माझी खोली आहे तिथें तर येशील कीं नाहीं? थोडासा चहा फराळ तर करूं. आज मी कांहीं न खातां शाळेंत आलें. डबाच मुळीं वेळेवर आला नाहीं. घरांत सारी स्वयंपाकाची व्यवस्था आहे, पण मला अगदीं कंटाळा येतो."

त्या दोघीही मग गांवदेवीला गेल्या. प्रमिलेचा दोन खोल्यांचा एक ब्लॉकच होता. तो ब्लॉक आणि त्यांत प्रमिलेची एकट्यानें राहण्याची तडफ पाहून नीरेला प्रमिलेच्या कर्तबगारीबद्दल एक प्रकारचा आदर वाटला. खोलींत आरामखुर्चीवर बसतां बसतां नीरेनें म्हटलें—

"प्रमिले, आपण शाळेंत असतांना फर्ग्युसन कॉलेजमध्यें एकदां वक्तृत्वाच्या चढाओढी ऐकायला गेलों होतों. शिरीषकुमारांचं भाषण त्या दिवशीं झालं तें तुला आठवतं?"

"हो न आठवायला काय झालं? आणि त्या दिवशीं मग आपण कॉलेजच्या मागल्या टेकडीवर जाऊन निश्चय केले. आपण ज्या जागीं बसलों होतो, त्या जागेबद्दल नानांनीं सहज एक मौजेची गोष्ट मागून सांगितली. ना. गोपाळराव गोखल्यानीं भारतसेवक समाज स्थापन करण्याची आपली प्रतिज्ञा आणि आपल्या सहकाऱ्यांचा समाजसेवेचा शपथविधी याच जागीं केला होता म्हणे!"

"त्या दिवशींच्या शिरीषकुमारांच्या व्याख्यानांतील स्त्रियांच्या विषयींचे उद्गार तूं नि वत्सलेनें खास खोटे ठरविले आहेत."

"पण काय तरी बाई! शिरीषकुमारांना तरी नेमकं ते बायकी गाणं कसं माहीत होतं ग?"

"मलासुद्धां राहून राहून आश्चर्य वाटतं त्याचं! काय तर म्हणें,—

**"आतां माझा दादा येइल ग। दादाच्या मांडीवर बसेन ग। वहिनीच्या चाहाड्या सांगेन ग.........।"**

या ओळी नीरेनें म्हटल्यावर दोघीहि मनसोक्त हंसल्या. अशाच मागल्या गप्पा चालू असतांना प्रमिलेनें चहा केला. चहाचा ट्रे घेऊन दोघीही पुन्हां बाहेरच्या खोलींत आल्या. टेबलखुर्च्यांची मांडामांड करून प्रमिलेनें चहा ओतला. प्रमिला चहा ओतीत असतां नीरेनें म्हटले, “ प्रमिले, मला देतेस एखादी छानशी नोकरी बघून ? ”

तिच्या या प्रश्नानें प्रमिलेला हसूं कोसळलें. “ तुला ? आणि नोकरी ? ” असे हसतां हसतांच ती म्हणाली. तिला इतकें हसूं आलें कीं, चहा ओतणें कांहीं वेळ तसेंच राहून गेलें आणि हिंदकळणाऱ्या किट-लीचें झांकण तिला डाव्या हातानें सावरून धरावें लागलें ! नीरेनें तिला म्हटलें,

‘ खरंच प्रमिले, मी चेष्टा नाहीं करीत. मला नोकरी हवी आहे ! ”

तरी प्रमिला तिला म्हणालीच, “ अग, इतक्या श्रीमंत बापाची मुलगी होऊन तुला नोकरी करण्याचे हे डोहाळे गं कशाला सुचताहेत ? तुझ्या बाबांनाच मुळीं आवडायचं नाहीं नोकरी करणं ! आय. सी. एस. ला गेलेल्या तरुणांच्या याद्या तपासण्याचा त्यांचा सपाटा केव्हांच सुरू झाला असेल ! ”

“ अग पण, आपलं स्वतांचं आपणच कांहीं बघायला नको का ? माझं मला स्वतंत्र जीवन हवं आहे. तसं जर मी म्हटलं नाहीं आणि म्हटल्याप्रमाणं करण्याचा प्रयत्न केला नाहीं तर तुझ्यासारखी बालमैत्रिण देखील मला टाकाऊ म्हटल्याशिवाय राह्यची नाहीं ! म्हणून म्हणतें, माझाही आतां विचार झाला आहे कीं कांहीं तरी स्वतंत्र नोकरी करावयाची ! ”

इतक्यांत दारावर ‘टक टक’ असा आवाज आला. प्रमिलेनें दार उघडल्याबरोबरच ‘ या ’ असें म्हटलें. दाराबाहेर कोण आहे तें नीरेला पहिल्यानें नीट दिसलें नाहीं. प्रमिलेने ‘ आंत या ’ असें म्हणतां म्हणतांच बाहेरील गृहस्थ आंत आले. खुर्चीवर बसतां बसतां प्रमिलेनें म्हटलें,

" ओळख करून देतें हं. ही माझी मैत्रीण नीरा जोग. माझ्याबरोबरच बी. ए. झाली. सबजज्ज तात्यासाहेब जोगांची मुलगी." त्या गृहस्थांनी नीरेला नमस्कार केला. आलेल्या गृहस्थांची ओळख करून देतांना प्रमिला म्हणाली, "रामकृष्ण गणेश आनंदकर. 'सागर' मासिकाचे संपादक. हे बी. ए. आहेत, यांनीं असहकारितेंत भाग घेतला होता. आणि विजापूरकरांच्या तळेगांवच्या समर्थ विद्यालयाप्रमाणें एक राष्ट्रीय शाळा यांनीं कांहीं दिवस लोणावळ्यास काढली होती. कॉलेजमध्यें यांच्यावर प्रोफेसरांची फार मर्जी असे. प्रो. वासुदेवराव पटवर्धनांचे हे फार आवडते शिष्य असत. असहकारितेंत पडणं वासुदेवरावांना पसंत नव्हतं. त्यांनीं यांचें मन वळविण्याचा फार प्रयत्न केला होता ...."

नीरेला प्रमिलेची ओळख करून देण्याची ही तऱ्हा गिऱ्हाइकाला आपल्या मालाची शिफारस करणाऱ्या एखाद्या वाचाळ दुकानदारासारखी वाटली ! शिवाय दादासाहेबांनीं ( आनंदकरांचें खासगी नांव ) प्रमिलेला म्हटलें, ' अहो, आतां त्यांना हळू हळू ही सारी ओळख पटतच जाईल कीं. पहिल्या भेटींतच तुम्ही हें इतकं वर्णन चालविलें आहे. त्या वर्णनाप्रमाणें त्यांनीं मनांतल्या मनांत माझी जर तपासणी केली तर पुढें केव्हांतरी त्यांची निराशा होईल. तुम्ही फारच वर्णन करतां आहां हें."

" अहो, आजचं युग जाहिरातीचं आहे. तुम्हाला पुढें यायला हवं आहे ना. परवांच तुम्ही म्हणलां होतां ना, कीं ' मला फार पुढें यायचं आहे म्हणून ! ' तेव्हां आपली माहिती आपल्याच तोंडानें जरी नाहीं तरी दुसऱ्या कुणाच्या तोंडून सांगितली जात असतां कांहीं संकोच-ण्याचं कारण नाहीं. लोकांनीं आपल्याविषयीं एकसारखं बोलत राहणं हाही पुढें येण्याच्या मार्गाचाच एक प्रकार आहे." आणि आपल्याच विनो-दावर खूष होऊन प्रमिलेनें म्हटलें, " हे एक फार चांगले लेखक आहेत. बरं का. ' सागरचे ' तर संपादक आहेतच. रामदासावर यांनीं एक शंभर पानी पुस्तक लिहिलें आहे. पण शिवाय ' कालिदासाच्या काळची

सामाजिक स्थिति ' या विषयावर एक प्रबंध ते तयार करीत आहेत. तो पीएच. डी. साठीं कुठं तरी परदेशांत घेऊन जावा असा त्यांचा विचार आहे. "

प्रमिला कदाचित् बोलत राहिली असती. पण दादासाहेबांनीं मध्येंच म्हटलें, " आतां तुमच्याविषयीं मला बोलूं द्या. " असें म्हणत त्यांनीं आपल्या बॅगमधून ' सागर ' चा उद्यां प्रकाशित होणारा ताजा अंक काढला, आणि त्यांतलि ' गोंडवनांतील प्रियंवदा—परीक्षण—लेखिका–प्रमिला दीक्षित ' या मथळ्याचें पान उघडून तो अंक चहाच्या ट्रेजवळ ठेवला. नीरेनें पाहिलें, तों पानाच्या डाव्या हाताच्या आरंभींच्या भागावर प्रमिलेची खुर्चीवर बसलेली प्रतिमाही त्या ठिकाणीं असल्याचें तिला आढळून आलें. तिनें विचारलें, " म्हणजे प्रमिले, तूं लेखिकाही झालेली दिसतेस ? "

प्रमिलेनें लागलीच उत्तर केलें, " हो. म्हटलं आपली मैत्रीण एवढी लेखिका आहे; तिच्या मैत्रीला शोभेल असं आपणही कांहीं करायला पाहिजे. " आणि दादासाहेबांकडे वळत तिनें नीरेविषयीं सांगितलें, " ही सुद्धां एक चांगली लेखिका आहे बरं का ! पण आपलं लेखन प्रसिद्ध करण्याची तिला लाज वाटते. तिच्या गोष्टी नि लेख प्रसिद्ध झाले तर ही खास मोठी साहित्यसेवक म्हणून गाजेल. "

त्यावर दादासाहेबांनीं ' सागर ' मासिकाकरितां एक लेख देण्याची नीरेला तत्परतेनें विनंति केली. ती विनंति स्वीकारतांना खूप संकोच वाटून नीरा म्हणाली, " छे हो. ही कांहींतरीच सांगते. मला कसलं लिहितां येतं ? आम्हीं असं काय जग आणि जीवित अनुभवलं आहे म्हणून त्याह्यचं ! "

" हेंच चुकतं. आपल्या भोंवतीं अगदीं आपल्याला लगटून काय चाललं आहे, तें पाहिलं तरी एकादी स्त्री दहा कादंबऱ्या लिहूं शकेल ! स्वतांचं आत्मचरित्र प्रत्येकानं लिहावं असं म्हणतात तें कांहीं खोटं नाहीं. "

यावर मध्येंच प्रमिलेनें संधि साधून म्हटलें, "मी तरी तेंच म्हणतें. इतरांचीं चरित्रं लिहिण्यापेक्षां स्वतांचंच लिहावं. तुम्ही मला जो आगरकरांचं चरित्रं लिहिण्याचा एकसारखा आग्रह करीत असतां त्यांत कांहीं अर्थ नाहीं. मी मोठी झालें म्हणजे माझंच आत्मचरित्र लिहीन. बरं कां नीरे, हे मला एकसारखं सांगत असतात कीं, तुम्ही आगरकरांचं चरित्र लिहा. नानांचा नी आगरकरांचा फार स्नेह. तेव्हां नानांच्या मुलीनं लिहिलेल्या चरित्राला फार महत्त्व येईल असं म्हणतात हे."

"मग कां लिहीत नाहींस ?" एवढेंच नीरेनें म्हटलें. आणि लाग-लींच 'मी आतां चहा करतें. प्रमिले, तुला पुरेसा चहा घेतल्यासारखं वाटलं नसेल,' असें बोलत ती उठली. प्रमिलाही गडबडीनें उठली नी म्हणाली, 'छे. मीच चहा करतें,' त्यावर दादासाहेबांनीं म्हटलें, 'पण आतां चहा पाहिजेच का ? प्रमिलाताईना कमी झाला आहे हें तरी खरं कशावरून ?'

'मला खरंच आणखी थोडा चहा घ्यायचा आहे.'

'पण हा माझ्या कपांतला चहा इथं वाया चालला आहे. घ्या तुम्ही थोडा' असें म्हणत दादासाहेबांनीं आपल्या कपांतला चहा प्रमि-लेच्या कपांत ओतला. नीराही जागच्याजागीं स्वस्थ बसली. पण प्रमि-लेनें तोंडाला कप लावल्याबरोबर ती दचकली. तिनें नक्की पाहिलें होतें कीं मघां चहा घेतांना दादासाहेबांनीं कप तोंडाला लावला होता. मग त्यांनीं आपला उष्टा चहा प्रमिलेला घातला कीं काय ? त्यांनीं हें चुकून किंवा कसंही केलं असलं, तरी प्रमिलेच्या लक्षांत हें कसं आलं नाहीं ? आणि हीं दोघें अशी गोष्ट जाणून बुजून करतील तरी कशी ?

नीरेच्या मनाचा गोंधळ उडाला. जाग्यावरून उठतां उठतां तिनें म्हटलें, 'प्रमिले, मी जातें आतां. माई मग वाट बघेल. मी इथंच आहे आता. पुन्हां येईन कधीं तरी.' आणि ती लगबगीनें तेथून बाहेर पडली.

त्या रात्रीं जेवणेंखाणें झाल्यावर आपला नेहमींचा मंगळाचा जप करून माईनीं बिछान्यावर अंग टाकलें. नीरा शेजारींच आपल्या आंथरुणावर बसली होती. ' माई काय म्हणते आहेस तोंडातल्या तोंड्यांत ? या नीरेच्या प्रश्नाला माईनें म्हटलें, " मंगळाचा जप जपतें आहे मी. शिरीषला वाईट ग्रह आहेत सध्यां. त्यानं स्वतांच जपला असता तर त्याला आज अटक कशाला झाली असती ? "

म्हणजे ? माईला शिरीषकुमारांच्या अटकेची बातमी माहीत आहे तर ! आणि मग आज सबंध दिवस तिनें आपलें आतिथ्य करतांना मनांतलं हें दुःख कसं लपवून ठेवलं ?

माईचा किती चटकन् डोळा लागला ! नीरेनें तिच्या शांत मुद्रेकडे पाहिलें, तेव्हां तिच्या मनांत आलें, माईला ही शांति आणि हें समाधान कसं लाभतं ? आणि आपणच तेवढे तळमळतों आहों. मैफलीच्या सुरवातीपूर्वीं सभागृह चिकार भरलेलें असावें, साथीच्या वाद्यांची एक लय लागलेली असावी आणि गाणाराचा पत्ता असू नये. तसं कांहींसें आज आपलें होतें आहे, असें तिला वाटलें.

ती आंथरुणावर पडली; समोरच्या भिंतीवर एक फोटो होता. पुन्हां उठून तिनें तो जवळ जाऊन पाहिला. त्याच्याखालीं लिहिलें होतें,

" प्रसिद्ध भाषापंडित—प्रो. ब्रुगमन्, जर्मनी. '

कितीवेळ तरी तळमळत ती आंथरुणावर पडली होती. आसपास कुठेंतरी गाण्याची बैठक चालली होती, आणि स्वरसंमेलनांत तल्लीन झालेली गायिका म्हणत होती.

' मोरे राजा ! किवडियां खोलो बारिषकी बूंद पडी —'

---

# प्रकरण पांचवें

## लोहबंधांनीं जखडलेला कैदी !

आपण तळमळत आहों, या कल्पनेच्या आहारीं असतांनाच नीरेला झोंप लागली, पण आपल्याला झोंप लागली होती किंवा लागली असावी हें मान्य करण्याची तिच्या मनाची तयारी मात्र नव्हती. तरीही ती जागी झाली. ती जागी होत असतांना तिच्या कानीं माईच्या मंजुळ गाण्याचें स्वर पडले. पहांटेस उठून घरांतलि आवराआवर करण्यांत मग्न झालेली माई कामाचा शीण घालविण्याकरिता आणि प्रसन्न प्रभातकाळीं आपल्या देवाला आळविण्याकरितां सुरेल गळ्यानें म्हणत होती, " सुप्रभातीं थोडें तरी रे दुग्ध घेई प्रभुवरा ! " पाण्यानें भरलेलें एकादें भांडें, किंवा एकाद्या जड जिनसानें भरलेला मोठा पितळी डबा उचलतांना तिच्या गाण्यांत खंड पडला नाहीं, तरी आवाजाची शक्ति स्पष्टपणें कमी होत होती. माईच्या आवाजाचें तिच्या न कळत होणारें हें आकुंचन व प्रसरण त्या गाण्याच्या साध्याभोळ्या भावभक्तींत भर घालीत होतें. त्या गाण्याची साथ करण्याकरितांच जणूं स्टोव्ह चालू होता. समोरच्या बी. बी. सी. आय. पोलीस लाईनच्या आवारांत शिपायांची कवाईत चालू झाली होती. कवाईतीचे हुकूम सांगणाऱ्या अंमलदाराचें चढया स्वरांतलें बोलणें आंतल्या खोलींत स्टोव्हच्या साथींत चाललेल्या माईच्या गाण्यांत मिसळत होतें. जवळच्याच कोंपऱ्यावर कचरा वाहून नेणारी भली मोठी गाडी उभी होती. त्या गाडींत कचरा भरणाऱ्या कामगारांचीं एकमेकांशीं होणारी बोलणीं, पोलीस लाईनींतील कवाईती शिपायांच्या शिस्तवार हालचालींच्या आवाजाशीं अगदीं विसंगत वाटत होतीं.

अंगावरचें पांघरूण टाकून देऊन नीरा उठली, आणि ओचे खोवीत खिडकीशीं येऊन उभी राहिली. बाहेर पावसाची बारीक झिमझिम चालू

होती. रस्त्यावरचा गॅसचा दिवा अद्यापही विझलेला नव्हता. समोरच दिसणाऱ्या कवाईतीकडे पाहात असतांना नीरेला माईंची हांक ऐकूं आली. माई तिला म्हणत होती, " ऊठ आतां चहा होत आला हं. "

माईंचे हे उद्गार ऐकल्याबरोबर नीरेला वाटलें, आपल्याला खरी जागृति आली ती आतां आली ! इतका वेळ आपण कुठल्या तरी स्वप्नमय आभासांत तरंगत होतों. आपल्याला वाटत होतें कीं आपण जाग्या आहों. पण आपल्याला जागृति यावी म्हणूनच जणूं सृष्टीदेवीनें इतका वेळ तऱ्हे-तऱ्हेच्या आवाजांचें संमेलन करून उषागीत गायिलें ! आणि——

पण माईनें आंतून म्हटलें, " ऐकलंस का नीरे, आतां उगीच हंथरुणांत घुसळत बसूं नकोस. ऊठ बरं का ! ',

त्याबरोबर ती आंत गेली. तिने सभोंवार पाहिलें तों माईंची सारी व्यवस्था पार पडली होती. आतां फक्त चहा घेऊन स्नान करावयाचें उरलें होतें आणि माईनें आपल्या स्नानाचीही जय्यत तयारी केलेली दिसत होती. तिनें एक पांढरें स्वच्छ धोतर आडवें लावून घेतलें होतें. त्याचा पदर डाव्या खांद्यावरून मानेवर गोळा होऊन उजव्या खांद्यावरून खालीं उरःप्रदेशावर उतरला होता. माईंची गोरीपान पाठ आणि बरगड्यांजवळचा भाग हीं दोन्ही अनावृत होतीं. त्या पाठीवर विजेच्या दिव्याचा प्रकाश पडून त्या दिव्याचें चमकदार गोऱ्यापान कायेंत प्रतिबिंब पडल्या चाही थोडासा भास होत होता.

नीरेनें तोंड धुतलें आणि आपल्याच हातानें पाट मांडून [illegible] ती माईसमोर बसली. तिच्यापुढें चहा ठेवीत माईनें म्हटलें, " कांहीं जास्त कमी हवं असेल तर सांग हं. "

" माई, तूं असल्यानंतर जास्त कमी काय हवं असणार ?" चटकन् नीरेनें विचारलें.

सहज चेष्टा करायच्या उद्देशानें नीरेनें असें म्हटलें, पण त्यानें माईच्या तोंडावर किंचित् विषण्णता चमकून गेल्याशिवाय राहिली नाहीं. आणि आपल्या भावनांचा कल्लोळ जोरानें गिळतां यावा म्हणूनच जणूं

आपल्या पितळेच्या फुलपात्रांतील एक चहाचा घोट तिनें घेतला, अन् म्हटलें,

" काल तर कांहीं सबंध दिवसांत मुलाचा पत्ताच नव्हता. रात्रींही कांहीं कळलें नाहीं. आज आतां काय होतं आहे कुणास ठाऊक ? "

" काय होणार आहे माई ! मी आत्तां जाऊन कांहीं वर्तमानपत्रें आणतें, आणि तुला वाचून दाखवितें, त्या संपाचें आणि शिरीषकुमारांच्या अटकेचं काय झालं तें. "

" त्या गोष्टी तर काय ठरलेल्याच आहेत. "

" म्हणजे ? " एवढा एका शब्दाचा प्रश्न विचारतांना नीरेला माईच्या त्या उद्गारांचें कितीतरी आश्चर्य वाटत होतें ! आणि तें माईच्या पुढल्या बोलण्यानें शतगुणित झालें. तिनें म्हटलें—

" अटक कीं त्यामागून कोर्टात खटला, नि त्यानंतर तुरुंग हें ठरलेलंच आहे. "

माईचें हें बोलणें वरपांगी अगदीं साधें होतें. पण त्या उद्वेगाचे दाबलेले कढ स्पष्ट दिसत होते. एकुलत्या एक मुलावर असे प्रसंग एकसारखे येत गेल्यानें माईसारख्या वैधव्यानें होरपळलेल्या स्त्रीला असा उद्वेग येणें अगदीं साहजिक आहे, असें नीरेला वाटल्यावांचून राहिलें नाहीं. वस्तुतः माईला व्यावहारिक दृष्टीनें सारीं सुखें मिळवून देण्याइतका शिरीषकुमार कर्तबगार होता. पण राजकीय चळवळीच्या वावटळींत शिरीषकुमारांसारखे कल्पवृक्षही हादरत राहावेत, आणि त्यांच्या आश्रयाला आलेल्या शेकडों लोकांना भीतिग्रस्त करण्यास कारण व्हावेत हेंहि अगदीं स्वाभाविक होतें.

चहा झाल्याबरोबर नीरा तत्परतेनें उठली, आणि बाहेर पडली. ट्रॅम नाक्यापाशीं वर्तमानपत्रें विकणारीं पोरें वर्तमानपत्रें मांडून बसलीं होतीं. आजच्या वर्तमानपत्रांचें नीरेला फार महत्त्व वाटत होतें. आणि त्यामुळें तिनें निरनिराळ्या प्रकारचीं पांचसहा पत्रें विकत घेतलीं. घाईघाईनें घरीं येऊन तिनें पुनः स्वयंपाकघरांत बैठक मारली, आणि एकेका वर्तमान-

पत्राची जलदीनें पाहणी चालविली. त्यांतील एका वर्तमानपत्रांत विशेष विस्तारानें आणि ठळक मथळे घालून बातमी दिली होती, ती नजरेखालून घालतां घालतां तिनें माईला म्हटलें,

" पाहिलंस माई, मी म्हटलं तसंच होणार. शिरीषकुमारांना पकडलं खरं, पण त्यांच्या सुटकेची आशा आहे. "

" म्हणजे ! मी नाहीं समजलें तुझ्या बोलण्याचा अर्थ. "

" हें पहा ना ? या साऱ्या वर्तमानपत्रांनीं काल काय काय झालं तें लिहिलं आहे. परवां शिरीषकुमाराला अटक झाली. अटक झाली ती कल्याणच्या रेसिडेंट मॅजिस्ट्रेटच्या हुकमावरून ! काल त्यांना गिरगांव पोलीस मॅजिस्ट्रेटच्या समोर उभें करण्यांत आलं होतं. त्यावेळेला त्या मॅजिस्ट्रेटनीं पहा काय सांगितलं आहे तें. " आणि बोलतां बोलतां नीरेनें वर्तमानपत्रें हातांत उचलून घेत मॅजिस्ट्रेटचे उद्गार वाचून दाखविले. मॅजिस्ट्रेटनीं म्हटलें होतें, " आरोपी हे कल्याण रेसिडेंट मॅजिस्ट्रेटच्या अधिकारक्षेत्राबाहेर राहात असल्यानें चौदा मुंबई लॉ रिपोर्टच्या आधारें हें वॉरंट मी गैरकायदा ठरवून रद्द करतों. "

देवापुढें बसण्याकरितां सोवळ्यांतील दांडीवरचें लुगडें ओलेत्यानें ओढून घेऊन माई चुणीत होती, आणि नीरा वाचून दाखवीत होती, तो मजकूर ऐकत होती. तिच्या मुद्रेवर त्या वार्तेनें थोडीशी समाधानाची छटा उमटली. तिनें लागलीच विचारलें, " मग हें त्यानं आपल्याला कालच्याकालच कळवायला नको होतं का ? तिथून निघून लागलीच गेला असेल एखाद्या सभेंत भाषण करायला ! "

कोर्टाच्या खटल्यांचे बारकावे माईला कसे समजणार ! आणि त्यांतून शिरीषकुमारांसारख्या सरकारच्या डोळ्यावर येणाऱ्या पुढाऱ्यांना निरनिराळ्या कलमांची ओढाताण करून अटक करणाऱ्या सरकारी अंमलदारांच्या कारवायांची कल्पना चांगल्या जाणत्या माणसालाही चटकन् व्हावयाची नाहीं, ती माईसारख्या अडाणी बाईला कुठून होणार ?

नीरेलादेखील कायदेशीर जगाचें थोडें फार ज्ञान होतें. पण गिरगांव पोलीस स्टेशनवर तेथील चौथ्या प्रेसिडेन्सी मॅजिस्ट्रेटनीं एकादें वॉरंट रद्द ठरविलें तरी सरकारला अप्रिय आणि सरकारच्या डोळ्यांत सलणारी चळवळ करणाऱ्या पुढाऱ्याला तेवढयावरच सोडून देण्याइतकें सरकार उदार नसतें; निदान त्या पुढाऱ्यानें केलेले गुन्हे हे गंभीर स्वरूपाचे आहेत हे सामान्य जनसमूहाला वचक बसेल अशारीतीनें भासवून देण्यांत तें तरबेज असतें हें तिला ठाऊक होतें. त्यामुळें वॉरंट रद्द झालें तरी पुढें काय होणार याचा कयास करतां येणें शक्य नव्हतें. नाहीं म्हणावयाला त्याच वर्तमानपत्रांतून लहानशी बातमी देण्यांत आली होती. ती अशी होती, " कल्याण रेसिडेंट मॅजिस्ट्रेटच्या नॉनबेलेबल वॉरंटावरून महारबावडी पोलीसस्टेशनच्या पोलीसांनीं शिरीषकुमार यास अटक केली. त्यानंतर त्यांना महारबावडी पोलीसस्टेशनवर नेण्यांत आलें. ता. २२ रोजीं म्हणजे आज त्यांना कल्याण रे.मॅजिस्ट्रेटच्या कोर्टांत क्रिमिनल ट्राइब्स ॲक्टखालीं त्यांजवर भरण्यांत आलेल्या खटल्याच्या सुनावणीसाठीं हजर राहाण्यास सांगण्यांत आलें आहे. "

आणि या बातमीचा स्पष्ट अर्थ असा होता कीं शिरीषकुमार आज अकरा वाजतां कल्याणच्या रेसिडेंट मॅजिस्ट्रेटच्या कोर्टांत हजर होणार! तो अर्थ मनांत भरल्याबरोबर नीरेला वाटलें, आपण आज कल्याणला जावें, आणि काय प्रकार होतो तें प्रत्यक्षच पाहावें. शिरीषकुमारांसारख्या एका श्रेष्ठ पदवीधर पुढाऱ्याचा खटला खात्रीनें खळबळ उडविण्यासारखा होईल. आणि शिवाय आपण आजच्या आज साऱ्या गोष्टी स्वतः जाऊन पाहिल्या, म्हणजे मग ताणलेल्या उत्कंठेनें वर्तमान पत्रांच्या विक्रीची पहिलीं आरोळी वातावरणांत केव्हां उमटते आहे, याचीही असह्य वाट पाहावयाला नको! आणि याहीपेक्षां तिच्या मनांत शिरीषकुमाराची गांठ पडेल म्हणून जो विचार आला, त्यानें तर तिचा तडकाफडकी निश्चयच झाला. क्लेशमय अवस्थेंतही शिरीषकुमाराच्या पराक्रमाचें एक अपूर्व सौंदर्य आपल्याला पहावयाला मिळेल अशी विचित्र कल्पना मनांत आलेली जाणून तिचें तिलाच थोडेसें नवल वाटलें.

कांहीं वेळानें देवाचीं उपकरणीं चिंचेच्या बोटकानें घासून साफ करीत बसलेल्या माईजवळ जाऊन तिनें जेव्हां म्हटलें कीं, " माई, मी आज कल्याणला जातें, " त्यावेळीं माईनें तिला जो तात्काळ प्रश्न विचारला त्यानें तिला हसूं आलें, आणि आपण कल्याणला कां जात आहों तेंही माईला नीट सांगतां आलें.

" मी आज कल्याणला जातें, " या तिच्या म्हणण्यावर माईनें विचारलें होतें, " कशाला ? त्या कालच्या पोर्टरला पुन्हां भेटायला कां काय ? " " नाहीं ग माई ! आज कल्याणच्या कोर्टांत शिरीषकुमारांच्यावरचा खटला सुनावणीला निघणार आहे. "

" तूं तरी त्याच्यासारखीच विचित्र आहेस झालं. त्याची अहोरात्र वणवण चाललीच आहे, अन् त्याच्यामागें तूंही आतां निघालीस ! तूं नव्हतीस तेव्हां मला कांहीं वाटत नव्हतं; पण तूं आतां माझ्याजवळ आहेस, या विचारानें तूं कुठंही जाऊं नयेस असं आपलं मला वाटायला लागलं आहे. "

" पण माई, मी लागलीच परत येतें, फार वेळ नाहीं थांबत कल्याणला ! "

" तो तुझा नेम काय सांगावा ? भेटलं कुणी ओळखीचं कीं जाशील तिकडेच रमून. "

" छे. अगदीं नाहीं. अन् आज शिरीषकुमार निर्दोषी म्हणून सुटले तर त्यांना घेऊनच तुझ्याकडे धांवत येतें. "

माईला या आपल्या उद्गारांनीं आनंद वाटेल अशा अपेक्षेनें नीरेनें केलेल्या या भाषणाचा प्रत्यक्ष परिणाम मात्र अगदीं विपरीत झाला. माईचा चेहरा विषण्ण झाला आणि थोडयाशा चढया आवाजांत तिनें म्हटलें, " निर्दोषी ? शिरीषकुमाराला निर्दोषी म्हणून सोपस्कार करून सोडायला कोर्टकचेऱ्या कशाला हव्यात ? माझं आईचं मन आंतून साफ सांगतं आहे कीं मुलगा मुळांतच अगदीं निर्दोषी आहे. त्यानं काय कुणाच्या घरांना आगी लावल्या, का कुणाच्या पोरीबाळीं फुसलावून नेल्या, कां

कुणाच्या तिजोरीवर घाले घातले? काय केलं आहे त्यानं? गरिबींत जन्मला. गरिबींत वाढला. म्हणूनच गरिबांचा कैवार घेऊन उठला! गरिबांचा कैवार घेणं हा दोष, अन तो घेतला नव्हता असं ठरलं म्हणजे 'निर्दोषी' असंच ना!"

बोलतां बोलतां तिचा स्वर कंपित झाला, ऊर भरून आला, आणि तिच्या डोळयांच्या कडांशीं आंसवें डोकावूं लागलीं; पण चटकन मनाला आवर घालून तिनें आपल्या नुकत्याच लखलखीत केलेल्या देवांच्या पितळी मूर्तींकडे पाहिले आणि म्हटलें, "देव पाहून घेईल."

त्यावर माईला प्रसन्न करण्याकरितां नीरेनें उत्तर दिलें, "खरं आहे, माई, तूं म्हणतेस तें! तुझा देव, किंवा देव न मानणारे लोक 'परिस्थिति' 'परिस्थिति' म्हणून जी कांहीं म्हणतात ती मला वाटतं आतां अगदीं ऊताला यायची वेळ आली आहे."

"येऊं दे बाई" अन् माझ्या मुलाच्या कपाळींची ही सारी वणवण एकदांची मिटूं दे. त्याला कांहीं सुखाचं अन्न खायला मिळत नाहीं; तें मिळायला लागलं म्हणजे मग माझं कांहीं मागणं नाहीं."

× × ×

माईच्या मागें लागून नीरेनें तिला लवकर स्वयंपाक उरकावयास लावलें आणि जेवण करून ती कल्याणकडे गेली. तिला वाटलें होतें, कीं शिरीषकुमारांच्या खटल्याबद्दलच्या उत्कंठेचा भर आपल्याइतका वाटणारे फार लोक नसतील! पण कल्याण कोर्टाच्या आवारांत ती जाऊन उभी राहिली आणि तिनें सभोंवार पाहिलें, तों तिला शेंकडों कामगार व त्यांचें लहानमोठें म्होरके ठिकठिकाणच्या झाडांखालीं लहान लहान जमाव करून तिष्ठत उभे राहिले असल्याचें आढळून आलें. त्यांच्या साऱ्यांच्या बोलण्याचा किंबहुना चिंतनाचा एकच विषय होता आणि तो म्हणजे शिरीषकुमारांचा सुनावणीला निघणारा खटला! कितीतरी लोक आपापसामध्यें त्याच्या निर्दोषीपणाची ग्वाही देत होते.

पाऊस पडत नव्हता, पण सूर्यप्रकाशही नव्हता. काल सबंध रात्रभर पडून गेलेल्या पावसानें भोंवतालच्या सृष्टीवर अद्यापही ओलसरपणाची

छाया होती. पण मुंबईच्या हवेंत पाऊस पडत असतांही जास्त उष्मा होतो तसा उष्माही होत होता. वातावरणांत वाऱ्याची एकही झुळक उठत नव्हती. राजघराण्यांत एकादा प्रसूतिसमय घडत असतां घटकापळें मोजणारे ज्योतिषी जशा एकाग्रतेनें बसतात तशा निश्चलतेनें जणूं सारे वृक्ष पर्जन्याची पुन्हां पडणारी पहिली धार नेमकी केव्हां पडते हें जाणण्याकरितां कान टवकारून उभे राहिल्यासारखे वाटत होते! दूरच्या डोंगरापासून त्या कोर्टाच्या आवारापर्यंत पसरत आलेलें मैदान व त्यांतील लहानमोठया ओलसर वृक्षवेलींचे निःस्तब्ध पुंज पाहून, कोणातरी चित्रकारानें एकादें निसर्गदृश्य नुकतेंच पुरें करून सुकत ठेवलें असावें, असा भास होत होता.

इतक्यांत साऱ्याच लोकांना जागच्याजागीं चकित करून सोडणारा देखावा सर्वांच्या दृष्टीस पडला. रेल्वे लॉकअपकडून कल्याण गांवामधून रेसिडेंट मॅजिस्ट्रेटच्या कोर्टापर्यंत येण्याचा जो रस्ता होता, त्या रस्त्यावर शिरीषकुमारांना घेऊन येणारे लोक दिसूं लागले. शिरीषकुमारांना पायींच चालविलें होतें. मंडळी जसजशी जवळ येऊं लागली तसतसें साऱ्याच लोकांना आढळून आलें कीं, त्यांच्या हातांत हातकडया होत्या व उजव्य दंडाला दोर बांधलेला होता. त्यांच्या चारी बाजूला बंदुक घेतलेले चार सशस्त्र पोलीस होते. बरोबर एकदोन वकील व इतर चारपांच स्नेही मंडळी चालत होती. कोर्टाच्या आवारांत ती सारी तुकडी पोहोंचल्यावर शिरीषकुमारांना सशस्त्र पहाऱ्यांत बसविण्यांत आलें व पोलीस अधिकारी 'रिमांड' मागण्याकरितां मॅजिस्ट्रेटच्या खोलीकडे गेले.

सशस्त्र पोलीसांच्या पहाऱ्यांत बसलेल्या शिरीषकुमारांना पाहाण्याकरितां कितीतरी लोकांनीं गर्दी केली. शिरीषकुमारांना कोर्टांत घेऊन येण्याचा तो प्रकार पाहून नीरा जागच्याजागीं कांहीं वेळ खिळल्यासारखी झाली- एखाद्या धंदेवाईक दरोडेखोर गुन्हेगाराप्रमाणें लोहदंडांनीं आणि दोरखंडांनीं जेर करून आणण्याची ती पद्धत तिला ऐकून माहिती होती. पण विद्याभूषित अशा पदवीधर राजकीय गुन्हेगारालाही कोर्टांत आणण्या-

करितां हेच उपाय अमलांत आणले जातील अशी तिची मुळींच अपेक्षा नव्हती. त्यामुळें हा अगदींच अनपेक्षित प्रकार पाहून कांहीं वेळ चाकित होऊन राहाण्यापलीकडे तिच्या हातून कोणतीच गोष्ट घडणें शक्य नव्हतें.

शिरीषकुमारांबरोबर आलेल्या वाकिलांना जेव्हां तेथलि कांहीं लोकांनीं अनेक प्रश्न विचारून त्यांचीं उत्तरें मिळाविण्याचा यत्न केला तेव्हां ती स्तब्धच होती. पण मुद्यांच्या प्रश्नोत्तरांचे पडसाद ठिकठिकाणीं पसरत गेले. आणि ते तिच्यापर्यंतही पोहोंचले. वाटेनें शिरीषकुमारांना पायीं चालवीत आणणाऱ्या पोलीस अधिकाऱ्यांना त्या वकिलांनीं म्हटलें होतें, " श्री. पटवर्धन यांना आपण गाडींतून न्या. मी गाडीचें भाडें देतों. " त्यावेळीं पोलीस अधिकाऱ्यांनीं उत्तर दिलें, " आपली सूचना मी अमलांत आणली असती, पण वरिष्ठ अंमलदारांच्या हुकुमाशिवाय आम्हास कांहीं करतां येत नाहीं. "

त्याचप्रमाणें शिरीषकुमारांना जामिनावर मुक्त करण्याचा अर्ज घेऊन गेलेल्या वकिलांची व न्यायाधिशांचीं जीं बोलणीं झालीं तींही बाहेरच्या वातावरणांत झपाट्यानें पसरल्याशिवाय राहिलीं नाहींत. वकील अर्ज करण्याकरितां गेले तेव्हां न्यायाधीश आपल्या स्वतंत्र खोलींत बसून राहिले होते. त्यांच्या अंगांत फक्त एकच सदरा होता, डोकें उघडें होतें, आणि डाव्या हाताच्या पहिल्या बोटाची खूण कसल्याशा पुस्तकांत घालून तें त्यांनीं मिटले होतें. आणि त्याच हाताचें मनगट डोक्यावर टेकून तें पुस्तक उजव्या कानाशीं आणून त्यांनीं आढयाकडे दृष्टी लावली होती. त्यांनीं वकिलांकडे बऱ्याच वेळानें पाहिलें, आणि म्हटलें, " मला आतां वेळ नाहीं, अकरा वाजतां तुमचा अर्ज द्या. "

वकील—" आतां अकरा वाजून वीस मिनिटें झालीं आहेत. "

न्यायाधीश—" पण मला आतां वेळ नाहीं. "

न्यायाधिशांनीं इतका तिरसटपणा केला तरी वकिलांनीं तेथून काढता पाय घेतला नाहीं. शेवटीं चिडून जाऊन न्यायाधिशांनीं विचारलें,—

" तुमचं काय म्हणणं आहे ? "

ही संधि मिळतांच वकील इंडियन पीनल कोडमधील ॲबेटमेंटचें कलम वाचून दाखवूं लागले, तेव्हां खवळून जाऊन न्यायाधिशांनीं म्हटलें, " मला कायदा माहीत आहे. तुम्ही वाचून कशाला दाखवितां ? "

वकिलांनीं उत्तर केलें, " फार वाचीत नाहीं, थोडेंच वाचतों. "

त्यानंतर न्यायाधिशांनीं वकिलांचें म्हणणें ऐकून घेतलें, आणि सांगितलें, " मला, या बाबतींत रेल्वे प्रॉसिक्युटरचें म्हणणें ऐकून घ्यावें लागेल. म्हणून मी त्यांना सोमवारीं हजर होण्याबद्दल हुकुम देतों. "

तरीही आपला जमिनाचा अर्ज तात्काळ मंजूर व्हावा म्हणून वकिलांनीं आपलें बोलणें पुढें चालविलें. " कामगार पुढाऱ्यावर जेवढे हुकूम बजावणें शक्य होते तेवढे सर्व श्री. पटवर्धन यांजवर बजावण्यांत आले होते. संपाच्या हद्दींत त्यांना प्रवेश करतां येऊं नये, किंवा संपवाल्यांच्या सभांतून त्यांना भाषणें करतां येऊं नयेत म्हणून सरकारतर्फे शक्य तेवढी—खबरदारी घेण्यांत आली होती. "

" तें सारं ठीक असलं तरी गुन्हा घडण्यापूर्वीं संपवाल्याची एक गुप्त सभा भरली होती. तींत 'अत्याचाराशिवाय दुसरा मार्ग राहिला नाहीं' असा मि. पटवर्धन यांनीं उपदेश केला होता. " आणि आपल्या या बोलण्यावर सारवासारव करण्याच्या हेतूनें न्यायाधीशांनीं म्हटलें होतें, " मि. रणदिवे, मी हें आपलं सहज A piece of information म्हणून सांगितलं. असल्या बातमीवर विश्वसून मी माझा निकाल देईन असं अर्थातच नाहीं. मी हें सांगितलं तें एवढयाकरितांच कीं, सरकारचे अधिकारीही कांही अगदीं बोळ्यानं दूध पीत नाहींत, हें तुम्हाला समजावं. "

आणि असें म्हणून न्यायाधीश कोर्टाच्या इमारतीच्या बाहेर आले. तेथली सारी गर्दी पाहून त्यांचें पित्त अधिकच खवळलें. त्या साऱ्या लोकांना न्यायाधीशांनीं तावडतोब निघून जाण्याबद्दल ताकीद दिली. जे कोणी थांबतील त्यांना जागच्याजागीं पकडण्याचाही न्यायाधीशांनी हुकूम केला. आणि त्या हुकुमाप्रमाणें सुमारें शंभर लोकांना जागच्याजागीं अटक कर-

ण्यांत आली. न्यायाधीश तावातावानें बोलत होते आणि ही सारी धरपकड पाहात होते. त्यांच्या दृष्टीच्या टप्प्यांत रेंगाळणारे एक वकील आले, त्यांना त्यांनीं म्हटलें, " तुम्हीं असेंच रेंगाळत राहाल तर तुम्हालाही अटक करण्यांत येईल. "

त्यांच्याकडे आश्चर्यानें पाहात त्या वकिलांनीं विचारलें, "म्हणजे ? "

" म्हणजे काय ? अटक होईल. "

शांतपणानें ते वकील न्यायाधीशाजवळ आले व त्याना म्हणालें, " मला हक्क आहे या ठिकाणी उभे राहाण्याचा ! "

मग मात्र न्यायाधीश नरम आले.

पुन्हां आपल्या जामीन अर्जाची वरणी लावण्याकरितां शिरीष कुमारांच्या वकिलांनीं विचारलें, "—आणि आरोपीची प्रकृतीही जरा नाजुक आहे. "

त्यावरोबर मारक्या नजरेनें पाहात न्यायाधीशांनी म्हटले, " Oh, Don't talk rot. He is quite strong, stout and healthy. "

तरीही चार दिवसांनीं म्हणजे सोमवारी या अर्जाचा विचार होणार असें ठरलें.

S S S

जमल्यास शिरीषकुमारांना भेटावें, अशा उद्देशानें आलेली नीरा या साऱ्या प्रकारांपासून बुजरेपणानें दूर राहात होती आणि कानांवर काय पडेल तेवढेच ऐकत होती. तिची अन् शिरीषकुमारांची दृष्टादृष्टही झाली नाहीं. एकाच जागी ताटकळत उभ्या राहिलेल्या शरीरांतील मनाचा कोंडमारा क्षणोक्षणीं असह्य होत असल्याचा तिला भास होत होता.

आणि त्या तशा मनोवृत्तींत ती असतांनाच, शिराषकुमारांना ज्या पद्धतीनें आणलें त्याच पद्धतीनें नेण्यांत आलें. हातकड्यांनीं जखडलेली, दोरखंडांनीं आवळलेली अन् पोलीसाच्या पाहाऱ्यांत चाललेली शिरीषकुमारांचीं पाठमोरी आकृति ती कितीवेळ तरी पहात उभी होती. धांवत

जावें, साऱ्या मंडळींना कांहीं वेळ थोपवून धरावें आणि शिरीषकुमरांना मोठ्या आवेशानें सांगावें कीं, " ही पहा मी आलें आहे. तुम्हीं वरचे-वर विचारीत होता ना, कीं शिकुनसवरून तयार झालीस, आतां समाजा-करितां तूं काय करणार आहेस ? तुम्ही सांगाल ती कामगिरी करायला मी तयार आहे." पण हें सारें वाटणें जागच्याजागीं राहिलें आणि शिरीषकुमारांची पाठमोरी आकृति अस्पष्ट होऊन अदृश्यही झाली.

---

## प्रकरण सहावें

# मला 'माझें' असें जग कुठें आहे ?

दादरला घरीं जाण्याच्या मार्गावर असतांनाही नीरेच्या दृष्टीपुढील तें शिरीषकुमारांच्या पाठमोऱ्या आकृतीचें करुण चित्र किती वेळ तरी हाललें नाहीं. शिरीषकुमारासारख्या एका संभावित नागरिकाची एक राजकीय आरोपी म्हणून झालेली ती संभावना तिला जितकी अनपेक्षित होती तितकीच दुःखदायक होती. आणि तिला न्यायालयाचा, तेथील शिस्तीचा आणि आरोपींना वागविण्याच्या पद्धतीचा मनस्वी राग आला. पीनल कोडांतील कलमें तयार करणारीं माणसें माणसेंच होतीं कीं दुसरें कांहीं होतीं, असा तिनें मनाला कितीदांतरी प्रश्न विचारला ! आपल्या वडिलांच्या तोंडचे कायद्याच्या मीमांसेचे शब्द तिनें पूर्वी शेंकडोंवेळां ऐकले होते. त्यांचे स्मरण होऊन तर तिला हा प्रश्न वरचेवर विचारण्याचा अनावर मोह होत होता. तिचे वडील म्हणत असत, 'Law is after all common sense.' पण आजच्या कायदेशीर प्रकारांत तिला सारासार विचाराचा मागमूसही आढळला नाहीं !

हा तिचा वैताग जसजसा वाढत गेला तसतशी कोर्टाच्या आवारापासून दूरदूर जाणारी शिरीषकुमाराची पाठमोरी आकृति तिच्या अन्तर्दृष्टीसमोर अधिकाधिक स्पष्ट होत गेली. आणि कांहीं वेळानें मागें अनुभवलेल्या एका प्रसंगाची तिला आठवण झाली. टिळकांच्या मृत्यूनंतर एकदीड वर्षाच्या अवधींत कांहीं हौशी सुविद्य लोकांनीं 'मृच्छकटिक' नाटकाचा प्रयोग केला होता. प्रयोगाचें सारें उत्पन्न टिळकपर्सफंडाला मिळणार होतें. त्या काळांत विशेषतः 'टिळक' हें नांव उच्चारलें कीं साऱ्या तरुण स्त्रीपुरुषांना कांहीं अवर्णनीय संवेदनांनीं आपलें सारें शरीर मोहरून गेल्याचा भास होत असे. आणि म्हणून 'मृच्छकटिकाच्या' तालमी मोठ्या मेहेनतीनें करून त्या नाटकाचे तीन प्रयोग होण्याचें

जेव्हां जाहीर झालें त्यावेळीं हजारो प्रेक्षकांनीं तिकिटें विकत घेण्याची जबरदस्त तत्परता दाखविली. या ' मृच्छकटिक ' नाटकाच्या प्रयोगांत शिरीषकुमारांनीं चारुदत्ताची भूमिका घेतली होती. शिरीषकुमारांचा गळा लहानपणापासूनच गोड होता आणि गळयाच्या भरीवपणामुळें संगीतांतील रसाविर्भाव करण्याच्या कामीं त्यांचा आवाज मोठा कौशल्यपूर्ण वाटत असे.

त्यावेळच्या प्रयोगांचीं लोकप्रियताही पुष्कळ अंशीं शिरीषकुमारांच्या चारुदत्ताच्या भूमिकेवरच अवलंबून होती आणि ती त्यांनीं वठविलीही फार सुंदर ! विशेषतः शेवटच्या अंकांतील लोहशूल खांद्यावर घेऊन वधस्तंभाकडे जाण्याचा प्रवेश गायन व अभिनय या दोन्ही दृष्टींनीं शिरीषकुमारांनीं अगदीं अप्रतिम करून दाखविला. त्यावेळीं प्रेक्षकांत रामकृष्णबुवा वझे प्रभृति गायक होते, त्यांनींही गहिंवरलेल्या गळयानें ' चारुदत्ता'ची तारीफ केली. फार कशाला, नीरेचे वडील शिरीषकुमारांनीं नाटकांत भूमिका करण्याच्या विरुद्ध होते. त्यांतून हे प्रयोग टिळकपर्सफंडकरितां होणारे ! तेव्हां साहजिकच त्यांनीं या प्रयोगाबद्दल घरीं दोन तीन वेळां आपली तीव्र नापसंती व्यक्त केली होती. असें असूनही गांवांतलि ज्या कित्येक संस्थांनीं सामुदायिकरीतीनें नाटकाचीं तिकिटें विकत घेतलीं त्या संस्थांचे अध्यक्ष म्हणून त्यांना तिकीट घ्यावें लागलें. आणि प्रयोग पाहून घरीं आल्यावर दुसऱ्या दिवशीं जेवतांना त्यांनीं मोठ्या कौतुकानें म्हटलें, " हा शिरीषकुमार पोरगा आहे मात्र मोठा हुन्नरी हं ! काल त्यानं नाटकांत काय काम केलं आहे ! मला अगदीं 'भाऊ'ची आठवण झाली ! शेवटच्या प्रवेशांतील'बाळा घालोनिया गळां' हें गाणं तर ऐकतांना माझ्या दृष्टीपुढं मूर्तिमंत ' भाऊ ' उभा राहिला ! "

एवढया मोजक्या शब्दांतच स्तुति करून नीरेच्या वडिलांनीं शिरीषकुमारांच्या भवितव्याबद्दल निराशेचे उद्गार काढले होते. त्यांचें म्हणणें होतें कीं शिरीषकुमाराची सारी हुशारी व सारा चलाखपणा असल्या वायफळ गोष्टी करण्यांत खर्ची पडणार ! पण हे उद्गार काढतांना त्यांनीं आपली कसलेली कायद्याची बुद्धि चालवून शिरीषकुमाराच्या स्वभावाची

जी मीमांसा केली होती ती मात्र खात्रीनें फार मार्मिक होती ! ते म्हणाले होते, " अरे अन्यायाची चीड येत नाहीं असा कोण आहे ? आम्हाला तरी अन्याय आवडतो असं थोडंच आहे ? उलट अन्यायाला प्रतिकार करून न्यायाला या जगांत सारखा वाव मिळावा म्हणून तर आम्ही न्यायदेवतेच्या पायाशीं बसून आहों. पण अन्यायाची चीड आली तरी संताप किती करून घ्यायचा आणि तो दाखवितांना किती मर्यादेपर्यंत दाखवावयाचा याला कांहीं सीमा आहे. उगीच उठल्या बसल्या सारखं आपलं रक्त सळसळत ठेवणं म्हणजे कांहीं फारसं शहाणपणाचं नाहीं. हा पोरगा पाहावा तर चोविस तास अगदीं तापलेला ! "

तो नाटकाचा प्रयोग आणि त्यानंतरचें तिच्या वडिलांचें बोलणें यांची तिला आठवण झाली. या दोन प्रसंगांच्या आठवणीचे मनावर होणारे आतांचे परिणाम हे अगदीं वेगवेगळया स्वरूपाचे होते. नाटकांतील चारुदत्ताची भूमिका आतांहि तिच्या डोळयांपुढें स्पष्टपणें उभी राहिली त्याचें कारण मघां तिनें पाहिलेली शिरीषकुमारांची मूर्ति रंगभूमीवर तिनें पाहिलेल्या त्याच्याच चारुदत्ताच्या भूमिकेसारखी तिला भासली. कोर्टाचें आवार किंवा तेथून रेल्वे लॉकअपकडे जाण्याचा रस्ता हें सारें आपण पाहिले ते कांहीं खरें नव्हेंत. ते केवळ आभासमय होते. लोहदंडांनीं जखडलेले शिरीषकुमार आपण पाहिले पण तो चारुदत्त होता ! अशा मनाच्या संभ्रमांत प्रत्यक्ष अनुभवलेली वस्तुस्थिति व नाटकांतील अभिनयमूर्ति यांचें एकमेकांत विलीन होणारें अभेदरूपही तिला भासत होतें !

याच्याच अनुषंगानें तिला वडिलांचे शब्द आठवत होते हें खरें ! पण त्या शब्दांनीं व्यक्त केलेली शिरीषकुमारांची मनोघटना तिला आतांच्या प्रसंगीं अधिकाधिक पटत चालली ! अन्यायाची अपरंपार चीड घेऊन उठणें हा शिरीषकुमारांचा मनोधर्म होता. ती चीड घेऊन उठण्याचा परिणाम आज किती विपरीतपणानें अनुभवास आला. अन्यायाचा प्रतिकार करणाऱ्या माणसावर न्यायदेवतेच्या मंदिरांत बंधनमय अवस्थेंत अमानुष क्लेश भोगण्याची पाळी यावी, आणि —

पण मन कितीही भरकटलें तरी ती बसली होती त्या गाडीला ठराविक बंधनें होतीं. आणि गाडी थांबून मासे विकणाऱ्या कोळ्यांच्या बायका जेव्हां आपले जंगी हारे सरसावून एकमेकींत 'दादर' आल्याची भाषा बोलूं लागल्या, तेव्हां त्यांच्या त्या कर्कश इशाऱ्यानें नीराही भानावर आली.

भानावर आल्यावर तिला एक नवीनच पेंच पडला. आतां घरीं गेल्यावर माईला झाला प्रकार कसा सांगावयाचा, हाच तो पेंच होता. कालपासून माई म्हणजे एक तिला कोडें वाटूं लागलें होतें. उद्वेग आवरण्याची पराकाष्ठा करण्यांत कोणाला माई हार जायची नाहीं हा अनुभव तिनें कालच घेतला होता. पण कोणत्या बोलण्यानें तो कसा वर उसळून येईल याचाही कांहीं नेम नाहीं हेंहि तिनें कालपासून दोन तीन प्रसंगीं पाहिलें होतें.

ती घरीं गेली, तेव्हां दरवाजा बंद होता. नुसती दारावर थाप पडण्याचा अवकाश! दार मोठया तत्परतेनें उघडलें गेलें. आणि नीरेला पाहिल्याबरोबर माईनें उत्कंठेनें विचारलें, "काय ग? काय झालं?"

आणि नीरा दारांतून शिरतां शिरतां दारांतून बाहेर पाहिल्यासारखें करून तिनें म्हटलें, "अन् नीरे, शिरीष कुठें दिसत नाहीं तो! आज सकाळीं तूं म्हणाली होतीस ना कीं, मी त्याला बरोबरच घेऊन येते!"

तो विनोद ऐकून नीरेच्या मनांत आलें, "अरेरे! माईच्या अंतःकरणानें ही केवढी यातायात मांडली आहे! प्रत्यक्ष पोटच्या मुलाच्या क्लेशानें ती काय व्याकुळ होत नव्हती? त्याच्या कारागृहवासाच्या कल्पनेनें काय तिला यातना होत नव्हत्या? एक तूं तरी जगशील, किंवा तुझा मुलगा तरी जगेल, अशी अट घालून तिला जर कुणी रोखलें असतें तर तात्काळ आपल्या प्राणांची आहुति देण्याची तिनें तत्परता दाखविली असती! ती माई असला थट्टा विनोद कां करते? याचें कारण एकच आहे. आणि तें म्हणजे आपल्या अंतःकरणाच्या असह्य वेदना लपवितांना आपण त्या लपवीत आहों असा दुसऱ्याला नुसता

भासही होऊं नये. इतकेंच नव्हे तर त्यांत दुःख मानण्यासारखं काय आहे असें दुसऱ्याला पटवून देण्याची धडपड करतांना तिला असला थट्टाविनोद करावा लागत होता. ”

क्षणमात्रच नीरेच्या मनानें माईच्या हालचालींचा हा अर्थ करून पाहिला, पण ‘ शिरीष कुठें दिसत नाहीं तो ? ’ हा प्रश्न विचारतांना तिनें केलेले प्रसन्न स्मित पाहून तिला आपलें हृदय हालून गेल्याचा भास झाला. कळवळून माईला मिठी मारीत तिनें फक्त अतिशय आर्तपणानें हांक मारली, ‘ माई....’

‘ असं काय करावं नीरे; उठल्याबसल्या आपण जर रडायला लागलों तर कसा निभाव लागायचा ? ’

‘ पण माई, डोळ्यांनीं साऱ्या गोष्टी पाहिल्या म्हणजे कांहीं सहनच होत नाहीं त्याला काय करायचं ? ’

‘ अग पण असं सहन न होण्यासारखं काय झालं कोर्टांत ? ’

त्या दुःखांतही नीरेला माईची ती खुबीनें प्रश्न विचारून माहिती काढून घेण्याचीं कला मोठी चातुर्याची वाटली !

तिनें उत्तर केलें, ‘ माई, गुन्हा झाला म्हणून काय झालं ? चांगल्या शिकल्यासवरलेल्या माणसाला असं हातकड्या घालून कोर्टांत रस्त्यानं मिरवीत आणायचं असतं कां ?

“ अग वेडे, सरकारदरबारीं जो गुन्हा ठरला त्याच्या शिक्षेची अंमलबजावणी होतांना माघार घेऊन कसं चालेल ? ”

“ छे, ही शिक्षेची अंमलबजावणी कसली ? हा छळ आहे. ’

“ छळ असला तरी सहन केला पाहिजे. आजपर्यंत असा छळ कितीतरी लोकांनीं सहन केला आहे. प्रत्येक नव्या छळागणिक आपलं पाऊल पुढं पडत असतं. आपल्यांत देवपण येत असतं. ”

“ असल्या राक्षसांच्या राज्यांत देवपण येऊन काय करायचंय ? आयुष्यांत दुःखं यावींत. नाहीं कोण म्हणतं. पण विस्तवाची आंच लागायची ती लाह्या फुलण्यापुरती लागावी, कोळसा होऊन जाण्याइतकी लागूं नये. दुःखं, छळ या साऱ्यांचा आपल्याला उपयोग असेल तर तो जीवितां-

तील कर्तृत्वाच्या लाह्या फुलण्यापुरत्या ! त्याची राखरांगोळी होण्याकरितां नव्हे. ”

हा सारा दुःखाचा पहिला उमाळा ओसरल्यावर नीरेनें माईला सारी हकीकत नीट सांगितली. त्या हकीकतींत नीरेनें आपल्या पदरच्या कल्पना-शक्तीनें हृदयस्पर्शी वर्णनें करून शिरीषकुमारांवरील प्रसंगाची तीव्रता भासवून दिली. ती सारी हकीकत ऐकून एक अस्पष्ट उसासा टाकून माई म्हणाली, “ समुद्रांत उडी घातल्यावर कोणती लाट जलसमाधी देईल एवढीच वाट पाहाणं आपल्या हातीं आहे. दुसरं काय करायचं ? ”

त्यानंतर मात्र माई अगदीं स्तब्धपणानें संध्याकाळच्या कामाला लागली. आणि दोघींचें किरकोळ बोलणें मधून मधून होत होतें. त्यालाही जणूं खंड पडावा म्हणूनच पावसाची एक जोराची सर कोसळली. त्या सरीच्या आवाजानें सारें बोलणें जागच्याजागीं विरून जात होतें. साऱ्या इमारतींच्या छपरांवर मुसळप्राय जलधारा आपटत होत्या. जणूं एखाद्या घनचक्कर युद्धाची ग्वाही देणाऱ्या नगाऱ्यांचा प्रचंड तडतडाट चालला होता !

माईनें नीरेला म्हटलें, “ नीरे, शिरीषच्या खोलीची खिडकी उघडी असली तर लाव बरं. एकदां वेडावांकडा पाऊस आंत आला म्हणजे काय काय भिजवून टाकील त्याचा नेम नाहीं. ”

तेव्हां नीरा शिरीषच्या खोलींत गेली. खिडक्या लावलेल्या होत्या. खोलींतील टेबलावर मोठमोठ्या फाइली एकावर एक रचून ठेवल्या होत्या. पुस्तकांच्या शेल्फमध्यें भाषाशास्त्र व समाजशास्त्र यांवरील कांहीं ग्रंथ कप्यांत लावून ठेवले होते. खालच्या कप्यांतून अर्थशास्त्र व राजकारण यांवरील काहीं पुस्तकें होतीं. टेबलाच्या खालीं मोकळ्या जागेंत बाजाची पेटी ठेविली होती, आणि त्या पेटीवर गवासणींत ठेवलेला दिलरुबा होता. भिंतीवर निरनिराळे देखावे आणि फोटो लावले होते. टेबलावर मॅक्झिम गॉर्कीचा उभा फोटो होता. त्याच्या डाव्या बाजूला याकोबी व उजव्या बाजूला प्रो. ब्रूगमन् यांचे फोटो होते. कॉटशेजारच्या भिंतीवर नखचित्रें

लावलेलीं होतीं. त्यांतील एका नखचित्राखालीं ‘ क्षितिजापलीकडे ’ असें शिरीषकुमारांच्या बारीक हस्ताक्षरांत लिहिलें होतें, आणि चित्रांतील उजव्या कोपऱ्यावर डौलदार लपेटींनीं ‘ शिरीष ’ अशीं तीन अक्षरें कोरलीं होतीं. चित्रांतील म्हाताऱ्या प्रवाश्याच्या मागें फक्त धूसर आकाशाची पार्श्वभूमि होती. डाव्या बाजूनें अशोकाचीं झाडें होतीं. त्याच्या पाठीवर ओझें होतें आणि तो काठी टेंकून शून्य वातावरणांत पाहात उभा राहिला होता.

× × × ×

कल्याण रेसिडेंट मॅजिस्ट्रेटनीं शिरीषकुमार पटवर्धन यांस जमिनावर सोडण्याचें नाकारलें ! त्यानंतर कांहीं दिवसांनीं ठाणें डिस्ट्रिक्ट सेशन्स कोर्टांत कल्याण येथील हुकमाविरुद्ध अपलि करण्यांत आलें. अपील अर्ज सादर करतांना अॅ. रणदिवे यांनीं थोडेसें भाषण केलें. त्या भाषणांत त्यांनीं सांगितलें,

‘ श्री. पटवर्धन यांच्या विरुद्ध पोलिसांच्याजवळ फार पुरावा आहे, असें सांगण्यांत येतें. मग त्यांनीं तो कोर्टांत पुढें कां आणला नाहीं ? वास्तविक त्यांनीं तो पुढें आणावयास पाहिजे होता. पण श्री. पटवर्धन यांच्याविरुद्ध पोलिसांजवळ पुरावाच नाहीं. पोलिसांजवळ जो कांहीं पुरावा आहे, तो टाकाऊ, अविश्वसनीय आणि मागाहून सुचलेला दिसतो. श्री. पटवर्धन यांना तुरुंगांत ठेवतां यावें म्हणून तो मागाहून तयार करण्यांत आला असावा. श्री. पटवर्धन यांच्या विरुद्ध इं. पीनल कोडांतील ३२३, ३२६, १४४, व ३४ कलमांसह १०९ कलमाखालीं—आरोप ठेवण्यांत आला आहे.

१०९ कलमाखालीं निरनिराळया गुन्ह्यांना चिथावणी देण्याचा आरोप श्री. पटवर्धन याजवर करण्यांत आला आहे. पण त्यांच्याविरुद्ध हें कलम लावतां येत नाहीं. रेल्वे संपासंबंधांत पकडलेल्या लोकांवर ज्या गुन्ह्याचा आरोप आहे, तो गुन्हा श्री. पटवर्धनांच्या चिथावणीमुळें झाला असें सिद्ध झालेलें नाहीं. फिर्यादीनें तक्रार केलेला मुख्य गुन्हा जेव्हां घडला

त्याच्या पुष्कळ अगोदर श्री. पटवर्धन यांनीं भाषण करून अत्याचाराचा उपदेश केला, असें प्रॉसिक्युशनचें म्हणणें आहे. पण हा पुरावा अत्यंत मोघम आहे. ज्या गुन्ह्याला चिथावणी दिल्याचा आरोप आहे त्यापेक्षां वेगळे गुन्हे केल्याबद्दल या प्रकरणांतील दुसऱ्या आरोपींना अटक करण्यांत आली आहे. त्यामुळें आरोपिवर १०९ कलम लागू होत नाहीं. ३२६ कलमाखालीं गुन्हा प्रत्यक्ष करणारावरच आरोप ठेवण्यांत येतो. पण सदर गुन्हा करणारांत श्री. पटवर्धन नव्हते. रेल्वेहद्दींत शिरण्याची मनाई करणारा हुकूम श्री. पटवर्धन यांनीं मोडल्याचें सिद्ध झालेलें नाहीं. कल्याण रे. मॅ. नीं पटवर्धनांना जामिनावर सोडण्याचें नाकारलें असलें तरी डिस्ट्रिक्ट कोर्टाला क्रिमिनल प्रो. कोडाच्या ४९८ कलमाखालीं व्यापक अधिकार असून त्यांना जामिनावर सोडतां येईल.'

या वकिलाच्या बोलण्यावर न्यायाधीशांनीं निकाल देतांना पुढील आशयाचे उद्गार काढले होते.

'श्री. पटवर्धन हे रेल्वेच्या हद्दींत येत नसले तरी सेनापतीसारखे दूर राहून ते सर्व सूत्रें हालवीत होते. त्यांची प्रकृति बळकट, दणकट व निरोगी आहे. म्हणून त्यांना जामिनावर सोडण्याचें कारण नाहीं.'

दरम्यानच्या काळांत मुंबईंत जाहीर सभा भरून या प्रकाराचा निषेधहि करण्यांत आला. एखाद्या संभावित नागरिकाला बेकायदा अटक करणें, अटक केल्यावर हातकड्या घालणें व दोऱ्यांनीं बांधणें व सामुदायिकरीत्या कामगारांची अटक करविणें या साऱ्याच दडपशाहीच्या प्रकारांचा जाहीर सभेंत उल्लेख झाला होता.

आणि ज्या भाषणानें शिरीषकुमार पटवर्धन यांजवर हा प्रसंग ओढवला होता, त्या भाषणांतील कांहीं उतारे निरनिराळ्या वर्तमानपत्रांनीं प्रकाशित केले होते. त्या साऱ्या उताऱ्यांचें वाचन करणाऱ्या कोणाहि वाचकाला त्या भाषणांत खटला करण्यासारखें काय आहे असा खरोखरच प्रश्न पडला असता !

खटल्याचें काम जसजसें दिवसगतीवर पडत चाललें तसतशी साऱ्याच वाचकांची उत्कंठा कमीकमी होत गेली. कारण खटला प्रत्येक दिवशीं

असा चाललाच नव्हता. आठ आठ दहा दहा दिवस मध्यें अगदी माकळे पडूं लागले. आणि नीरेचेंही मन या खटल्याच्या कामांत अगदीं एकाग्र राहिलें नाही. तरी शक्यतोंवर त्यासंबंधीची अगदीं ताजी बातमी काय आहे हें पहाण्याचा ती प्रयत्न करी. पण खटल्याचा सारा पहिला भर ओसरल्यावर आपण मुंबईकडे निघालों ते स्वतंत्र जीविताचा मार्ग आक्रमण्याकरितां निघालों याचीही तिला वरचेवर जाणीव होऊं लागली. कित्येक वेळां ती एकट्याशीं विचार करीत बसली म्हणजे ही जाणीव तिला असह्य होई. ती मनाशींच म्हणे, " शिरीषकुमार आपापला मार्ग प्रभावीपणानें आक्रमीत आहेत. प्रमिलेला शाळेचें जग आहे, माईला तिचा देव आणि त्याची पूजा-अर्चा आहे. पण मला काय आहे ? अमुक एक गोष्ट माझी मी करतें आहें असें बोट दाखवून सांगण्यासारखी कोणती गोष्ट मी आतापर्यंत केली ? आणि आतापर्यंतचें एक सोडून दिलें, तरी यापुढें तरी मी काय करणार आहें ? " आणि अशा विचारांनीं विषण्ण झालेलें तिचें मन चारी बाजूंनीं रोखून धरलेल्या अशराफ जनावराप्रमाणें गोंधळून जात असे.

स्वतांकरितां मार्ग शोधण्याचा ती प्रयत्न करीत असतां तिला सध्यां एक आशा उत्पन्न झाली होती. त्या आशेंत गुरफटल्यामुळें तिचें शिरीषकुमाराच्या खटल्याकडील मन स्वतांबद्दलच्या विचारांकडे वळूं लागलें. पण आपल्याला मोकळा वाटणारा आणि ग्राह्य असणारा हा नवा मार्ग पतकरतांना आपण कुणाला सल्लामसलत विचारणार ?

असा प्रश्न पडला म्हणजेही ती गोंधळून जात असे. तिच्या मनापुढें वडील, आई, शिरीषकुमार यांच्या मूर्ति पुन्हां पुन्हां येत. पण त्या साऱ्या मूर्ति आपापल्या परिघांत एकसारख्या फिरत असल्याचा तिला फार भास होई. यांच्यापैकीं कोणाला थोपवून धरावयाचें ? कोणाला सल्लामसलत विचारावयाची ? आपल्याला साहाय्य करण्याइतकी यांना उसंत कोठे आहे ? आणि उसंत असली तरी त्यांना आपण चालविलेला उद्योग मान्य होईलच हें तरी शक्य कशावरून ?

आणि अशा विचारांच्या धुमश्चक्रीनें ती व्याकुळ होऊन जाऊ लागली ! ती अशी गोंधळून गेली म्हणजे शिरीषकुमारांना ज्या भाषणामुळें अटक झाली होती तें पुढें घेऊन ती वाचूं लागे. तें भाषण वाचून झालें म्हणजे तिला मनाशीं मोठा प्रश्न पडे कीं, "या भाषणांत अन्यायाचं असं काय आहे ? गरीबांना योग्य मार्ग दाखवून देण्याचा प्रामाणिक प्रयत्न करणाऱ्या अशा तळमळीच्या पुढाऱ्याला गुन्हेगार म्हणून अटक कां व्हावी ?" आणि असे प्रश्न मनांत उभे राहिले म्हणजेही तिला वाटें कीं आपण गेल्या कांहीं दिवसांत घर सोडण्यासारखे प्रकार करण्यापासून तों येथें मुंबईस एका अनाथाश्रमांत स्वतंत्ररीतीनें नोकरी करण्याचें मुकर करीपर्यंत ज्या गोष्टी केल्या त्या साऱ्याच चुकत गेल्या !

एके दिवशीं रात्रीं ती हंथरुणावर पडली असतां तिची ही अशा प्रकारची तळमळ कांहीं केल्या शांत होईना तेव्हां पुन्हां पुन्हां तिनें त्या भाषणांतील उतारे वाचावयाला घेतले. त्यावेळीं तिला माईनें म्हटलें, " मला तरी वाचून दाखीव काय वांचीत आहेस तें."

आणि मग तिनें वाचावयास सुरवात केली.

आजच्या समाजव्यवहारांत इतका विलक्षण व तीव्र विरोधाभास माजला आहे कीं, त्याच्यामुळें गाढ विचारवंतही गांगरून गेले आहेत. असें कां व्हावें ? सर्व लोकांना सुखासमाधानानें जगतां यावें याकरितां जरूर त्या साधनांची आज उणीव आहे कीं काय ? जर नसेल तर संसार सुखावह न होतां तो जास्तजास्तच बिकट कां होत चालला आहे ? या गोष्टींचा चौकसपणें विचार करण्याची वेळ येऊन ठेपली आहे.

पूर्वीं मनुष्यप्राणी अगदीं रानटी अवस्थेंत होता, त्याला चरितार्थाचींही साधनें उपलब्ध नव्हतीं. तो काळ आतां राहिलेला नाहीं. मनुष्यानें चिकाटीनें निसर्गाशीं व अडचणींशीं सतत झगडून अनेक नवीं साधनें शोधून काढलीं आहेत. आज तो प्रगतीच्या मार्गावरील अशा टप्याला येऊन पोचला आहे कीं, आवश्यक असणाऱ्या वस्तूंची त्याला मुळींच ददात वाटूं नये, व सुखासमाधानानें त्याचें आयुष्य चालावें. असें

असूनसुद्धां जगांतील धनधान्य उत्पन्न करणारा बहुजनसमाज जगण्याच्या प्राथमिक गरजाही नीट भागत नाहींत म्हणून दुःखांत व कष्टांत अहोरात्र खितपत पडला आहे. उजाडला दिवस कसा पार पडणार या विवंचनेनें त्याला घेरून टाकलेलें आहे. असें कां व्हावें ?

वास्तविक गेल्या शंभर दीडशें वर्षांत उत्पन्नाचीं इतकीं साधनें वाढलीं आहेत कीं, बहुजनसमाजाच्या गरजा भागविण्याकडे त्यांचा नीट उपयोग केला गेला तर मनुष्याला तीन तासांपेक्षां अधिक श्रम करण्याची गरजच राहाणार नाहीं. इतकेंच नव्हे तर त्याच्या श्रमाचा त्याला पुरेपूर फायदा मिळाला तर आजच्यापेक्षां त्याची राहाणी इतकी चांगल्यातऱ्हेची होईल व त्याला शिक्षण व संस्कृतिवर्धन याच्याकामीं इतका मुबलक वेळ मिळेल कीं, साऱ्या हिंदुस्थानांत अज्ञान, दारिद्र्य इत्यादींचा मागमूसही राहाणार नाहीं. प्रत्येक मनुष्य चौकस, सज्ञान व साधनसंपन्न बनेल.

गेल्या शंभर वर्षांत साऱ्या जगांतील उत्पादनाची शक्ति ३८०टक्क्यांनीं वाढली आहे. पण मनुष्याचें सुख त्या मानानें वाढलें आहे कां ? नाहींच नाहीं. उलट पूर्वीं हिंदी शेतकरी अन्नाला केव्हांच महाग नसे. पण आतां मात्र त्याला वर्षांतून कित्येक दिवस अर्धपोटीं राहावें लागतें, तर कित्येक दिवस खडखडीत उपास करून दिवस कंठावे लागतात. एका बाजूनें उत्पादनाची एवढी भरभराट व्हावी आणि दुसऱ्या बाजूनें शेतकरी व कामकरी वर्गाची एवढी दैना व्हावी, असा हा भेसूर देखावा आहे.

आज समाजांत उत्पादन जरी कितीहि वाढलें असलें तरी तें सर्व उत्पादनाची मुख्य साधनें म्हणजे कारखाने व जमिनी यांची सत्ता ज्यांच्या हातीं आहे त्यांच्या नफेबाजींत विरून जात आहे. उत्पादन साधनाचा आज इतका विलक्षण विकास झाला आहे कीं, त्यांचा भांडवलशाही चौकटींत समावेश होऊंच शकत नाहीं. यामुळें या विकासाचा कोंडमारा होत आहे.

गिरण्यांत उत्पादनशक्ति इतकी वाढली आहे कीं हिंदुस्थानांतील

प्रत्येक माणसाला बारा सदरे व चार धोतरजोडयां सहज मिळाल्या पाहिजेत. पण वस्तुस्थिति अशी आहे कीं, देशांतील शेकडा ७८ लोकांना धड लंगोटीसुद्धां मिळत नाहीं. आणि पुष्कळांना एकाद्या धोतरावरच भागवावें लागतें.

मनुष्यमात्राच्या सुखसमाधानांत सारखी भर पडावी व त्याची सांस्कृतिक उन्नति होत जावी याकरितां जीवितोपयोगी वस्तूंची पैदास केव्हांहीं खंड न पडतां चालू राहिली पाहिजे. परंतु आज याच्या अगदीं उलट दिसून येतें. गिरण्या बंद पडतात, संप होतात, याचें कारण भांडवलदारांच्या नफेबाजींत आहे.

असलीं ही पद्धति नष्ट करून बहुजनसमाजाच्या सर्वांगीण उन्नतीचा बंद झालेला मार्ग, मोकळा करून देण्याच्या कामांत तत्परतेनें व धैर्यानें उडी घेणें हें मध्यम वर्गातील सुशिक्षित बुद्धिवंतांचें कर्तव्य नाहीं काय ? किंबहुना समाजांतील शिक्षण, ज्ञान, संपत्ति आणि साऱ्या भौतिक शक्ति हीं साधनें, अनाथ, अपंग, दनिदुबळे आणि गोरगरीब यांच्या दुःखविमोचनाच्या कामीं कारणीं लागणार नसतील तर तीं असून नसल्यासारखीच म्हटलीं पाहिजेत. तीं तशीं कारणीं लागावींत म्हणून अटोकाट प्रयत्न केले पाहिजेत. तीं आपल्या कारणीं लागण्याकरितांच आहेत अशी साऱ्या गरीबांना हक्काची जाणीव व्हावयास पाहिजे. अशी जाणीव झाली म्हणजे काय पाहिजे तें करतां येईल. गरीबांच्या सुखाच्या आड जें जें कांहीं येईल, तें उजळ माथ्यानें आणि सांगून सवरून कापून काढतां येईल."

ऽ ऽ ऽ

आणि या उताऱ्यांतील विचारतरंगाशीं तल्लीन होतां होतां तिचा डोळा लागला, तो केव्हां लागला, तें तिलाच समजलें नाहीं.



## प्रकरण सातवें

# ' नवलाख दिवे हे तुझ्या घरीं ! '

"मला देतेस एखादी छानशी नोकरी पाहून?" या नीरेच्या म्हणण्याची प्रमिलेनें त्यावेळीं फार चेष्टा केली खरी, पण कांहीं दिवसांनीं नीरा तिला भेटावयाला गेली त्यावेळीं प्रमिलेनें आपण होऊनच नीरेला विचारलें होतें, "नीरे, तूं म्हणाली होतीस ना कीं मला एक स्वतंत्र नोकरी करावयाची आहे म्हणून?" आणि या प्रश्नावर नीरेनें आपली नोकरीची कल्पना प्रमिलेला स्पष्ट करून सांगितली होती.

"हें पहा, प्रमिले, मला जी नोकरी करावयाची तिच्याबद्दल माझ्या कांहीं कल्पना ठरून गेल्या आहेत. त्या कल्पनांना जमेल अशी नोकरी मिळाली तर ती मी ताबडतोब पत्करायला तयार आहे. तुझ्या-सारखी शाळेच्या मुख्य चालकाची नोकरी कांहीं वाईट नाहीं. पण त्यांत ठराविकपणा फार. नेहमींच्या चाकोरींतून आपण बाहेर जाऊं असं त्यांत कधीं व्हायचं नाहीं. आणि दुसरं म्हणजे असं कीं शाळेंत शिक्षक होण्यानं स्वतांचाही विकास होत नाहीं. आणि इतरांचाही होणारा विकास पहाव-याला मिळत नाहीं!"

आपल्याच धंद्याबद्दलचें नीरेचें हें मत ऐकून प्रमिलेला कांहींसें आश्चर्य वाटल्यावांचून राहिलें नाहीं. या कामांत नीरेपेक्षां आपल्याला थोडा-तरी अनुभव जास्त आहे, अशी खात्री बाळगून प्रमिलेनें उत्तर केलें, "चुकते आहे तुझं नीरे. इतरांचा विकास आपल्याला पाहायला मिळत नाहीं हें म्हणणं कांहीं अगदीं बरोबर नाहीं. आपण ज्यांना शिकवीत असतों त्या शेंकडों चिमण्या जीवांचा क्षणाक्षणाला कणाकणानं होणारा विकास आपण घडवीत असतों आणि तो दिसत असतांना किती आनंद होतो याची कल्पना नाहीं तुला!"

" कसली कल्पना घेऊन बसलीस ? आपण शाळेंत शिकत होतों त्यावेळची आठवण करून पाहा बरं. कोणत्या विषयांत आपलं मन इतकं रमविलं जात होतं आणि कोणत्या विषयामुळं आपल्या मनाचा आयुष्याला उपयोग होईल अशा रीतीनं विकास होत होता ? इंग्रजी, इतिहास, भूगोल, गणित सारे विषय आपण शिकत होतों. त्यांतल्या कोणत्या विषयाची माहिती आज तुला तुझ्या व्यवसायांत साहाय्यक ठरली ? मला तर त्यांतल्या कोणत्याच माहितींचा आजपर्यंत व्यवहारांत उपयोग झाला नाहीं. शंभरांतले पसतीस मार्क मिळविण्यापुरता केलेला अभ्यास वरच्या वर्गांत जाण्याकरतां उपयोगीं ठरे, पण बाहरच्या विस्तीर्ण जगांत पाऊल टाकण्याच्या कामीं त्याचा कितपत उपयोग झाला कुणास ठाऊक ? "

" तुझं कांहीं तरीच बोलणं आहे हें ! आपण जें इतकं ज्ञान मिळविलं त्यानं आपला फार फायदा झाला. "

पण प्रमिलेचें हें बोलणें पुरें होण्याच्या आंत नीरा अशा कांहीं विचित्रपणानें हसली कीं प्रमिलेला त्या हसण्याचा थोडासा राग आला. नीरेनें उपहासानें हसतां हसतां म्हटलें,

" ज्ञान ? ज्ञान या शब्दाचं चालतं बोलतं विडंबन म्हणजे आपण सुशिक्षित माणसं. कसलं ज्ञान आपल्याजवळ आहे ? कोणत्या ज्ञानाचा तुकडा असा आपल्या मालकीचा आहे कीं जो समाजापुढं करून त्याचा मोबदला आपल्याला समाजाकडून हक्कानं कांहीं मागतां येईल ? पण जाऊं दे, ती चर्चा कशाला ? करावीच लागलीं तर अशीही नोकरी करीन. पण शक्य तर कांहीं नवीन मार्ग आपण पत्करला असं समाधान लाभलं तर तें मला हवं आहे. "

" नवीन मार्ग तुला आक्रमायचा आहे, कां पोटाला नोकरी हवी आहे ? नक्की काय पाहिजे ते सांग. "

" तुझ्याजवळ मला देण्यासारखं यांतलं एक तरी आहे अशी माझी खात्री पटवून दे, म्हणजे मग सांगतें मला काय हवं आहे तें ! "

" माझ्याजवळ यांतल्या दोन्ही गोष्टी आहेत. मग बोल, तुला कोणती हवी ? "

" असं मोघम सांगून नाहीं चालायचं. मूठ उघडून दाखविल्या-सारख्या या गोष्टी दाखव, म्हणजे मग मी, लहान मुलासारखी मला हवी ती चटकन् उचलून घेईन."

" मग उघडतेच मूठ तर—" असें हसत म्हणत प्रमिलेनें आपल्या हाताच्या वळलेल्या मुठी नीरेच्या पुढें करीत उघडून दाखविल्या आणि म्हटलें, " सांपडली कां हवी ती गोष्ट ? "

" खरंच चेष्टा राहूं दे प्रमिले, पण सांग तुझ्याजवळ कांहीं नक्की माहितीचा मार्ग आहे कां ? "

आणि या प्रश्नानंतर प्रमिलेनें नीरेला एका अनाथालयाची सारी हकिकत सांगितली. हें अनाथालय मुंबईच्या कांहीं महाराष्ट्रीय धनिकांनीं मुद्दाम पैसे खर्च करून उघडल्याला नुकतीच दोन अडीच वर्षें झालीं होतीं. तेवढया अवधीत त्याच्या निरनिराळ्या शाखांचें काम बऱ्याच समाधान-कारक रीतीनें झालें होतें. त्या अनाथालयांत मुख्यत्वें तीन शाखा होत्या. एकींत अनाथ स्त्रियांना आश्रय मिळत असे. दुसरींत अनाथ मुलांचे पालन-पोषण केलें जाई. आणि तिसरींत या साऱ्या अनाथांकरितां रुग्णालय आणि शिक्षणालय यांची व्यवस्था केलेली होती. पहिल्या दोन शाखांत अनाथांची भरती होण्यांत कुणाला फारसें श्रम पडले होते असें नाहीं. कारण अना-थांच्या करितां आश्रय देणारा एखादा दरवाजा समाजानें मोकळा केला कीं त्या दरवाजाशीं वाटेल तेवढी गर्दी व्हावी इतका मुबलक अनाथपणा समाजांत रुजलेला आहे. त्यामुळें अनाथालय उघडल्याबरोबर अनाथ स्त्रिया आणि अनाथ मुलें यांच्या शाखा भरल्या. आणि आतां त्या शाखांतून सुमारें शंभर स्त्रिया व दोनशें मुलें यांचा समावेश झालेला होता. रुग्णालय व शाळा यांची बाजू सांभाळणें व्यवस्थापकांना अनेक दृष्टींनीं अवघड जात होतें. एकतर मुंबईसारख्या शहरांत रुग्णालय नीटनेटकेपणानें चालवावयाचें म्हणजे उत्तम कसलेले लोक व्यवस्था पाहाण्यास नेमणें जरूर होतें. पैसे खर्चून रुग्णालयाची व्यवस्था आजच्या घडीला पुष्कळच चांगली करण्यांत आली होती. मात्र प्रौढ अनाथ स्त्रियांना व अनाथ असंस्कृत मुलांना शिक-

वितांना नेमलेल्या शिक्षकांचे फार हात होते. कारण या ठिकाणीं इतर शाळांतले विषयच केवळ शिकवून परीक्षा पास होण्याची तरतूद करून देण्याची कामगिरी करावयाची नव्हती. अनाथालयाच्या बाहेर पडल्यावर यांतील प्रत्येक मुलाला समाजांत सुखरूपपणें राहतां यावें म्हणून त्यांची तयारी या अनाथालयांत करावयास हवी होती. आणि म्हणून अनाथालयाच्या शिक्षण—शाखेला फार महत्त्व होतें. नुसतें पुस्तकीं ज्ञान पैदा केलेले पदवीधर त्याठिकाणी खात्रीनें उपयोगी पडतीलच असा संभव नव्हता. त्यामुळें नवीन नेमणुका करतांना जसा त्रास होई तशीच नेमणूक होऊन काम करणाऱ्या स्त्रीपुरुष शिक्षकांनाही फार जिकीर होत असे. त्या अनाथालयांत अक्षरओळख नसलेल्या किंवा अक्षरओळखीपलीकडे मजल न मारलेल्या स्त्रियाच जास्त होत्या. या स्त्रियांना कांही कायमच्या अनाथालयांत ठेवावयाच्या नव्हत्या. येथील शिक्षणक्रमाचा त्यांना फायदा देऊन त्यांना एका विशिष्ट व्यवसायांत तयार करून अनाथालयांतून बाहेर पाठवावें असा नियम होता. मुलांसाठींही अशीच योजना होती. पोटाची पंचाईत मिटविण्यासारखे हस्तव्यवसाय शिकवावयाचे आणि मनें सुसंस्कृत होतील अशा प्रकारचीं व्याख्यानें देऊन त्यांना बाहेरच्या जगांतील आजच्या विषयांशीं परिचय करून द्यावयाचा असें दुहेरी काम शिक्षकांना करावें लागे.

या अनाथालयाच्या चालकांना सध्यां एका व्यवस्थापिकेची आवश्यकता होती. चालकांपैकीं एकाची प्रमिलेशीं सहज एकदां गांठ पडली असतां त्यांनी प्रमिलेजवळ ही आवश्यकता बोलूनही दाखविली होती. नीरेची नुकतीच गांठ पडली असल्यामुळें प्रमिलेला या बोलण्यानें नीरेची आठवण झाल्याशिवाय राहिली नाहीं. त्या गृहस्थांनाही प्रमिलेनें सांगून ठेवलें कीं, "माझी एक मैत्रीण आहे. बी. ए. झालेली आहे. तिला काम करण्याची हौस आहे. स्वभावानेंही चांगली आहे, टापटिपीची तिला आवड असून काम करण्यांत मोठी वक्तशीर आहे." यावर त्या गृहस्थांनीं प्रमिलेजवळ आणखीही थोडी चौकशी करून ठेवली होती. प्रमिलेनें त्यांना शेवटीं इत-

केंच सांगितलें की, " मी तिला एकदां प्रत्यक्ष विचारतें. तिची संमति असली तर तिला तुमच्या संस्थेच्या इमारतींत यायला सांगतें. "

आणि आज नीरा तिच्याकडे सहज आली असतां तिनें गप्पा मारतां मारतां मनाशीं ठरवून टाकलें, कीं सहज बोलण्याच्या ओघांत तिला विचारावयाचें आणि तिला या नवीन जागेची आपल्याला आहे तेवढी माहिती करून द्यायची.

नीरेला प्रमिलेनें सांगितलेली हकीकत ऐकून चटकन् संमति द्यावी कीं न द्यावी असा प्रश्न पडला. कारण तेथील जबाबदारीची जाणीव करून देतांना शिकविण्याचें काम किती वेगळया प्रकारचें आहे त्याचेंही प्रमिलेनें आपल्या मतानुसार दिग्दर्शन केलें होतें. पण नीरेच्या इच्छेप्रमाणें एक नवीन मार्ग—कीं साधारणतः आजपर्यंत सहसा कुणालाही साधतां आला नाहीं असा हा नवीन मार्ग आहे हेंही तिनें नीरेच्या मनावर बिंबवलें.

शेवटीं नीरेनें एकदां समक्ष जाऊन संस्था पहावी, आणि मग आपला नक्की निर्णय चालकांना कळवावा असें दोघींच्याही विचारानें ठरलें. स्वतंत्र आणि नवीन असा मार्ग आपल्यापुढें उघडा होतो आहे या विचारानें नीरेचें गोंधळलेलें मनही कांहींसें आनंदित झालें. त्या दिवशीं घरीं आल्यावर ती विशेष प्रसन्न आहे असें पाहून माईनें विचारलें, " भेटली कां तुझी प्रमिला ? म्हटलं, जातांना म्हणाली होतीस कीं ती कसलंसं पुस्तक लिहिते आहे, तेव्हां ती जाग्यावर असेल कीं नाहीं कुणास ठाऊक ! "

" भेटली प्रमिला ! माई, प्रमिलेनें मला एक नोकरी आणली आहे"

तिच्यासारखीच असेल कुठं तरी मास्तरणीची. शाळा कॉलेजांतनं शिकायचं आणि मास्तरणी व्हायचं. तींच तीं पुस्तकं पुन्हां पुन्हां शिकवायचीं ! लग्नं नाहींत, कार्यं नाहींत. तसंच जोगिणीसारखं राहायचं ? कशाला हवी तुला नोकरी. आतां एखादा छानसा नवरा पाहून लग्न कर आणि संसाराला लाग. ज्यानं त्यानं उठायचं, घरादाराकडे दुर्लक्ष करायचं आणि कांहींतरी तिसरंच करायला लागायचं. मला नाहीं आवडत हें. "

" अग पण माई, माझ्यासारख्या दुसऱ्यांच्या मुलांमुलींनां हें सांगत बसण्यापेक्षां आपल्याच मुलाच्या मागें कां लागत नाहींस ? त्याला लाव एकदां संसाराला. "

" इतकं माझं चाललं असतं तर कशाला हवं असतं. घरचा ऐकत नाहीं म्हणून तर दारच्यांना सांगायचं. "

" पण माई, तुम्ही पुण्यास राहात होतां तिथं तुमच्या घरांतील भिंतीवर रामदासांचं वचन लावलं होतं, तें तूं कितीदांतरी वाचीत होतीस. त्यांत सांगितल्याप्रमाणें करायचं म्हणजे नुसताच संसार करून कसं चालेल ? ',

" अग हो खरं. ' तनु त्यागितां कीर्ति मागें उरावी ' ही गोष्ट खोटी नाहीं. पण पुष्कळशा लोकांची कीर्ति कोणती असते हें माहीत आहे कां तुला ? "

" हो माहीत आहे. मागं राहाणारीं मुलंबाळं, घरदार, शेत-वाडी, आणि ते श्रीमंत असले तर बॅंकेंतले पैसे. या साऱ्यांची मिळून एक ' कीर्ति ' बनते. आणि ती मागं ठेवण्याकरितां साऱ्यांच्या जिवाचं रान चाललेलं असतं असंच ना ? पण माई मला आवडत नाहीं असली कीर्ति. "

" अग, तरुणपणांत आरंभाला साऱ्यांनाच असं वाटत असतं कीं आपण कांहींतरी जगाविरहित अचाट कामं करावींत, साऱ्यांना आपल्या-कडे पहायला लावावं. असल्या कामांत लग्न, संसार यांची अडचण होते. म्हणून तीं अजिबात टाळून टाकावयाचीं. अलीकडे तर शिकलेल्या मुलां-मुलींचं शिक्षण संपल्याबरोबर असं कांहीं तरी बोलत सुटायचं हें ठरलेलंच असतं. म्हणे आम्ही लग्न न करतां समाजाचं काम करणार आहों. मला आधीं 'समाजाचं काम' याचाच अर्थ कळत नाहीं. समाजाचं काम करायला माझी हरकत नाहीं. ज्यानं त्यानं आपापल्या मगदुराप्रमाणें काम करावें. आपला मगदूर जाणायचा नाहीं आणि वाटेल तेवढी उडी घेण्याचा खटा-टोप करायचा हें वाईट आहे. साऱ्यानांच वाटतं कीं आपण समाजाचा

उद्धार करणार आहों. मला नेहमीं आमच्या पुराणांतली एक गोष्ट आठवते. एकदां सारीं वानरं जेवायला बसलीं होतीं. त्यांत हनुमानही होते. भातावर लिंबू पिळण्याच्या वेळेला एका वानराच्या हातून लिंबाची बी निसटून उंच उडाली. त्याला त्या 'बी'चा हेवा वाटला, नि त्यानं उडी मारली तीं, ती बी उडाली होती त्यापेक्षांहि उंच. एका वानरानें उडी मारलेली पाहून शेजारच्यानें उडी त्याहूनहि उंच मारली. असें होत होत मारुतीनें जी उडी मारली ती सारें छत डोक्यावर घेऊन तो कुठच्या कुठं गेला. तसं होतं आहे आज तुम्हां शिकलेल्या मुलांमुलींचं. एकाचं पाह्यचं अन दुसऱ्यानं करायला लागायचं. आपल्याला काय साधतं आहे हें थांबून पाह्यला कोणी तयारच नाहीं!"

माईच्या या बोलण्याचें नीरेला आश्चर्य वाटल्यावांचून राहिलें नाहीं. इतक्या स्पष्टपणानें आपलें मत देण्याचा माईचा स्वभाव नव्हता. आजपर्यंत कितीतरी मतें तिनें आपल्या मनांत तशींच सांठवून ठेवलीं होती. किंबहुना अशा मतांना बांध घालण्यांतच माईचें सारें मनःसंयमन खर्ची पडलें होतें. आतांच्या तिच्या बोलण्यांत जसा आवेश होता, तसाच सहजस्फूर्तीचा उमाळा होता. नीरेला त्या बोलण्यांतली कल्पना मात्र बरीचशी पटली. आपला मगदूर न पाहातां जो तो भरारी मारण्याचा प्रयत्न करीत असतो हें कांहीं खोटें नाहीं. किंबहुना जगांतल्या कितीतरी भराऱ्या टिपण नीट न घेतां आल्यामुळें वांया गेल्या आहेत हा माईच्या म्हणण्याचा रोख तिला पटल्याशिवाय राहिला नाहीं.

पण नंतर माईनेंच तिला विचारलें,

"कसली नोकरी तुला मिळणार आहे?"

"इथं मुंबईत एक अनाथालय आहे. तिथं व्यवस्थापक म्हणून मला काम मिळणार आहे. माझ्याकडून होकार गेला म्हणजे तें काम मिळण्यांत फारशी पंचाईत पडायची नाहीं."

"तुझ्यासारख्या श्रीमंताच्या मुलीला कसं जमेल तिथं त्या गरीब बायकामुलांशीं वागणं?"

" माई, मी एकदां श्रीमंताची मुलगी होतें. आतां माझं मलाच मी असं शिकवायला लागलें आहे कीं, तूं श्रीमंत नाहींस, गरीब आहेस. पोटाकरितां अन्न मिळवायला तुला धडपड केली पाहिजे. "

नीरेचें हें बोलणें ऐकून माई तिच्याकडे पहातच राहिली ! आणि माईला तिच्या या बोलण्याचें आश्चर्य वाटणें साहजिक होतें. कारण आज-पर्यंत नीरेनें तिला आपण मुंबईला आलों तें नोकरी करून स्वतंत्रपणें रहाण्याकरितां आलों, आणि आतां आपल्या घराकडील साहाय्याची आपण फारशी अपेक्षा बाळगणार नाहीं असें कांहींच सांगितलें नव्हतें. " तुझ्या-कडे फार दिवस राहून चालायचं नाहीं, मला गेलं पाहिजे, " असें जेव्हां ती माईला म्हणत असे, तेव्हां माई तिला आग्रह करून मुद्दाम ठेवून घेण्याकरितां उत्तर करी, " जाशील आंतां सावकाश ! घरीं तरी असं काय ठेवलं आहे ? येऊन जाऊन घरची श्रीमंती तुला इथं कमी पडत असेल पण त्याच्या ऐवजीं माझा मनापासूनचा लोभ आहे. " कालपर्यंत अशीं बोलणीं कितीदां तरी झालीं. पण नीरेनें माईला आपण मुंबईला कां व कशा आलों याचा कांहीं सुगावा लागू दिला नव्हता. माईनें तिला एक-दोनदां तसें विचारूनही पाहिलें होतें. पण तेव्हांही कांहीं तांत्रिक उत्तरें देण्यापलीकडे तिनें आपलें मन उघड होऊं दिलें नव्हतें. त्यामुळें आतांच्या नीरेच्या बोलण्यानें चकित होऊन तिनें चटकन् विचारलें,

" म्हणजे ? "

" म्हणजे काय ? बापजाद्यांच्या कीर्तीवर आणि पैशावर जगणं वाईट नाहीं का माई ? जगांतले बाजारभाव आतां बदलत चालले आहेत. घराण्याच्या कीर्तीवर किंवा संपत्तीवर माणसाची किंमत अवलंबून ठेवण्याचे दिवस जात चालले आहेत. परवांच जिकडे तिकडे कौन्सिलांच्या निवड-णुकी झाल्या. त्यांत राष्ट्रीय पक्षातर्फे अनेक व्यक्तींनीं भाषणें केलीं. तसलीं भाषणं ऐकायला मी सहसा कधीं जात नाहीं. पण लाला लजपतरायांचं भाषण व्हायचं होतं, आणि लालाजींना मी कधीं पाहिलं नव्हतं म्हणून गेलें होतें त्यांचं भाषण ऐकायला. त्यावेळीं त्यांनीं सांगितलेली एक विचार-

सरणी मला फार फार पटली. ते म्हणाले होते, ' आजच्या काळांत साऱ्या देशांतील प्रत्येक व्यक्तीची किंमत मांडावयाची झाली तर ती एकास एक अशीच मांडली पाहिजे. मी मोठा किंवा थोरामोठ्याचा म्हणून मला पांच मतांचा अधिकार आणि एकादा हमाल किंवा शेतकरी निरक्षर अडाणी म्हणून त्याला मुळींच मताचा अधिकार नाहीं असं जसं लोकशाहीच्या आजच्या युगांत घडणें योग्य नाहीं तसंच साऱ्या व्यवहारांत झालं पाहिजे. एक व्यक्ति म्हणजे एकच. ती संख्येनं जशी जास्त नाहीं, तशीच अधिकारानंही जास्त असतां कामा नये.' लालाजींचं हें बोलणं मला पटलं. मी इतर पदवीधर मुलींच्या इतकीच लायकीनं अन् अधिकारानं असलें पाहिजे, आणि लोकांनींही मला तसंच म्हटलं पाहिजे. "

" तें कांहीं असलं तरी तुला हें सारं कितपत साधेल याची मला शंका वाटते. नोकरी म्हणून हवी असेल तर तें काम कर कांहीं दिवस. पण त्या ठिकाणीं कायम घर करून राह्यचं म्हणजे मात्र ठीक नाहीं. तूं आपली इथं रहात जा. इथून जात जा तूं रोज जेवून. तूं वसतीला इथंच असायला हवं. "

" असं करून कसं चालेल माई. ती नोकरी तर अशा प्रकारची आहे कीं, त्या ठिकाणीं व्यवस्थापकानें चोविस तास वसती करून राहिलं पाहिजे. अन् तुला उगीच भीति वाटते आहे कीं, माझे तिथें हाल होतील. मी स्वतांचे हाल कधीं होऊं देणार नाहीं. मी माझं सारं अगदीं व्यवस्थित करून घेईन. "

" तें कांहीं म्हणालीस तरी नोकरी लागल्याच्या पहिल्या दिवसापासूनच अगदीं तिकडं राह्यला जाऊं नकोस. चार आठ दिवस इथूनच जात जा. एकंदर तानमान कसा आहे तो बघ. आणि मग ठरीव काय काय करायचं तें. "

अनाथालयाच्या चालकांशीं पत्रव्यवहार करून नीरेनें अनाथालय पहावयास जाण्याचा एक दिवस निश्चित केला, आणि त्याप्रमाणें ती जाण्याकरितां निघाली. दादर ट्रॅम नाक्याशीं डाव्या हाताला वळून ती मोठ्या-

रस्त्यानें जाऊं लागली. ती पायींच जाणार होती. किंग्ज सर्कलजवळ एका नवीन बांधविलेल्या इमारतींत हें अनाथालय होतें. त्या रस्त्यानें ती पूर्वी कितीदां तरी फिरायला म्हणून गेली होती. पण आज आतां त्या रस्त्याला वळल्याबरोबर तिला कसल्या तरी विचित्र विद्युल्लहरींनी आपल्या शरीराला स्पर्श केल्याचा भास झाला. तिचें मन थोडेसें चलबिचल झाल्याशिवाय राहिलें नाहीं. आणि या प्रकाराचें तिचें तिलाही आश्चर्य वाटत होतें. " आपण करतों आहों यांत काय वाईट आहे ? आणि यांत कांहीं वाईट नाहीं तर मग मनाला भीति कां वाटते ? " असे प्रश्न तिनें स्वतांलाच विचारले. एखाद्या सराईत पोहणा-रानें अपरिचित डोहाच्या तोंडाशीं क्षण दोन क्षण थबकून उभें राहावें तसें तिच्या अंतःकरणाचें झालें. जणूं तिच्या अन्तर्दृष्टीला " रस्ता बंद." अशी ठळक अक्षरांची पाटी दिसल्याचा भास होत होता. तो भास आहे; हा रस्ता बंद असायला काय झालें! शेंकडों वेळां आपण या रस्त्यानें फिरायला नाहीं कां गेलों ? तोच हा रस्ता ! या रस्त्यानें फिरावयाला जाऊन आपण कितीदां तरी मनाला प्रसन्नता मिळविली ! आणि मग आजच असें थब-कण्याचें काय कारण ? तिच्या अंतःकरणांतील या थैमानाचा आवाज बुड-वून नाहींसा करण्याकरितांच जणूं एक कामगारांची मोठी थोरली गाडी धडधडत तिच्याजवळून गेली. गाडीच्या आवाजाच्या कल्लोळांत तिचे सारे विचारतरंग पार मावळून गेले. आणि मग तिला वाटलें, " ही अशीच धडधड व्हायची. झपाट्यानें मार्ग काढीत जायचें म्हटलें म्हणजे असाच आवाजाचा जंगी कल्लोळ उसळला पाहिजे ! " इतक्यांत समोरून साय-कलचीं तीन चाकें लावलेलीं एक छोटीशी गाडी आली. गाडी हाकणारा माणूस आकर्षक रीतीने घंटा वाजवीत होता. त्या गाडीवर पुढल्याच बाजूला मोठ्या अक्षरांनीं लिहिलें होतें—Do not stop me —नीरेनें तीं अक्षरें वाचली आणि तिला हसूं आलें. खरेंच तिला वाटलें, आपणसुद्धां आपल्या मनाला असंच बजावीत चाललं पाहिजे कीं —Do not stop me—. नीरा तेथें पोहोंचली तेव्हां सकाळच्या प्रार्थनेची वेळ होती.

एका मोठया दिवाणखान्यांत साऱ्या स्त्रिया व मुलें जमलीं होती. कोपऱ्यांत पेटीचा सूर धरून एक बाई बसली होती. आणि दोन स्त्रिया सर्वांच्या समोर उभ्या राहून गाणें सांगण्याच्या तयारींत होत्या. गडबड शांत होती. साऱ्यांनीं हात जोडले होते. पेटीवर षड्ज—मध्यमांची एकतानता लागली होती. अशा वेळीं नीरा तेथें पोहोंचली. तिचें स्वागत करून तिला प्रार्थनेच्या जागींच नेण्यांत आलें. आणि त्या दिवाणखान्यांत तिचें पाऊल पडल्यावर थोडयाच वेळांत सुस्वर आवाजांत सभागीत सुरू झालें. सुमारें तीनशें कंठ एकसुरानें म्हणत होते—

“नवलाख दिवे हे तुझ्या घरीं ! कां जातिस परक्याच्या दारीं॥

प्रार्थनागीतांत या गाण्याचा समावेश झाला असेल अशी नीरेला कल्पनाही नव्हती. त्यामुळें तें परिचयाचें आणि आवडीचें गाणें अशा भावनापूर्ण तन्मयतेनें म्हटलें जात असतां तिच्या वृत्ति साहजिकच थरारून गेल्या. आणि त्या अनाथांनीं आत्मविश्वासाची जाणीव व्यक्त करण्याकरितांच जणूं हें गीत गायिलें असें तिला वाटलें. हें अनाथालय आमचें हक्काचें घर आहे. येथून आम्हांला परक्याच्या दारीं वणवण करीत जाण्याचें काय कारण आहे असाच प्रश्न जणूं ते सारे अभागी जीव विचारीत होते !

त्यानंतर तेथील व्यायाम झाले. साडेदहा वाजतां जेवणें झालीं. त्याठिकाणीं कोणत्याही प्रकारचा पंक्तिप्रपंच नव्हता. आणि साडेअकरा वाजतां शाळा भरल्या. लहान लहान गट पाडून स्त्रियांना आणि मुलांना निरनिराळया प्रकारचे हस्तव्यवसाय करायला यावेत अशी शिक्षणयोजना होती. विणणें, शिवणें, वेताचीं कामें करणें, खिळे जुळणें, पुस्तकें बांधणें, लाकडें कापून लहान लहान वस्तू बनविणें, टोप्या व हॅट्स तयार करणें इत्यादि कितीतरी हस्तव्यवसाय चालले होते. दुपारीं चार वाजतां फराळ झाले; साडेपांच वाजतां साऱ्यांना पुन्हां एकत्र जमविण्यांत आलें. आणि चालकांपैकीं एकानें सुमारें अर्धा तास एक प्रवचन केलें, आणि त्यानंतर कवायती, खेळ वगैरे होऊन सात वाजतां जेवणें झालीं.

नीरा मध्येंच जाणार होती. पण चालकांनीं तिला फार आग्रह केला, आणि शिवाय तिला सारे कार्यक्रम पहाण्याची एक जिज्ञासा होती, म्हणून मग तिनेंही फारसे आढेवेढे घेतले नाहींत. शेवटीं संध्याकाळीं आठ वाजतां प्रार्थनागीतें झालीं. त्यांत पुन्हां सकाळचेंच गीत झालें. तें गीत ऐकून ती जाण्याकरितां उठली. बरोबर दरवाजापर्यंत चालत येणाऱ्या चालकांना तिनें म्हटलें, "या गाण्याचा समावेश मात्र खरोखरच मोठ्या मार्मिक-पणानें केला आहे!"

"ते शिरीषकुमार पटवर्धन आहेत ना, त्यांनीं शिकवलं इथं येऊन हें गाणें!"

आणि पुढें लागलीच त्यांनीं म्हटलें, 'ठीक आहे, मग कळवा तुमचा विचार. तुम्हीं आज सबंध दिवस राहिलांत, फार बरं झालं.'

नीरेलाही पुढें कांहीं बोलणें शक्य नव्हतें, तिनेंही नमस्कार केला आणि ती घरीं आली.



# प्रकरण आठवें

## प्रमिलेचा आजार !

नवीन पतकरलेल्या कामांत शक्य तितक्या लवकर रुळतां यावें म्हणून जेवढी यातायात करणें आवश्यक होतें, तेवढी सारी यातायात नीरेनें चालविली होती. त्यामुळें सकाळपासून संध्याकाळपर्यंत अनाथालयांतील निरनिराळ्या शाखांतून तत्परतेनें हिंडण्यांत आणि मन लावून तेथील निरनिराळीं कामें उरकण्याची दक्षता राखण्यांत तिचा वेळ कसा जाई तें तिचें तिला कळत नसे. किंबहुना या कामाचा शीण येऊन थकल्यामुळें अंथरुणाला पाठ लागल्याबरोबर तिला इतकी झोप लागे कीं, कांहीं मागल्या गोष्टींचा विचार करावयाचा म्हटलें तरी तिला तसें करतां येत नसें आणि या नवीन व्यवधानामुळेंच तिचें शिरीषकुमारांच्या खटल्याकडील लक्ष बऱ्याच प्रमाणांत कमी झालें. पण अद्याप ती माईकडेच राहात असल्यामुळें तिला माईकरितां म्हणून निदान रोजच्यारोज कांहींतरी चौकशी करावीच लागे. अशी चौकशी करूनही हातीं फार थोडी माहिती लागे. कारण, सरकारतर्फे खटल्याचा पुरावा गोळा करण्याकरितां अवधि मागून घेण्यांत आला होता आणि त्यामुळें तारखा पुढें ढकलल्या जात होत्या.

नीरेला शिक्षणालयांत स्वत:पुरती जर कोणती अडचण विशेष भासली असेल तर ती तिला स्वत:ला कोणतेच हस्तव्यवसाय करतां न येण्याबद्दलची होय. ती शिकली तो शिक्षणक्रम आणि हा येथील शिक्षणक्रम यांच्यामध्यें तसा कोणताच धागा नव्हता. त्यामुळें ती स्वतां कांहीं वस्तु करून पाहाण्याचा जेव्हां प्रयत्न करूं लागे तेव्हां ती तिच्या हातून नीट रीतीनें तयार झाली नाहीं म्हणजे तिचें तिलाच हसूं कोसळे. विणण्याकरितां तिनें एकदां सुया हातीं घेतल्या त्यावेळीं तर तिची तारांबळ उडून

गेली. पण तेथें शिक्षण घेणाऱ्या बायका तिच्याबद्दल कौतुकबुद्धि बाळगणाऱ्या असल्यामुळें त्या तिला थोडीफार मदत करीत.

बायकांचे हस्तव्यवसाय चालू असतांना नीरा त्यांच्याशी मुद्दाम बोलत बसे. त्यांना निरनिराळे प्रश्न विचारून त्यांना हल्लींची अवस्था कां यावी यासंबंधानें कयास करण्यास उपयोगीं पडेल अशी माहिती ती त्यांच्या कडून काढून घेत असे. त्यांतल्या कितीकांची तरी दुःखें ताजीं होतीं; त्यामुळें माहिती सांगतां सांगतां त्यांच्या डोळयांतून पाणी वाहूं लागे.

एकदां अशाच एका बाईशीं बोलतां बोलतां तिनें विचारलें,

" तुमचं नांव तर थोरामोठ्यांच्या इनामदार घराण्यांतलं दिसतं ! मग तुम्ही इथं कशा आला ? "

त्यावर त्या बाईनें म्हटलें,

" काय सांगायचं ? माझी कहाणि तुम्हाला सांगितली तर ती जगाविरहित म्हणून तुम्ही खोटी मानाल. चांगल्या घरंदाज कुळांतून मी बाहेर पडलें यांतच काय तें समजा ! "

" तुम्ही बाहेर पडल्याचं नाहीं नवल वाटत मला. पण सारा आसरा टाकून तुम्ही इथं आला, त्याचं आश्चर्य वाटतं, म्हणून विचारलं मी तुम्हाला."

"इथं यायचं नाहीं तर काय करायचं ? नवऱ्याचं घर सोडलेली मी, मला कोण जवळ करणार ? आईबाप, बहीणभावंडं यांना साऱ्यांना माझं करणं पसंत नाहीं पडलं. थोडीफार चालढकल करावी आणि मी तेथेंच राहावं असं त्यांचं म्हणणं ! पण तिथं राह्यचं तें ज्यांना पति मानून राह्यचं, त्यांनींच आपला पतीपणा नाहींसा केला होता. अजूनही आठवण झाली कीं कांटा येतो अंगावर त्या प्रकाराचा ! "

त्या बाईच्या बोलण्यांतून वस्तुतः तिचा कसलाच वृत्तांत बाहेर पडला नव्हता. तरीही नीरेची उत्कंठा फार वाढली. आपण ज्या स्त्रियांच्या जातींत जन्माला आलों त्या जातीचे हाल कुठेकुठें व कसकसे चालले आहेत हे तरी पाह्यला मिळेल म्हणून तिनें सहजच विचारपूस चालविली होती. त्या बाईच्या मनाला आपला पूर्वेतिहास आठवून यातना होत

हाल्या. तें नीरेला स्पष्ट समजत होतें तरीही तिला तिची जिज्ञासा स्वस्थ बसूं देईना. म्हणून तिनें विचारलें, "आठवणीनें सुद्धां अंगावर कांटा येतो? म्हणजे मग फारच त्रास झाला असला पाहिजे तुम्हांला!"

आणि मग त्या बाईला साहजिकच उमाळा आला. त्या अनाथालयांत त्या बाईला इतक्या सहानुभूतीनें वागविणारें दुसरें कुणी भेटलें नव्हतें. जमलेल्या अनाथ बायका तर बोलून चालून दुःखी. जी ती आपल्या मनस्तापांत चूर. कुणी कुणाला विचारायचं? आणि कुणी कुणाला सांगायचं?

त्यामुळें तिनें नीरेला जी हकिकत सांगितली त्यांत चीड, संताप यांचें आटोकाट आविष्कारण झालें होतें. ती म्हणत होती,

"माझ्या आईबापांनीं माझं जें लग्न केलं तें कांहीं माझं वाईट व्हावं या बुद्धीनं मुळींच नाहीं. मुलगी चांगल्या ठिकाणीं पडली तर तिलाच सुख लाभेल, म्हणून त्यांनीं माझ्याकरितां जें स्थळ बघितलं तें चांगलं होतं. माझे सासरे इनामदार म्हणून गांवांत चांगले मानमान्यता पावले होते. त्यांचे चिरंजीव दिसायला चांगले होते. लोकांत वागायला व्यवस्थित होते. घरांत पैसा होता. शेतीभाती खूप होती. शेतवाडीच्या मळ्यांतून आमची एकदोन घरं होतीं. तिथंही आम्ही जाऊन कधीं कधीं राहात होतों. इतक्या चांगल्या ठिकाणीं मुलगी पडली म्हणून माझ्या आईबापांना किती आनंद वाटला. त्यांनीं माझं लग्न हौसेनें केलं. लग्न झालं त्यावेळीं मी लहान होतें. मला लग्नाच्या उत्सवाची मोठी हौस वाटत होती. या साऱ्या समारंभाला आपण कारण झालों म्हणून माझी मलाच धन्यता वाटली. मी सासरीं प्रथम गेलें त्यावेळींही मोठ्या हुरूपानं गेलें. आपण आपल्याला मिळालेल्या श्रीमंतीचा चांगल्या कामीं उपयोग करूं, असं मला कितीतरी वाटे. आणि माझे आरंभीचे कांहीं दिवस गेलेही फार चांगले. तोंपर्यंत पती—पत्नी म्हणून आम्हां उभयतांची कधीं गाठही पडली नव्हती. आणि अशी गांठ न पडतांच दोन वर्षें निघून गेलीं. एकें दिवशीं होमहवन होऊन आम्ही जाहीर रीतीनें गृहस्थधर्माचा स्वीकार केला. पण

त्यानंतर लवकरच मला माझ्या खऱ्या स्थितीची जाणीव झाली. माझे पति हे नांवापुरतेच माझे पति असल्याचें जेव्हां मला आढळून आलें, तेव्हां माझ्या मनाला फार मोठा धक्का बसला. त्यानंतर मी लागलीच माहेरीं गेलें. त्यावेळीं आईच्या मांडीवर डोकें ठेवून मी खूप रडलें. आईनं माझं समाधान केलं. मला आर्यस्त्रीचा आदर्श समजावून सांगितला. आपलं काचेचं भांडं कधींहि तडकता कामां नये, आपण फार खबरदारी घ्यायला हवी म्हणून आईनं मला परोपरीनं सांगितलं. शेवटीं मी पुन्हां सासरीं परत गेलें. मनाला बसलेला धक्का कशानें तरी ओसरून जाईल, आपण नित्याची कामं करण्यांत मन गुंतवून राहावं, म्हणजे आपोआपच मनाचं दुःख कमी होईल असं मानून मी तिथं राहिलें. मनाला मोकळं ठेवूं नये, म्हणून आईनं मुद्दाम बजावून सांगितलं होतं तें ध्यानांत वागवून मी कथापुराणाचा अधून-मधून आश्रय करीत असें. मला वाटत होतं कीं, हरकत नाहीं आपल्या सगळंच सुख मिळालं नाहीं तरी. आहे हेंही कांहीं वाईट नाहीं. पण माझं दुर्दैव येथूनच पुढं आड यायचं होतं. आमच्या घराचे कोर्टकचेऱ्यांतून खटले चालू होते. भाऊबंधांशीं उत्पन्नाचे वाद चालले होते. त्याचा आम-च्यासारख्या बायकामाणसापर्यंत काय संबंध येणार ? मला नेहमीं असंच वाटे. पण एके दिवशीं अचानक संबंध आला. दुपारची मी अशी कांहीं-तरी काम करीत बसलें असतां मामंजी माझ्यासमोर येऊन उभे राहिले, आणि त्यांनीं सांगितलं ‘ आज संध्याकाळीं त्या वकिलांच्या घरीं जेवायला जायचं आहे. ’ मी खालीं मान घालून उभी होतें. उभ्या उभ्याच मी ‘ हो ’ म्हटलं. संध्याकाळीं माझ्याबरोबर मामंजी नव्हते. माझे पति होते. आम्ही त्या वकिलांच्या घरीं पोहोचलों. बायकांच्या बाजूला जाण्याची वाट माझे पति मला दाखवितील म्हणून मी त्या घराबाहेर थबकलें. त्यावर यांनीं म्हटलं, “ हें त्यांचं घर आहे खरं. पण त्यांची कचेरीची जागा त्या तिकडं पलीकडच्या रस्त्याला आहे. तिकडं आपण पहिल्यानं जाऊं. ” हे पुढं चालले होते. आणि मी मागून जात होतें. आम्हीं त्या जागेंत पोहचलों. वकील एका आरामखुर्चीवर बसले होते. भिंतीला टांगून ठेवलेला एक दिवा तेवत होता. उजव्या बाजूला गालिच्याची बैठक होती. तीवर

लोड होते. वकिलांनीं यांना बसायला सांगितलं. हे लोडाशीं बसले. मलाही बसण्याचा आग्रह झाला तेव्हां मीही बैठकीच्या एका कोपऱ्यावर टेकलें. त्यावेळीं त्या उभयतांमध्यें बोलणं चाललं होतं. वकील म्हणत होते,

" एकूण, आप्पासाहेब, पटलं तुम्हाला आमचं म्हणणं तर. न्यायाधिशाकडे जायचा नजराणा वकिलामार्फत जावा लागतो. "

आणि या बोलण्यावर दोघेही खदखदां हंसले. मला त्या बोलण्याचा तितकासा अर्थ कळला नाहीं. मला वाटलं, असेल झालं, यांचं कांहींतरी खटल्याबद्दलचं बोलणं. वकिलांच्या बोलण्यावर माझे पति उत्तर करीत होते,

' मग काय करायचं बुवा. तुम्ही अगदीं नजराण्या शिवाय आडूनच बसलांत. '

' आम्ही नाहीं बसलों. जज्जसाहेबच आग्रह धरून बसले. आम्ही फक्त एवढंच म्हटलं कीं, काय व्हायचं ते आमच्या मार्फतीनं व्हावं. ' असें म्हणत वकिलांनीं डोळे मिचकावले. माझ्याकडे पाहात त्यांनीं म्हटलें, ' अवकाश आहे थोडा जेवणाला. थांबलं पाहिजे जरा. हरकत नाहीं ना कांहीं ? '

यावर उत्तर म्हणून मी फक्त माझ्या शरीराची कांहीं तरी विचित्र चाळवाचाळव केली. त्याचवेळीं वकील माझ्या पतीकडे पाहात होते. त्याबरोबर माझ्या पतींनीं विचारलें,

' रावसाहेब अजून कांहीं आलेले दिसत नाहींत. जाऊन घेऊन येऊं कां त्यांना ? '

असें विचारत विचारत माझे पति जाग्यावरून उठले आणि कचेरीच्या बाहेर पडले. मला बरोबर आणलं होतं याचाही त्यांना जणूं विसर पडला. ते निघून गेले. मी मात्र त्या परक्या जागेंत एकटी राहिलें. वकिलांनीं दाराला कडी लावली, आणि तोंडानं गाणें गुणगुणत ते माझ्यापाशीं मंदमंद पावलें टाकीत येऊं लागले.

मग मात्र माझ्या डोक्यांत लख्ख प्रकाश पडला. त्यावेळीं मला

फार भीति वाटली खरी. पण त्याबरोबरच माझ्या पतींच्या उलट्या काळ-जाचा फार तिरस्कार आला. आल्याप्रसंगाला तोंड कसं द्यायचं हा मुख्य प्रश्न होता. ते वकील गाणं गुणगुणत होते ते माझ्या डोक्यांत अद्यापही अगदीं ठाम बसून राहिलं आहे. ते म्हणत होते ' सुंदर वदन नसेल कसें—'

पुढल्या गोष्टी मी प्रत्यक्ष शब्दांनीं सांगायलाच पाहिजेत असं नाहीं. तुमच्यासारख्याला सहज कल्पना करतां येईल पुढल्या साऱ्या प्रकाराची. '

बोलतां बोलता त्या बाईचे ओठ दुःखावेगानें थरथरत होते. तिचे डोळे पाण्यानें डबडबले होते. तिनें डावीकडच्या पदराचा भाग हाताचा अंगठा आणि मधलें बोट यांच्या पकडीनें चटकन् उचलून डोळ्यांना लावला ! आणि तरीही बोलण्याचा प्रयत्न करति तिनें म्हटलें,

' आणि म्हणून मी घर सोडलें. तेव्हांपासून मला कुणाचा आसरा नाहीं. '

' यांच्यावर फिर्यादी करून यांच्याकडून पोटगी आणि नुकसान भरपाई घेतल्याशिवाय यांचे डोळे उघडायचे नाहींत ! ' संतापानें नीरेच्या तोंडून उद्गार निघाले.

त्यावर कळवळून त्या बाईनें म्हटलें,

' त्याचाही काय निकाल लागायचा तो लागला. मी हिला माझ्या घरांत ठेवून नांदवायला तयार आहे असं नवऱ्यानं म्हटलं म्हणजे कोर्ट काय करणार असं माझ्या माहेरच्या माणसांनीं माझ्या कानींकपाळीं ओरडून सांगितलं. थोरामोठ्याच्या घरांतून उठून गेलली म्हणून माझाच उलट दुर्लौकिक झाला. मला वैताग आला. आणि शेवटीं आपल्याला कांहींतरी पोटाचा उद्योग शिकायला मिळाला तर पहावा म्हणून इथं आलें. '

अशा प्रकारची हकिकत ऐकून नीरेला फार विषण्णता आली. त्या विषण्ण मनःस्थितींतच ती आपल्या कामाच्या खोलींत जाऊन बसली.

बाहेरच्या बाजूला कांहीं स्त्रिया अनाथालयांत प्रवेश मिळण्याकरितां येऊन उभ्या राहिल्या होत्या. नीरेनें त्यांतील एकीला आपल्या समोर बोलावलें आणि तिची सर्वसामान्य माहिती विचारली.

ती एक खालच्या जातींतील स्त्री होती. तिचा नवरा व ती मोल- मजुरी करून गुजराण करीत असत. नवऱ्याला अकस्मात् आजार झाला आणि त्या आजारानें सुमारें दोन वर्षे खंगत जाऊन तो मरण पावला. नवऱ्याच्या आजारपणाच्या काळांत सारी घराची व मुलाबाळाची जबाब- दारी या बाईवरच पडली. तिनें जीवापाड श्रम करून पैसे मिळविलें तरी ते पुरत नसत. त्यांतच मोठ्या मुलीचें लग्न करावें लागलें. त्या लग्नाला लागणारे पैसे पटाणाकडून उसने काढले. नवरा जसजसा जास्त क्षीण होत चालला तसतसा पठाणाचा तगादा वाढत चालला. चार आठ दिवसांनीं संध्याकाळीं त्या पठाणानें यावें, अद्वातद्वा भाषण करावें, घरांतील सामानसुमान काढण्याची धमकी द्यावी, मारहाण करण्याची भाषा करावी, असें चाललें होतें. यांनीं वायदे करावेत आणि ते मोडले म्हणजे त्या पठाणानें आपला ठरीव तमाशा करावा असा क्रम सुरू झाला. शेवटीं नवरा मेल्यावर तर त्या पठाणानें कहर चालविला. त्यानें केलेल्या जुलूम जबर- दस्तीला कुठलाही कायदा बंधन घालूं शकत नव्हता. आणि म्हणून त्यानें सारें घरांतलें सामान नासधूस करून वाहून नेलें, आणि या बाईवर उपा- समारीची पाळी आणली. आणि शेवटीं त्यानेंच या बाईला वाईट नादाला लावलें.

माहितीचा तक्ता भरून घेण्याकरितां म्हणून आवश्यक हकिकत विचारून घेतांना नीरेला त्या बाईबद्दल एवढी माहिती समजली. ती ऐकून घेतल्यावर कांहींशा विचारानें तिनें सहज समोर पाहिलें तेवढयांत त्या बाईला बहुधा असें वाटलें असावें कीं, आपल्याला अनाथालयांत घेण्याच्या कामीं नीरेला कांही अडचण वाटत असावी. म्हणून तिनें नीरेला केविलवाणे- पणानें विचारलें,

'तुम्हालाही इतर साऱ्या लोकांप्रमाणंच वाटतं कां? नवरा

आजारी पडणं हेंही पाप. संसाराला पैसा न पुरणं हेंही पाप. आणि त्या नंतर उपाय खुंटला म्हणून देणं केलं तेंही पाप असंच कां तुम्हाला वाटतं?

' पण आजारी पडण्यापूर्वी नवऱ्यानं प्रकृतीची थोडी काळजी घ्यायला नको होती कां ?

' बाई, विचारणाराला त्यांत कांहीं अवघड वाटत नाहीं. कशी काळजी घ्यायची ? रोजन्दारीनं कामं करणारीं माणसं आम्हीं. आम्हाला असं स्वस्थ राहून कसं चाललं असतं. त्यांतून एकाऐवजीं दहा माणसं कारखान्याच्या तोंडाशीं, आम्हाला आंत घ्या, म्हणत उभीं असायचीं ! '

यावर नीरेनें त्या बाईला म्हटलें, ' तुम्हाला उद्या कळेल इथं घेतलं आहे कां नाहीं तें. उद्यां येऊन तुम्ही चौकशी करा. '

ती बाई आणखीही कांहीं बोलली असती. पण नीरेची मुद्रा अधिक बोलत राहण्याला अनुकूल नाहीं हें तिला पटूनच कीं काय ती खोलीच्या बाहेर निघून गेली. नीरेलाही तिच्या दुःखानें खेद वाटला नाहीं असें नाहीं. पण ती ज्या जाग्यावर बसली होती, तेथें हातीं घेतलेलीं कामें आवरण्याकरितां मनाला संयम घालणें अवश्य होतें.

त्यानंतर दुसरी बाई आंत आली. तिचीही माहिती विचारण्यांत आली. ती बाई पांढरपेशा समाजांतलि दिसत होती. तिच्या हालचालींत सुसंस्कृतपणा होता. तिला बाजूच्या बाकावर बसावयास सांगून नीरेनें विचारलें, ' काय तुमचं नांव ? '

' नर्मदाबाई आनंदकर. '

तें आडनांव ऐकल्याबरोबर नीरेला वाटलें कीं हें आडनांव आपण बऱ्याच परिचयाच्या ठिकाणीं ऐकलेलें आहे. पण एका आडनांवाचीं व एकमेकांशीं संबंध नसलेलीं कितीतरी माणसें असतात हें तिला अनुभवानें माहीत होतें. तिच्या शाळेंत लहानपणी जोग आडनांवाचे एक शिक्षक होते. त्याबद्दल तिला साऱ्या मुली विचारीत ' ते तुझे कोण लागतात ग ?' आणि या वरचेवर विचारलेल्या प्रश्नानें कावून जाऊन तिनें कितीदांतरी म्हटलें होतें, ' मी आतां माझं आडनांव बदलूनच टाकणार आहे मुळीं.

कारण या एक नांवामुळं या मास्तराशीं निष्कारण नातं लागण्याचा संभव उत्पन्न होतो ! ’ त्याची आठवण होऊन तिला या आडनांवाच्या साम्यानें जरी परिचयाचें स्मरण झालें तरी तिनें तें बोलून दाखविलें नाहीं. म्हणून तिनें फक्त एवढेंच विचारलें कीं,

‘ तुमची आणखी हकिकत काय आहे ? ’

‘ माझं लग्न माझ्या वडिलांनीं एका चांगल्या शिकल्या सवरलेल्या गृहस्थाशीं केलं, लग्नाच्यावेळीं वडिलांनीं आवाक्याबाहेर हुंडाही दिला. सालंकृत कन्यादान केलं. मुलगा हुशार, शिकलेला आणि तडफदार म्हणून आमचा संसार लागीं लावून देतांना कशालाही खर्च करायला वडिलांनीं मागेंपुढें पाहिलें नाहीं. आमच्या माहेरची गरीबीच होती. वडिलांना साठ रुपये पगार होता. पदरीं सात मुलं होतीं. थोरली मुलगी मी. त्यामुळं त्यांना आला दिवस घालवायचा म्हणजे मोठा त्रास व्हायचा. माझ्या लग्नांत त्यांनीं घरांतले आईचे सारे दागिने माझ्या अंगावर घातले. कारण सात मुलांत मुलगी अशी मी एकटीच होतें. मुलगे काय, त्यांचं ते पाहून घेतील असं वडील म्हणत. आमचा संसार तीन एक वर्षे सुखाचा झाला. पण त्यानंतर एका शिकलेल्या मुलीशीं माझ्या पतींची ओळख झाली. कसले तरी अभ्यास करण्याच्या निमित्तानं ती दोघं एकत्र येऊं लागलीं. माझ्या पतींना एका मासिकाच्या छापखान्यांत नोकरी आहे. ते विद्वान म्हणून त्यांच्याकडं अनेक स्त्रीपुरुष स्नेहीमंडळी माहिती विचारण्याकरितां येत. त्यांतलाच हाही प्रकार असेल असें वाटून मी गप्प बसलें. आणि खरोखर मला आरंभीं त्यांत कांहींच गैर वाटलं नाहीं. आमच्याच घरीं त्या दोघांच्या बैठकी होऊं लागल्या. ती कुठेशी शाळेंत मास्तरीण आहे. दिसायला बरी आहे. वागायला फार चांगली आहे. म्हणूनच मला कांहीं वाटलं नाहीं. माझ्या पतीच्या बैठकीच्या खोलींत तीं बसत. बाहेरून येणाऱ्या जाणाऱ्या माणसांचा व्यत्यय नको म्हणून कडया लावून बसत. त्याचंही मला कांहीं वाटलं नाहीं. पण एकदां माझे चुलत दीर आमच्या घरीं सहज आले होते. दुपारची वेळ होती. हीं दोघेंजण वरच्या खोलींत बसलीं होतीं. भावोजींना खालीं बसावयास

सांगून मी जिना चढून दाराशीं गेलें. म्हटलं कांहीं काम चाललं असेल तर एकदम दाराला धक्का देऊन व्यत्यय आणूं नये. म्हणून दाराशींच उभें राहून मी कानोसा घेतला. आंत कोणाचीच चाहूल ऐकूं येत नव्हती. बोल-ल्याचाही आवाज उठत नव्हता. इतक्या स्तब्धपणानें कदाचित् कांहीं लिहिण्याचं काम चाललं असेल असें वाटून मी स्तब्धच उभी राहिलें. पण मला वाटतें माझी चाहूल आंतल्याबाजूला लागली असावी. मला विचारलं,

" कोण आहे ? "

मी अर्थातच उत्तर दिलें, " भाऊजी आले आहेत. खालीं बसले आहेत ते. "

त्यावर उत्तर आलें, " बरं असूं दे. तूं खालीं जा, उभी नको राहूस तिथं. "

या तोडून बोलण्याचें मला फार वाईट वाटलं. मी तडक खालीं गेलें आणि भाऊजींच्या पुढून स्वयंपाक घरांत निघून गेलें. भाऊजी त्या-जागीं कितीतरी वेळ बसून राहिले होते. वरती निरोप कळला असतांही खालीं न येण्याइतकं महत्त्वाचं काम आहे तरी काय, असा मला राहून राहून प्रश्न पडत होता. शिवाय भाऊजींचा आम्हाला अडीअडचणीला शेंकडोंवेळां उपयोग झाला होता. त्यांचे आमच्यावर एक दोन प्रसंगी तर फार फार उपकार झाले होते. अशा माणसालाही खुशाल खालीं बसवून हे वर बसतात याचें मला नवल वाटलें. शेवटीं कंटाळून भाऊजी निघून गेले. संध्याकाळपर्यंत मात्र यांचे अभ्यास चाललेच होते. असें रोजच्या रोज सुरू झालें. मी धुसफूस केली तरी तिचा कांहीं उपयोग नव्हता. उलट पतीच्या अधिकारानं त्यांनीं मला गप्प करण्याचा सपाटा लावला. मी शेवटीं चिडून माहेरीं गेलें. तेथेंही वडील वारल्यामुळें बखेडाच होता. काय करायचं ? पदरीं दोन लहान मुलं. त्यांना घेऊन कुठं रस्त्यावर तर बसायचं नाहीं ! शेवटीं खूप विचार केला अन् इथं आलें. "

अशा हकीकती ऐकून घेतल्यानंतर विशेष अवघड असणारी का-

गिरी म्हटली म्हणजे नवऱ्यांची नांवं विचारून त्यांच्या व्यवसायांची माहिती करून घेण्याची. " नवऱ्याचं नांव मी सोडून दिलं आहे. प्राण गेल्यानं त्याचा उच्चार करावयाचा नाहीं, " असाही पोरकट हट्ट कितीतरी स्त्रिया घेऊन बसत ! आणि मग त्यांना तें नांव सांगण्याची आवश्यकता पटवून द्यावी लागे. तिथं येणाऱ्या बायका बुद्धीनं कांहीं जडच असत असें नाहीं. त्यांना साऱ्या गोष्टी नीट समजत. पण त्यांना या नवीन धर्तीवर चालवलेल्या संस्थांचें आणि तेथें प्रवेश मिळवितांना द्यावयाच्या माहितीचें तितकें महत्त्व कळत नव्हतें ! केवळ असाहाय्य होऊन त्या आसऱ्याला येत, इतकेंच.

पण वरील सारी हकीकत ऐकत असतां आडनांवाच्या साम्यामुळें नीरेच्या मनांत कांहीं भलत्याच विचारांनीं कल्लोळ मांडला होता. तरीही त्या कल्लोळाला दडपून टाकीत तिनें ती हकीकत ऐकून घेतली, आणि शेवटीं विचारलें,

" सबंध नांव काय तुमच्या पतीचं ? "

क्षणमात्र थबकून खडखडीत आवाजांत त्या बाईनें नांव सांगितलें.

" रामकृष्ण गणेश आनंदकर. "

तें नांव ऐकल्याबरोबर नीरा खुर्चीतल्या खुर्चीत चमकून हालली, पण तें त्या बाईला समजूं न देतां तिनें म्हटलें,

" तुम्हाला इथं प्रवेश मिळेल. पण नक्की काय तें दोन दिवसांनीं सांगेन. "

त्यावर नीरेचा निरोप घेऊन ती बाई बाहेर पडली तेव्हां नीरा स्तब्ध बसली होती. कांहींसा खोल विचार करून तिनें मानेनें नकार भरीत मनाशीं म्हटलें, " छे ! असं नाहीं व्हायचं ! " आणि असें म्हणत असतांना तिच्या अंगावर शहारे आले.

आणि मग तिनें त्या दिवशीचें काम आवरलें आणि ती घरीं गेली. तिची विषण्ण चर्या पाहून माईनें तिला विचारलें,

" कां ग ? दमलेली दिसतेस ? "

" हं " एवढेंच म्हणत नीरा पलीकडच्या खोलींत जाऊन बैठकीवर लवंडली. लांबूनच वांकून माईनें तिच्याकडे पाहिलें, तों ती डोळे घट्ट मिटून घेऊन पडली होती. आतां इतक्यांतच तिच्याशीं बोलण्यांत अर्थ नाहीं, ती फार दमलेली दिसते, असें वाटून माईनेंही मग कांहीं बोलणें केलें नाहीं.

कांही वेळानें नीरा उठली. तोंड धुवून नेसतें लुगडें साफ करून बाहेर जाण्याच्या तयारीनें माईला तिनें म्हटलें, " माई, मी गांवदेवीला प्रमिलेकडे जातें जरा. दहाच्या आंत रात्रीं परत येईन."

" आणि जेवणाचं काय ? इतकी थकून आलीस. आतां नको जाऊंस."

" माई, मी हें नवीन काम करायला सुरवात केली हें प्रमिलेला अजून कळविलेलं नाहीं. मला तें तिला कळवायला हवं. उशीरच झाला खरं म्हणजे कळवायला ! अन् जेवायचं म्हणालीस, तर मला तशी भूकच नाहीं. दुपारीं चहा झाला आहे. आणि तसं वाटलं तर प्रमिलेकडे जेवीन."

तिला ठेवून घ्यायला कांहीं निमित्त पाहिजे म्हणून माईनें म्हटलें, " अग , आज खटल्याचं कांहीं समजायचं होतं ना ?"

" हो. मी आतां येतां येतां चौकशी केली. पण अजून कांहीं कळलं नाहीं. असंच होतं तें. आपण वाट पाहात राहावं न् कांहीं कळूं नये. उद्यां सकाळचीं वर्तमानपत्रें निघेपर्यंतही एकाद्यावेळीं कांहीं कळायचं नाहीं. पहातें आतां येतां येतां कांहीं कळलं तर."

नीरा गांवदेवीला पोहोंचली तेव्हां साडेआठचा सुमार झाला होता. तिनें रस्त्यावरूनच प्रमिलेच्या खोलीकडे पाहिलें तों आंत अंधार होता. प्रमिला बहुधा घरीं असणार नाहीं असें वाटून ती त्या पावलींच परत फिरणार होती. पण आपण येऊन गेल्याची चिठ्ठी टाकावी म्हणून ती जिना चढून वर गेली. ती वर गेली आणि तिनें प्रमिलेच्या खोलीचें लावलेलें दार बाहेरून उघडें आहे असें पाहिलें, तेव्हां तिला आश्चर्याचा धक्का बसला. डोकेंबिकें दुखून ती आजारी पडली असेल आणि दिवे

घालवून निजली असेल असें वाटून तिनें दारावर थाप मारली. चाहूल येईना म्हणून तिनें दार खडखडावलें. आंतून प्रमिलेचें 'ओ' असें उत्तर आलें.

कांहीं वेळानें दार उघडलें, आणि झोंपेंतून अर्धवट जागी झाल्यासारखी प्रमिला तिच्यासमोर उभी राहिली. प्रमिलेच्या मागच्या दोन्ही खोल्यांतून अद्याप अंधार होता. नीरा दाराबाहेरल्या चौकटींत उभी होती, तेथेंच काय तो दिवा लागलेला होता. बंगाली चित्रांतील काळ्या पार्श्वभूमीवरील रेखाचित्रासारखी प्रमिला त्यावेळीं नीरेला दिसली. नीरेनें तिला विचारलें.

" कां ग ? आजारी आहेस होय ? "

तोंडानें कांहींच उत्तर न करतां प्रमिलेनें नुस्ती मान हलविली !

" मग मी बरी वेळेवर आलें. आतां तूं खुशाल अंथरुण घालून पड, मी तुझ्याजवळ बसतें. "

असें म्हणत म्हणत नीरा आत शिरली. " मी येतेंच हं तोंड धुवून ! " असें म्हणत प्रमिला न्हाणीघराकडे निघून गेली आणि नीरा उजव्या हाताच्या दारातून आंत गेली. त्या खोलींत तिचें पाऊल पडल्याबरोबर टेबलावरचा विजेचा दिवा लागला. एकदम लागलेल्या त्या दिव्यानें ती चमकली, आणि थबकून उभी राहिली !

समोरच्या आरामखुर्चीवर दादासाहेब आनंदकर बसले होते ! चर्येवर कसलाही विकार न दाखवितां त्यांनीं नीरेला म्हटलें, " या, फार दिवसांनीं गांठ पडली तुमची. बाकी तुम्ही काय कांहीं तरी उद्योगांत असावयाच्या ! "

" छे, छे, उद्योग कसला आला आहे ? इथपर्यंत यायचं म्हणजे बरंच लांब यावं लागतं. त्यांतून प्रमिला भेटली तर ठीक. नाहींतर गेली असली कुठं लायब्ररींत म्हणचे संपलंच मग. "

" हो. त्यांचं तें लिहिण्याचं काम चालू आहे ना ! "

पण असें मामुली बोलणें चालू असतांना नीरेचें मन मात्र व्यग्र

होतें. तिनें सूक्ष्मपणानें दादासाहेबांकडे पाहिलें, तों तिला त्यांची दृष्टि कसल्यातरी उन्मादक विचारांनीं जड झाल्यासारखी, मंदावल्यासारखी दिसत होती!

आणि या अवलोकनाच्या भरीला तिच्या मनाला नाना तऱ्हेच्या विचारांची जबरदस्त आंदोलनें बसत होतीं. " काय या साऱ्याचा अर्थ? का आपण मानतों आहो तो अर्थ अजीबात चुकलेला आहे? " असे प्रश्न ती स्वतांलाच कितीदांतरी विचारीत होती.

तिचा तो संभ्रम ध्यानांत येऊनच दादासाहेबांनीं म्हटलें,

" मी नुकताच आलों. मी आलों तेव्हांही प्रमिलाबाई अशाच अंधार करून निजलेल्या होत्या. त्यांचं डोकं दुखत होतं. मी लागलीच परत जाणार होतों. पण आल्यासारखा थोडा बसलों. म्हटलं त्यांना दिवा नको आहे तर कशाला लावा? "

पण दादासाहेबांच्या तोंडून हे शब्द बाहेर पडतांना त्यांची जीभ चाचरत होती! आणि ती गोष्ट नीरेच्या लक्षांत आल्याशिवाय राहिली नाहीं!

कितीवेळ झाला तरी प्रमिला न्हाणीघरांतून बाहेर आली नाहीं! नीरेनें मनाशींच अर्धवट मोठ्यानें म्हटलें, " हिला कां वेळ लागला कुणास ठाऊक? "

ती संधि घेऊन दादासाहेबांनीं म्हटलें,

" कपाळावर पाणी मारून घेत असतील! "

नीरेला वास्तविक येऊन कांहीं कंटाळा येण्याइतका फार वेळ झाला नव्हता. तरीही जाण्याची घाई दाखवीत तिनें ओरडूनच प्रमिलेला म्हटलें, " जाते ग मी प्रमिले आतां! मग घरीं पोचायला उशीर होईल. "

तेव्हां मात्र प्रमिला न्हाणीघरांतून बाहेर आली. तिचें पातळ पाण्याच्या ठिपक्यांनीं ठिकठिकाणीं भिजलें होतें. ओले केस गालांवर आणि कपाळावर वेडेवांकडे चिकटले होते.

" कां ? थांबत नाहींस अगदीं ? " असें कांहींसें विचारीत प्रमिलेनें नीरेला उलट जाण्याचीच परवानगी दिली !

घरीं पोंचेपर्यंत नीरेचें मन विचारांच्या धुमश्चक्रीनें गोंधळून गेलें होतें.

अजून घरांत दिवा दिसत होता. नीरेनें थाप मारतांच कुणींसें दार उघडलें. तिनें पाहिलें तों दारांत शिरीषकुमार उभे ! तिनें चमकून विचारलें, " म्हणजे ! "

त्यावर त्यानें उत्तर केलें, " मी आज निर्दोषी म्हणून सुटलों. माईनं मला सांगितलं तूं इथं आहेस, आणि मोठ्या उद्योगाला लागली आहेस म्हणून. पण आतां कांहीं बोलायचं नाहीं. मला बरंच काम आहे. उद्यां सकाळीं सारं बोलूं ! " आणि असें म्हणत त्यानें आपल्या खोलींत जाऊन दार बंद करून घेतलें।

# प्रकरण नववें

## आंत वस्ती नसलेल्या सुंदर इमारतीचा त्याग केला !

शिरीषकुमाराची सुटका ही शेवटीं माईला अनपेक्षितच वाटली. वास्तविक नीरेनें तिला या सुटकेची कल्पना दिली होती. तरी पण किती झालें तरी माईचें मन हें आईचें मन होतें. त्या मनाला दुष्ट शंकांनीं एकसारखें पछाडत राहावें यांत कांहीं नवल नाहीं.आणि दुष्ट शंकांनीं हैराण झालेलें मन सुखाच्या अनपेक्षित आगमनानें जितकें आनंदित होतें, तितकें तें कशानेंही होत नाहीं.

त्या आनंदाच्या भरांत आज माइच्या हातून होणारे व्यवहार तिला कष्टदायक वाटत नव्हते. पहाटे उठल्यापासून आज तिची प्रत्येक कामांत विशेष तत्परता दिसत होती. शिरीषकुमार उठला कीं, त्याच्यापुढें चहाचा कप ठेवतां यावा, म्हणून तिनें मंद स्टोव्हवर कितीवेळ तरी पाणी उकळत ठेवलें होतें. मधूनमधून पाणी कमी झालेसें वाटलें कीं, त्यांत आणखी भर घालावी असें तिनें तीन चार वेळां केलें. नीरा उठून पुढयांत एक पुस्तक घेऊन वाचीत बसली होती. ‘ शिरीषकुमाराबरोबरच मी चहा घेईन,’ असें तिनें माईला सांगितलें होतें.

पण शिरीषकुमार उठण्याचें चिन्ह दिसेना. “ याची ही नेहमींचीच तऱ्हा आहे. किती वेळ माणसानं तारतळत बसावं ! ” असें माईनें एक दोन वेळां खोट्या रागाच्या आविर्भावानें उद्गारही काढले. त्यावर नीरेनें उत्तरही केलें होतें, “ माई, मागेंपासूनचीच त्यांची संवय आहे ही. पुण्याला मागें कॉलेजांत असतांना त्यांनीं अशीं जाग्रणं करून उशीरां डोळे उघडले, म्हणजे मी म्हणत असें, “ निष्कारण सुखाचा जीव दुःखांत घालण्याची वृत्ति आहे तुमची ही. इतकीं जागरणं करून काय मिळवायचं

आहे तुम्हाला ? आणि बरं कां माई, असं मी विचारलं म्हणजे ते चेष्टेनें उत्तर करीत, 'तुला समजायचं नाहीं, या दुःखांत कोणतं सुख आहे तें ! तेवढया सुखावरही... "

पण नीरेचें हें बोलणें चालू असतांनाच शिरीषकुमारांनीं स्वयंपाक-घरांत पाऊल टाकलें. आधीचें बोलणें काय चाललें होतें इकडे दुर्लक्ष करीत त्यांनीं म्हटलें, " कां माई, झालं कां तुमचं सारं ? "

माईनें उत्तर केलें, " आमचं काय व्हायचं आहे ? तुझीच वाट पाहातों आहों आम्ही चहाकरितां. "

' असं ? मला वाटलं तुम्ही माझ्याकरितां थांबलां नसाल ! ' असं कांहीं तरी बोलायलाच पहिजे म्हणून बोलतबोलत त्यानें स्नानगृहाची वाट धरली.

माईनें मांडून ठेवलेल्या पाटावर बसता बसतां शिरीषकुमारांनीं म्हटलें, " माई, आतां मी चहा सोडणार आहें. "

" तूं ? आणि चहा सोडणार ? इकडचं जग तिकडं होईल एकवेळ, बाबा, पण तुझा चहा सुटण्याचं कांहीं व्हायचं नाहीं. "

नीरेनें मध्येंच विचारलें , " चहानं काय केलं आहे पाप ? "

" मी कांहीं तें वाईट व्यसन आहे म्हणून सोडतों असं नाहीं. मी चहा कां सोडणार आहें तें कळायचं नाहीं तुला ! "

" कां ? मला न कळायला काय झालं ? मी माणूसच आहेना ? "

" अग पण, माणसांमाणसांत भेद असतो. बरी आठवण झाली. आज संध्याकाळींच मला एके ठिकाणीं जायचं आहे. तिथं माझ्याबरोबर आलीस म्हणजे मीं काय म्हणतों तें तुला आपोआपच कळेल. येशील माझ्याबरोबर ? "

" कुठं जायचं नि कशाला जायचं त्याचा कांहींच पत्ता नाहीं; आणि एकदम हो कशी म्हणूं ? "

" माझ्याबरोबर यायचं म्हटल्यानंतर बाकीची चौकशी कशाला हवी ? मी कुठं भलतीकडं नेऊन कांहीं दगाफटका करीन अशी भीति वाटते कां तुला माझ्याबद्दल ? "

" तुमच्याबरोबर येण्यांत भीति नाहीं. एवढं मला समजत नाहीं, असं नाहीं; पण—"

पण नाहीं न् कांहीं नाहीं. माझ्याबरोबर आज संध्याकाळीं यायला हवं हं. तोंड गोड होईल. "

" मग नको हं. कुठें पार्टीबिर्टी असली तर मला अगदीं संकोच-ल्यासारखं होईल. "

" छे. छे. ही तसली पार्टी नाहीं. पहा तर खरी काय गंमत आहे ती ! आणि शिवाय दिवसभर काम करून थकल्यावर तुला अगदीं नवीन जगांत गेल्यासारखं वाटेल. "

त्याच्या या बोलण्याला माईनें अडथळा केला. तिनें म्हटलें, " पण घरीं लवकर परत यायचें आहे याची मात्र आठवण असूं द्या हं. नाहींतर तूं एक जाशील आणि तिलाही हिंडवीत बसशील ! "

" नाहीं नाहीं. आज अगदीं नक्की लौकर येईन. माझ्या भरमसाट गाडीला ब्रेक लावायला नीरा आहे ना माझ्याबरोबर !" आणि असें म्हणत शिरीषकुमारांनीं नीरेकडे तीव्र दृष्टीनें पाहिलें, आणि तिला विचारलें,

" समजलं कां तुला माईच्या बोलण्यातून कोणता अर्थ निघतो तो?"

" नाहीं बाई. आणि तिचं बिचारीचं सहज बोलणं इतकं पिंजायला कशाला पाहिजे ?"

" छे. छे. तिच्या मनांत कांहीं विशिष्ट अर्थ होता असं नाहीं मी म्हणत. पण परंपरेच्या विचारानं माणसाचं मन नकळतच कसं घडविलं जातं तें मी सांगतों आहे. माझ्या बाहेर राहाण्यांत आणि उशीरानं रात्रीं येण्यांत गैर असं कांहीं नाहीं. पण तीच तूं, म्हणजे एक अविवाहित मुलगी माझ्याबरोबर रात्रीं अपरात्रीं हिंडत राहिलीस तर तें गैर ठरतं. माईचंच नव्हे. समाजांतल्या साऱ्याच माणसांचं मत असं असतं. '

" पण तसल्या मताला बुजून वागणारी मी नाहीं. तसं वागायचं असतं तर आज मी इथें कशाला आलें असतें ? "

" खरंच, तूं इथं आहेस हें काल आल्यावर कळल्यापासून मी एक-सारखं विचारीन विचारीन म्हणतों आहे. नीरे, अगदीं नोकरीच करायची होती तर पुण्यांत काय कमी संस्था होत्या ? शिवाय तुझ्या वडिलांचा तर प्रत्येक संस्थेशीं असा कांहीं जबरदस्त ऋणानुबंध आहे कीं त्यांनीं मनांत आणलं असतं तर वाटेल त्या संस्थेंत तुला प्रमुखपणाचा अधिकार मिळाला असता. तूं इथं येऊन नोकरी करायला लागलीस हें माईनं मला सांगितलं तेव्हां मला आश्चर्याचा धक्का बसला. आधीं घर सोडून जाणं हेंच तुझ्या संबंधांत कसं घडलं कुणास ठाऊक ? मागची गोष्ट आठवते ना तुला ? कार्ल्याची लेणी पाहण्याकरितां मी अन् माई जाणार होतों. त्यावेळीं तुला आम्ही किती आग्रह केला. तुझ्या वडिलांची संमति मिळविण्याकरितां माई कितीवेळ तरी तुमच्या घरीं बसली होती. आणि तूं जाण्याबद्दल शेवटीं नकार देतांना सबब कोणती सांगितली, तर म्हणे, हाल होतील तिचे ! "

हा शिरीषकुमारांनीं आठवून दिलेला प्रसंग नीरेच्या डोळ्यापुढें उभा राहिला आणि याही वेळीं मनाला वाटणाऱ्या खेदाचें प्रतिबिंब तिच्या चर्येवर उमटल्याशिवाय राहिलें नाहीं. शिरीषकुमारांच्या पुढल्या उद्गारांनीं तर तो खेद अधिकच वाढला.

" इतकी जिची आईबापांनीं काळजी वाहिली, तिला त्यांनीं मुंबईला आपल्यापासून दूर जाऊं दिलें, तेंहि कांहीं थोडेथोडके दिवस नाहीं, तर एखाद्यावेळीं कायमची नोकरी मिळाली तर मुंबईतच मुलीनें राहावें अशी अपेक्षा ठेवून, याचं मला खरोखर मोठं नवल वाटलं. "

" बाबांच्या मनांत हा सारा फरक पडायला तुम्हीच कारण आहां ! "

एकदम गंभीरपणानें नीरेनें काढलेल्या या उद्गारांनीं शिरीषकुमाराला थोडे स्तब्ध राहावें लागलें. आपण जें बोलणें केवळ विनोदानें बोलत होतों, त्यातून नीरेला असा गंभीरपणा येण्यासारखा विषय आपोआपच बाहेर पडावा, याबद्दल त्याचा तोच मनांत चूर झाला ! आणि तेवढें एकच वाक्य उच्चारून नीराही कांहीं वेळ स्तब्ध बसली हे पाहून तर त्याला

फारच चमत्कारिक झालें. वास्तविक थट्टाविनोद करीत एकमेकाशीं मनसोक्त बोलण्याची त्यांना संवय नव्हती असें नाहीं. पण आतांची ही स्तब्धता दोघांनाही विचित्र वाटली हें मात्र खरें. नीरेलासुद्धां मनांतून असें वाटलें, कीं साध्या बोलण्याची गाडी अशा तुटक बोलण्यानें आपण भलतीकडेच नेली. शारीरिक आणि मानसिक कष्ट सोसून शिरीषकुमार परत आल्याला अवघी एक रात्रही उलटली नाहीं तोंच आपण हा विषय काढायला नको होता. असल्या या अनिष्ट स्तब्धतेचा भंग करायलाच पाहिजे म्हणून शिरीषकुमारानें विचारलें,

" माझ्यामुळं तुला दूर जाऊं देण्याइतका कठोरपणा तुझ्या वडिलांच्यांत आला असला तर तें एकपरी चांगलंच झालं. कारण त्यामुळं तूं आपल्या भोंवतालचं जग पाहायला शिकशील. गेले कितीतरी दिवस मी जी तुझ्याबद्दल ओरड करतों आहे, ती शेवटीं फळाला येणार असं दिसतं तर एकूण ? "

" पण ती ओरड सुखासुखी फळाला येईल असं दिसत नाहीं. "

" त्रासाचं मला कांहीं एवढं वाटत नाहीं. नाकातोंडांत पाणी गेल्याशिवाय पोहायला येत नाहीं आणि पोहायला आल्याशिवाय तळाचा ठाव घेतां येत नाहीं. आपल्यासारख्या कितीकीं पुष्कळांचं जीवन हें उगीचच काव्यमय असतं. हिमालयाच्या उत्तुंग शिखरावर असलेले स्फटिकासारखे स्वच्छ बर्फाचे खडक जमिनीपासून कुठल्या कुठें दूर असतात. सूर्यकिरणांची आंच लागून त्यांना पाझर फुटूं लागले म्हणजे तेही कड्यावरून उड्या घेणाऱ्या जलौघाबरोबर जमिनीचा ठाव घेतात ! व्यवहाराची आंच लागल्याबरोबर सारे मनोरथ बाजूला गुंडाळून ठेवून तऱ्हेतऱ्हेच्या प्रवाहांत सामील व्हावं लागतं ! प्रवाहांतून वाहात जातांना जगण्याकरितां हातपाय हालवायचें म्हटलें, तरी कांहीं थोडे थोडके कष्ट होत नाहींत ! "

" हे सारं तत्त्वज्ञान ठीक आहे. "

" छे तत्त्वज्ञान नाहीं सांगत मी. व्यवहार सांगतों आहे मी. तत्त्वज्ञान हा माझा नि तुझा, दोघांचाही पदवीपरीक्षेला विषय होता. माझ्या-

वेळच्या एका हुशार विद्यार्थ्यांची माझी नुकतीच गांठ पडली होती. तो या विषयांत पहिला आला होता आणि त्यानें त्यांत सुवर्ण पदकही मिळविलें होतें. गेली सहा वर्षं तो हा विषय कॉलेजमध्यें शिकवीत असतो. पण त्यानेंच या विषयासंबंधानें काय उद्गार काढले ठाऊक आहे कां तुला? त्यानं बोलतां बोलतां मला म्हटलं "All philosophy is smoke." त्यानें हे उद्गार कोणत्या हेतूनें काढले ते मला नक्की सांगतां येत नाहीं. पण त्याचं म्हणणं मला पटतं! खरं आहे. जगांतलं तत्त्वज्ञान हा धूर आहे. शकडों लोकांच्या डोळ्यांत हा धूर जाऊन त्यांनी डोळे मिटून घेऊन व्यवहार करावेत असा या शक्तीचा संकेत आहे."

"पुरें झालं. आपण इतक्या कष्टानें मिळविलेल्या ज्ञानाची अशी हेटाळणी करणं म्हणजे स्वतःचाच अपमान करणं आहे."

"वेडी आहेस तूं नीरे. खूप घामाघूम होईपर्यंत आपण एखाद्या खाणमिध्यें राबलों आणि तिथून सोन्याच्या अवजड लगडी महाप्रयासानें वाहून आणल्या, हें अगदीं कितीही खरं असलं तरी त्या लगडीचा व्यवहारांत जर कांहीं उपयोग करतां आला नाहीं, तर सारी ढोरमेहनत केल्याबद्दल आपला आपल्यालाच दोष द्यायला नको का? आणि तत्त्वज्ञान तर व्यवहारांत कितीवेळां तरी अगदीं निरुपयोगी ठरल्याचं मी पाहिलं आहे. तत्त्वज्ञानांत आपण काय शिकलों तर प्रत्येक मनुष्य हा abnormal असतो. पण व्यवहारांत नॉर्मल तर राहूं द्याच पण सारी माणसं subnormal होत चालली आहेत!"

या सूक्ष्म विनोदाचें नीरेला हसूं आल्याशिवाय राहिलें नाहीं. "तत्त्वज्ञानांतल्या व्याख्या काय किंवा वाङ्मयांतले वाद काय सारेच स्वास्थ्यप्रिय समाजाचे करमणुकीचे प्रकार आहेत! पूर्वीं हें तत्त्वज्ञान पुस्तकांत तरी गपचिप होतं, आणि ते समाजांतल्या चारदोन लोकांच्याच काय तें हातीं लागत होतं! पण वारकरी सांप्रदाय आणि भागवत धर्म हे सारे प्रकार जन्माला आले. ते जन्माला आणणारांची कल्पना अशी कीं, आम्ही बहुजनसमाजावर उपकार करीत आहों. आणि शिकविलं काय तर

'आलिया भोगासी असावें सादर.' मुंबईत आजमितीलाही हजारों कामगार एकत्र जमून टाळमृदंग बडवितात, असलेच कांहीं अभंग कंठरवानें ओरडून म्हणतात आणि स्वतांला दुःखांचा विसर पाडण्याचा प्रयत्न करतात. कुणीसं म्हटल्याचं आठवतं कीं पैसा हें आजच्या समाजांतलं विष आहे. मला वाटतं तत्त्वज्ञान ही त्या विषाचा विसर पाडणारी भूल आहे!"

बोलतां बोलतां शिरीषकुमाराला काय वाटलें कुणास ठाऊक? पण त्यानें आपण होऊनच म्हटलें, "मी वाहवलों नाहीं, जरा बोलतां बोलतां? माझं हें अलीकडं असं फार व्हायला लागलं आहे! कांहीं कांहीं वेळेला अगदीं असह्य होतं. राहावत नाहीं. आणि मग मी असं अवेळींच बोलत सुटतों. पण हें नेहमींचंच आहे. तूं काय सांगत होतीस तें सांग."

आपल्याला जी गोष्ट आतांच सांगू नये असें वाटत होतें ती न सांगण्याला कांहींतरी निमित्त देणारी संधि नीरेला हवी होती, ती तिला आयतीच मिळाली. कांहींशा खोडकरपणानें तिनें म्हटलें, "कुठं काय सांगत होतें मी?"

"नीरे, आपला मूळ विषय काय चालला होता, तो मी आजिबात विसरून गेलों असं तुला वाटलं होय? माझ्यामुळं तूं पुणं सोडून मुंबईला येऊं शकलीस हें म्हणणं मी विसरलों नाहीं!"

हें शेवटचें वाक्य त्यानें उद्गारलें होतें तें मनांत कांहीं विशिष्ट हेतु धरून उद्गारलें होतें, किंवा सहज उद्गारलें होतें, याचा नीरेला चटकन् अंदाज करतां आला नाहीं. मनामध्यें कोणत्याही भावना घर करून असल्या तरी त्या अशा अनपेक्षित रीतीनें व्यक्त झाल्या किंवा कसल्याही साहजिक बोलण्यानें त्या भावनांना ओझरता स्पर्श झाला तर त्यांत अप्रिय असें काय असतें? पण मनाला थोडासा आश्चर्याचा धक्का बसल्याशिवाय राहात नाहीं. या धक्याचा प्रतिकार करण्याच्या हेतूनेंच नीरेनें म्हटलें, "छे, छे, असं नाहीं म्हटलं मी."

" मग कसं म्हटलं होतं ? "

आणि या उलटलेल्या प्रश्नानें ज्या गोष्टी उघड करून सांगण्याच। तिनें इतका वेळ लपंडाव चालविला होता, त्या स्पष्टपणें सांगण्याशिवाय आतां तिला गत्यंतर उरलें नाही.

× × ×

त्याचं असं झालं होतं कीं, तिला गेल्या वर्षात आपल्या वडिलांशीं विशेष बोलण्याचे दोनचारच प्रसंग आले होते. पण त्या साऱ्या प्रसंगीं तिला अप्रिय असणारी गोष्टच बोलण्याचा विषय झाली होती, आणि चर्चेच्या एकंदर व्यावहारिक स्वरूपामुळें तिचा उद्वेग प्रत्येक प्रसंगीं वाढतच गला होता.

नीरेने शिकणें, किंबहुना प्रत्येक बाबतींत यश मिळविणें, हा आपलाच पराक्रम आहे, असें उगीचच मानीत राहाण्याची तिच्या वडिलांची प्रवृत्ति होती. गांधर्व महाविद्यालयांत संगीत शिकून नीरा गाणें म्हणण्यांत आणि पेटी व दिलरुबा वाजविण्यांत वाकबगार झाली तेव्हां तिच्या वडिलांना स्वत:बद्दलच धन्यता वाटली. जणूं कांहीं संगीत-शास्त्रांतील नीरेचे ज्ञान हें केवळ त्यांच्यामुळेंच पैदा झालें होतें ! लाहोर व अमृतसर येथें जाऊन श्री. विनायकबुवा पटवर्धनांच्या नेतृत्वाखालीं जेव्हां तिनें संगीताच्या चढाओढींत यशस्वीपणें भाग घेतला, इतकेंच नव्हे, तर गायनकोकिळा ही पदवी आणि बहुमानाचें सुवर्णपदक मिळवून ती जेव्हां परत आली तेव्हां तिच्या वडिलांनीं जें तिचें कौतुक केलें तें स्वत:-चेंच कौतुक करून घेण्याच्या मिषानें होय ! मॅट्रिकच्या परीक्षेंत दुसरी जगन्नाथ शंकरशेट शिष्यवृत्ति आणि यमुनाबाई दळवी शिष्यवृत्ति तिला मिळाली तेव्हांही प्रकार असाच ! परीक्षेचा निकाल देणारी ज्ञानप्रकाशाची पुरवणी बाजूला पडली होती. नीरेची आई स्टोव्हपाशीं बसून चहा तयार करीत होती. नीरा वडिलांपासून जरा दूरच बसली होती. चहाच्या किंवा जेवणाच्या प्रसंगीं ही मंडळी एकत्र जमली म्हणजे सामान्यतः बोलण्याचें काम वडिलांनीं करावयाचें आणि ऐकण्याचें काम दोघी माय-

लेकींनीं करावयाचें असा श्रमविभाग ठरून गेला होता ! जणूं कांहीं त्या संसारसंगीतांतील स्थायी षड्ज म्हणजे तिचे वडील आणि या दोघी म्हणजे त्यांचे संवादी स्वर !

त्या दिवशीं असेंच झालें. आपले आईबाप एकमेकांशीं हृदयस्पर्शी भाषणें करतांना नीरेनें आजपर्यंत कधीं पाहिलें नव्हतें. या वर्तनाचेंच बाळकडू तिला मिळाल्यामुळें आपल्या हृदयांतील भावना वडिलांजवळ उघड्या करून दाखविण्याची तिची केव्हांही तयारी नव्हती. किंबहुना या भावना शक्य तितक्या त्यांच्यापासून दडवून ठेवण्याचें चातुर्यच तिनें अंगीं बाणवून घेतलें होतें.

त्या चहाच्या वेळीं आपल्या पत्नीकडे पाहात तिच्या वडिलांनीं म्हटलें,

" तुझा चेहरा आज अगदी बदललेला दिसतोय. "

" म्हणजे ? " एवढेंच त्यांच्या पत्नीनें भीतभीत विचारलें.

" तसं नाहीं. चांगला दिसतो आहे. मला वाटतं मुलीच्या परीक्षेतल्या यशाचं तेज तुझ्या तोंडावर चढलं असावं. "

आणि असें म्हणत व आपल्याच विनोदानें खूप हंसत त्यांनीं नीरेकडे वळून म्हटलें,

" बरं का नीरे, कालपासून पाहातों आहे, ही अगदीं वीस वर्षांनीं लहान झाल्यासारखी दिसते आहे मला. मागें एकदां म्हणजे तुझ्या जन्मापूर्वी आम्ही कांहीं मित्रमंडळी सहकुटुंब बडोद्यास जमलों होतों. त्यावेळीं एका चांदण्या रात्रीं आम्ही साऱ्या स्त्रीपुरुषांनीं पळण्याची शर्यत लावली होती. त्या शर्यतींत तुझी आई पहिली आली होती. त्यावेळीं कुणीशी कोटी केली होती. "

" काय हें ? " एवढेंच मृदु निषेधाचे उद्गार काढीत नीरेच्या आईनें चहाचे पेले दोघांच्याही पुढें ठेवले.

" काय ? खरं तेंच सांगतों आहे. कोणसं त्यावेळीं म्हणालं कीं वास्तविक मीच हिच्यापुढं जायला हवं होतं, आणि गेलोंही असतों. पण

कां गेलों नाहीं याचें कारण त्या माणसानं मोठं मजेदार सांगितलें. पळणाऱ्या बायकोकडे पहात राहण्यांतच माझं सारं भान हरपलं, आणि त्यामुळं स्वतांला पळायचं आहे हें मी विसरून गेलों !

नीरेला या कोटीचें मात्र मनापासून हसूं आलें, पण त्या हंसण्याची भावना अन्तःकरणांत उठत असतांना तिला वडिलांच्या या बोलण्यांतून व्यक्त होणाऱ्या एका विशिष्ट स्वाभाविक छटेचीही ओळख पटल्याशिवाय राहिली नाहीं. आणि ती छटा म्हणजे ही कीं त्यांच्या आयुष्यांत, पत्नी झालेल्या स्त्रीचा कां होईना, पण मोहाचा मोठा भाग आहे ! नाहीं तर इतके दिवस तिला असें वाटत असे कीं, आपल्या आईची हुषारी, शिक्षण चतुरपणा इत्यादि सारे गुण अगदीं वांया चालले आहेत. कठोरपणानें वागणाऱ्या आपल्या बापाच्या सान्निध्यांत आईचें व्यक्तित्त्व पार क्षीण होऊन गेलें आहे.

पण वरच्यासारखे प्रसंगही फार थोडे ! किंबहुना अपवादानें नियमाला बळकटी आणणारे ! तरीही कॉलेजांत गेल्यापासून तिला वाटूं लागलें की, प्रसंगविशेषीं आपल्याला बापाच्या हृदयाला स्पर्श करतां येईल. या आशेबरच तिनें आपल्या मनांत स्वतःच्या भवितव्याविषयीं निरनिराळ्या आशाअकांक्षा निर्माण होऊं दिल्या आणि त्याची वाढही होऊं दिली. संधी आली तर याही आशा—आकांक्षाना मूर्तस्वरूप आणण्याकरितां वडिलांचें साहाय्य घेतां येईल. अगदींच कांहीं नाहीं, तरी आईची मध्यस्थी आहे. बाबा तिच्याशीं कधीं कधीं कां होईना पण फार सलगीनें वागतात. तिच्या प्रेमाची त्यांना मोहनी असल्याचा क्वचित् भासही होतो !

अंतर्मनांत हळुहळू घर करून राहणाऱ्या या जाणिवेनें नीरेच्या अलीकडच्या वर्तनावर कांहींएक वेगळाच परिणाम तिच्या नकळतच होत गेला. तिच्या ठिकाणीं गेलीं दोन तीन वर्षें जो वृत्तीचा निर्भयपणा येत चालला होता तो वास्तविक ज्या पद्धतीनें तिला वाढविण्यांत आलें होतें, तिच्याशीं सर्वस्वी विसंगत होता; पण त्याचें मूळ वरच्या कारणपरंपरेंत होतें हें तिचें तिलाही सांगतां आलें नसतें.

बी. ए. ची परीक्षा होऊन विश्रांतीचे पांच सहा महिने जाईपर्यंत तिला स्वतांविषयींच्या अशा कोणत्याच गोष्टींत विशेष मनःपूर्वक लक्ष घालावें लागलें नव्हतें. परीक्षेनंतर पांच सहा महिने तिला विश्रांति घेणें जरूरच होतें. कारण बी. ए. चा शेवटचा पेपर देऊन ती परत येत असतांनाच तिला थंडी वाजून आली. आपली अभ्यासूपणाची परंपरा टिकविण्याकरितां तिने जे कक्षाबाहेर श्रम केले त्याचा हा परिणाम होता. नीरेला मिळणाऱ्या यशांत आपली पराक्रमाची कल्पना मिसळून देऊन वागणाऱ्या तिच्या वडिलांनीं बी. ए. च्या परीक्षेच्या वेळीं तिच्या मागें अधून मधून अभ्यासाचा तगादा लावला होता. कधीं कधीं तिच्या प्रोफसरांची गांठ पडली म्हणजे ते मुद्दाम नीरेच्या अभ्यासाचा विषय काढीत. आणि त्याबद्दलचें प्रोफेसरांचें बोलणें मुद्दाम तिला कळविण्याची तत्परताही ते दाखवीत असत. त्यामुळें नीरेनेंही कसून अभ्यास केला होता. आणि तिला शेवटीं आपलें शरीर तापाच्या स्वाधीन करावें लागलें होतें. तो तापही पंधरा दिवसांचा मुदतीचा ठरला! मात्र परीक्षेच्या निकालाच्या वेळेस ती पुष्कळच बरी झाली होती. या तापानें तिला आणखी एक नवीनच अनुभव आला. तापाच्या मुदतीचें शेवटचे चार दिवस तिच्या वडिलांनीं रजाच घेतली होती, आणि नीरेच्या अंथरुणाजवळ ते एकसारखे बसून राहिले होते. ग्लानींतून अर्धवट जाग आल्यावर नीरा जेव्हां डोळे किलकिले करून पाही तेव्हां तिला आपले वडिल आपली शुश्रुषा करीत जवळ बसल्याचें आढळून येत असें. शेवटीं ताप निघाला आणि नीरेला थोडीशी हुशारी वाटूं लागली, त्यावेळीं आपल्या पत्नीला उद्देशून तिचे वडिल म्हणाले होते, " निघाला एकदांचा पोरीचा ताप! नाहीतर मला वाटलं होतं—" पुढें आपले वडील काय बोलतात हें ऐकण्याकरितां नीरा अगदीं उत्सुक झाली होती. पण त्यांचा कंठ रुद्ध झाला. पुढें कोणतेच शब्द उमटले नाहींत. त्यांच्या डोळयांतून खळकन् आंसवें निखळलीं आणि मोठ्या प्रेमभावानें त्यांनीं नीरेचें मस्तक आपल्या दोन्ही हातांनीं कुरवाळीत आपली स्निग्ध दृष्टी तिच्यावर रोखली आणि गद्गद स्वरांत तिला म्हटलें " पोरी, आतां नीट काळजीनं वाग हं! "

असल्या प्रकारच्या तुरळक प्रसंगांनीं तिला आपल्या वडिलांच्या अंतःकरणांतील एका नवीनच भागाची ओझरती ओळख पटत चालली होती. त्या ओळखीच्या आधारावर या पुढला जीविताचा मार्ग आपल्याला आक्रमणें अधिक सुखावह होणार असें तिला उगीचच्या उगीचच वाटूं लागलें होतें.

× × ×

असेंच एके दिवशीं कोर्टातून परतून घराच्या दारांत नीरेचे वडील पाऊल टाकीत होते. नीरा व्हरांड्यांत बाहेर जाण्याच्या तयारीनें उभी होती. तिला पाहून तिच्या वडिलांनीं तिला लांबूनच सांगितलें, "नीरे, आज बाहेर जाऊं नकोस. घरीं थांब जरा. काम आहे. आणि आंत गेलीस म्हणजे तुझ्या आईला माझ्याकडे पाठवून दे."

वडिलांची आज्ञा ऐकल्याबरोबर नीरेनें मुकाटयानें तोंड फिरवून आपल्या खोलीचा रस्ता धरला. आणि जातां जातांच वाटेंत तिनें आई-लाही निरोप कळविला. वडिलांच्या चर्येवरचें गांभीर्य पाहून, आज आप-ल्याला घरीं थांबायला सांगण्यांत त्यांचा काय हेतु असावा याचा तिला कांहींच कयास करता येईना. आपल्या खोलींत जाऊन काल नवीन आण-लेलें लायब्ररीचें पुस्तक तिनें वाचावयास घेतलें; आणि कॉटवरच्या मऊ गादीवर अंग टाकून ती पडली. कॉटसमोरच टांगलेल्या आरशांत तिच्या मुखाचें प्रतिबिंब पडलें होतें. त्याच्याकडे सहज पहात तिनें मनालाच प्रश्न केला, "कां बरं सांगितलं असावं बाबांनीं मला घरीं थांबायला?" आणि मिटलेलें पुस्तक हातांत धरून कितीवेळ तरी ती तशीच त्या प्रतिबिंबाकडे पहात राहिली. प्रकृतीची काळजी वाहून शक्तिवर्धक औषधें घेतल्यानें तिची कांती टवटवीत झाली होती. त्या प्रतिबिंबांतलि मुखाच्या कांतीचा तिचा तिलाच क्षणमात्र मोह पडल्याशिवाय राहिला नाहीं.

ती अशीच पडून राहिली असतांना तिची आई तिच्या खोलींत आली आणि येतां येतां तिनें विचारलें, "नीरे, काय करतेस ग?" आईचा शब्द ऐकल्याबरोबर ती जागयावरच उठून बसली, आणि तिनें उत्तर केलें, कांहीं नाहीं. मी बाहेर जायला निघालें होतें. बाबांनीं सांगि-

तलं घरांत बैस. मग काय करणार ? येऊन बसलें इथं. अन् आई, तुला कशाला ग बोलावलं होतं बाबांनी ? ”

“ तुझ्याबद्दचंच थोडं काम होतं बाळ. ”

“ माझ्याबद्दल ? ”

आणि हा प्रश्न विचारतांना तिच्या अंतःकरणाची विलक्षण वेगानें धडधड झाली. आपल्याला दूर पाठवून मुद्दाम आईला बोलवून सांगण्यासारखं कोणतें काम असावें याचा तिला कोणताच कयास करतां येईना. अनपेक्षित विचारांनीं तिच्या मनाची हुरहूर वाढल्याशिवाय मात्र राहिली नाहीं. ”

“मला खोलींत बोलावून नेऊन यांनीं काय सांगितलं, सांगू तुला ?”

नीरेनें फक्त उत्कंठित चर्येनें आईकडे पाहिलें.

नीरे, तूं बी. ए. झालीस. काय शिकायचं तें शिकलीस. शिकण्याविषयीं, पुस्तकांविषयीं अन् कपडयालत्त्यांबद्दल तुझी जी काय हौस होती, इच्छा होती, ती सारी पुरी पाडतांना कधीं माघार घेतली नाहीं. झालंच, गाणं बजावणं तुला आवडतं. त्यांतही पैसे खर्च करून तुझी आवड पुरी केली. इतकं सारं केलं तें तुझं पुढं नीट लागीं लागावं म्हणून केलं. तुला माहीत नाहीं, पण अलीकडे यांच्या जीवाला एकच ध्यास लागला आहे, अन् तो म्हणजे तुझ्या लग्नाचा !”

आईचें हें बोलणें ऐकून तिनें चमकून मनाला प्रश्न केले, ‘ बाबांना ? आणि माझ्या लग्नाचा ध्यास लागण्यासारखं काय आहे त्यांत ? माझं लग्न ही बाब अशी का आहे कीं तिचा बाबांच्या मनाला ध्यास लागावा ? आधीं ध्यास लागायचा तो मला कीं बाबांना ? मलाच जर ती गोष्ट अद्याप विचार करण्याइतकी महत्त्वाची वाटत नाहीं, तर ती बाबांना कां वाटावी ? आणि नंतर तिला वाटलें कीं हीच बोलण्याची वेळ आहे. आतांच आईजवळ सांगून टाकावें कीं माझ्या लग्नाचा विचार मी स्वतांच जेव्हां करायला लागेन तेव्हां तुम्हाला कळवीन !

पण मनांत काय वाटेल तें बोलण्याचें आलें तरी तोंडानें त्या विचारांचा उच्चार कसा व्हायचा ? आजपर्यंत जगांत बोललेल्या शब्दा-

पेक्षा न बोललेल्या शब्दांनींच अधिक अनर्थ केला आहे! न बोललेले शब्द! कांहीं शब्द गाळून तयार केलेल्या वाक्यांनीं कोडीं तयार होतात. जीवित, प्रत्येक मानवी जीवित, हें एक असेंच कोडें आहे. त्या कोडयातलें गाळलेले शब्द म्हणजे हे न बोललेलेच शब्द!

शेवटीं नीरेच्या तोंडून एक अक्षरही बाहेर पडलें नाहीं. आणि तिची आई बोलतच राहिली.

"उद्यां सकाळीं कायसं त्यांनीं बोलावून ठेवलं आहे. चहालाच यायचे आहेत ते बॅरिस्टर. मोठे चलाख दिसतात म्हणून सांगितलं यांनीं. तुझ्याशीं त्यांची ओळख करून द्यायचा विचार आहे."

"इतक्या आडपडद्यानं कशाला सांगतेस आई! मला पाह्यला येणार हेंच तुला सांगायचं आहे ना? आमचा खेडवळपणा कधीं संपायचा नाहीं हेंच खरं तर! मला पाह्यला येणार हें तुम्ही सांगतां! 'पाह्यला या' असं म्हणण्यापूर्वीं कांहीं मला विचारावं असं वाटलं नाहीं बाबांना. साऱ्या गोष्टी सायसंगीन ठरवायच्या आणि मग उगीचच दगडी देवाचा कौल मागतात तशी आमची संमति विचारण्याचा देखावा करायचा!"

नीरेच्या तोंडचें हें वाक्य पुरें होण्यापूर्वींच बाबांनीं खोलींत प्रवेश केला आणि म्हटलें, "संमति! तुझी संमति विचारायची? आणि मी विचारायची! चांगला न्याय आहे हा. या कामांत तुझा नकारहोकार इतक्या सोपस्कारांनीं पाहात बसलों तर साराच खेळखंडोबा होईल. आणि तुला काय वाटतं, मीं जें कांहीं ठरविलं असेल तें तुझ्या अकल्याणाचंच असेल नाहीं? तुझं कल्याण अकल्याण तुझ्यापेक्षांही मला जास्त समजतं! आजच्या पिढीचे हे चाळे मी पुष्कळ दिवस पाहून ठेवले आहेत. बापाच्या जिवावर सारी चैन करायची, मजा मारायची आणि पुन्हां स्वच्छंदीपणानें वागायचं! कोणत्याही गोष्टींत वडिलधाऱ्या माणसाचं ऐकायचं नाहीं हें तुम्हां कॉलेजांतल्या मुलामुलींचं ब्रीदवाक्य आहे. पण मी आजपर्यंत कधीं कुणाचं चालूं दिलं नाहीं. त्यांतून अर्ध्याकच्या अनुभवाच्या तुझ्यासारख्या मुलीचं या व्यवहाराच्या कामांत मी जर फार फार ऐकत बसलों तर

शेवटीं पश्चतापाची पाळी येईल ! तुझं कोणत्या बाबतींत ऐकायचं आणि कोणत्या नाहीं ऐकायचं हें मला समजत नाहीं कां ?

या प्रवेशानें आणि नंतरच्या बोलण्यानें त्या खोलींतील सारा देखावा पार पालटला. नीरा कॉटवरून खाली उतरून कॉटच्या उशालगत टेकून उभी राहिली होती. आणि तिची आई कॉटच्या पायथ्याशीं सरकून नीरेकडे पाठमोरी होऊन बसली. नीरेनें खालीं मान घातली. त्या घरांतला तिच्या आठवणींतला तो मतभेदाचा पहिला प्रसंग ! कांहीं महिन्यापूर्वीचे आपल्या अंथरुणाशीं बसून आपली शुश्रूषा करण्याची तत्परता बाळगणाऱ्या आणि आपला ताप उतरल्याच्या आनंदानें अश्रु ढाळणाऱ्या बाबांच्या तोंडूनच हे रागाचे शब्द बाहेर पडत होते, हा विरोध नीरेच्या मनांत चमकून गेल्याशिवाय राहिला नाहीं ! समोरच्या आरशांत तिला स्वतांचें आणि वडिलांचें अशीं दोन्ही प्रतिबिंबें दिसत होतीं !

पाल्हाळानें बोलण्याचा तिच्या वडिलांचा स्वभावच नव्हता. ते खोलींतून पुन्हां ताबडतोब निघून गेले.

रात्रीं नीरा आपल्या अंथरुणावर तळमळत पडली होती. शेवटीं एका अनोळखी माणसाशीं विवाहबद्ध होऊन चूलमूल करीत बसावयाचें हाच प्रकार आपल्याही संबंधांत घडणार अशा विचारानें तिच्या मनाची काहली होत होती. सूर्याच्या तापानें समुद्र कितीही तापला तरी त्याला ओहोटी ही असायचीच ! दुसऱ्या दिवशींचें सकाळचें दिव्य डोळ्यांपुढें नाचत असतांनाच तिला अर्धवट झोप लागली. अपरात्रीं ती जागी झाली, तेव्हां आपली आई आपल्या शेजारी बसली असल्याचें पाहून तिला आश्चर्याचा धक्का बसला ! खूप चोळून तिनें आपले डोळे उघडले आणि विचारलें, "कोण आहे ?" नीरेचें उचललेलें मस्तक चटकन आपल्या मांडीवर घेऊन तिचे केस कुरवाळीत आईनें म्हटलें, "बाळ शिकली सवरलीस खरी, पण समजत नाहीं तुला अजून कांहीं ! लग्नाशिवाय कधीं कुणाचं आयुष्य सुखाचं झालं आहे कां ! त्यांतून तूं मुलगी आहेस. सुखांत वाढलेली, दुसऱ्यावर आजपर्यंत अवलंबून राहात आलेली.

तुझं लग्न कसं होईल याची मला काळजी वाटत नाहीं. पण आपलाच हेका चालवीत राहिलीस तर तुझं कसं होईल असा राहून राहून मला प्रश्न पडतो."

'आई'! आईला हाक मारून बोलण्याकरितां नीरा सुरवात करणार तोंच तिच्या आईनें तिला म्हटलें, "हळू, अगदीं हळूं बोल." त्यावर अगदीं मंद आवाजांत तिनें आईला उत्तर केलें, "आई, मला समजत नाहीं का कीं तुम्ही सारं माझ्या चांगल्याकरिता करीत आहां तें! पण मला आवडी निवडी आहेत. मला मन आहे याचा विचार तुम्ही कुणीच करणार नाहीं कां ग!"

"तुझं मन मला समजत नाहीं कां? साऱ्याच गोष्टी मनासारख्या जुळत नसतात. कांहीं कांहीं वेळला जुळवून घ्यावं लागतं."

"आई, तुमच्यावेळचं एक वेगळं होतं. प्रवाहांतल्या काडीसारखं नवऱ्याच्या आयुष्याबरोबर वाहात जायचं हें त्यावेळीं साऱ्यांच्याच नशिबीं होतं. पण आतांही तसंच करायचं कां आम्हीं?"

"प्रवाहांत वाहात जाणाऱ्या काडया होऊं नका. कमलाप्रमाणें त्या प्रवाहांत एकाच जागीं मूळ धरून बसला तरी कमलासारख्या तेजस्वी कांतीनं त्या प्रवाहाला शोभा आणणं हें तुमचं कर्तव्य नाहीं कां?"

"पण कुठल्याही चिखलांत राहून जीवित कंठीत बसायचं हेंच त्या कमळाच्या नशिबीं असतं ना?"

"चिखलांत राहून जन्म जाणं किंवा स्वच्छ पाण्यांत राहून शोभिवंत होणं या गोष्टी केवळ योगायोगाच्या आहेत! दोष यायचाच झाला तर ज्यानं त्यानं तो आपल्या योगायोगाला द्यावा."

"योगायोग! योगायोगावर तरी माणसं सर्वस्वीं कुठं अवलंबून राहाताहेत? योगायोगावर मात करण्याकरितां तर माणसांचा सारा खटा-टोप चालला आहे. कोणतेंहि रोप आपसुख वाढूं द्यायचं नाहीं. जरा कुठं त्यानं मूळ धरलं कीं लागलीच त्याचं कलम करायचं, एका झाडावर दुसऱ्या झाडाचं डोळं बांधायचें! यांत कुठला नैसर्गिकपणा टिकून राहातो? तसंच आमचं आहे. मुलगे आणि मुली शिकून जरा कुठं

विचार करूं लागणार, तेंच त्यांना लग्नाच्या पाशांत अडकवून टाकण्याची तुम्हाला घाई होते. योगायोगावर सारं अवलंबून ठेवलं असतं तरी तें एकपरीं बरं झालं असतं. जगांत आज जे जबरीचे आणि जुलमाचे रामराम करायला लावणारे 'राक्षसविवाह, चालू आहेत ते बंद पडले असते. गांधर्वविवाहांनीं कितीतरी प्रणयी स्त्रीपुरुष जन्माचे सुखी झाले असते!"

"शाळेंत नि कॉलेजांत जाऊन चार कथाकादंबऱ्या वाचून तूं हें बोलते आहेस नीरे! जगांतल्या व्यवहारांत 'शाकुंतल' नाटकाचे खेळ होतात! हरघडी होतात. पण ते सात अंकी नसतात. पांच अंकांचेच असतात! नाटकांतले गांधर्व विवाह पांचव्या अंकानंतर सारें दुःख मागें टाकून सुखी होण्याच्या मार्गाला लागतात. कारण हैराण झालेल्या शाकुंतलेला उचलून घेऊन जाण्याकरतां मेनकेची अतिमानुष शक्ति मदतीला धावून येते. जगांत अतिमानुष शक्ति आहे, पण ती वाचविण्याकरितां नाहीं, मारण्याकरितां आहे."

आईच्या बोलण्याचें नीरेला अतिशय आश्चर्य वाटलें. तिला वाटलें किती स्पष्ट आणि अनुभवाचा व्यवहार सांगते आहे आई! आणि आई कांहीं प्रवाहाबरोबर वाहात जाणारी कांहीं दिसत नाहीं एकूण! आसपास केवढेही खळबळाट करीत जोरजोरानें वाहणारे प्रवाह असले तरी बाराही महिने एकाच जागीं राहाणाऱ्या खोल डोहासारखी आपली आई आहे. तिला बाबांच्या प्रवाहाबरोबर वाहात जातां आलें नाहीं. स्वतःलाही हालचाल करतां आली नाहीं!

दोघींच्या बराच वेळ चाललेल्या बोलण्यांतून एकसारखे मतभेदाचेच स्फुलिंग उडत होते, तरी नीरेला त्या साऱ्या बोलण्यानंतर मन मोकळे झाल्यासारखें वाटलें. आई उठून गेल्यानंतर अगदीं शांतपणानें ती अंथरुणावर पडली होती. पायथ्याशीं असलेल्या खिडकींतून दिसणाऱ्या चंद्रबिंबाकडे ती टक लावून पाहात होती. तिच्या दृष्टीपुढें असलेल्या आकाशाच्या पट्ट्यांत कितीतरी ढग चंद्राच्या प्रकाशानें रुपेरी झाले होते. तो

देखावा पाहून तिच्या मनांत आलें, 'हें माझ्याच कल्पनेचं प्रतिबिंब आहे कां? माझ्या जीविताच्या स्वच्छ आकाशांत उसळणारे हे ढग रुपेरीच होणार आहेत कां? केव्हां होणार? उद्यां?'

* * *

त्या घरांत, कोणताही ठरलेला कार्यक्रम पुरा झालाच पाहिजे, असा जणूं कांहीं कायदा होता. आणि त्या कायद्याप्रमाणें दुसऱ्या दिवशीं सकाळीं ठरलेला कार्यक्रम अगदीं यांत्रिक पद्धतीनें पार पडला. ओळख करून देण्याची तऱ्हा इंग्रजी धर्तीची होती. बॅरिस्टर विजय यांनीं, बाबासाहेब नीरे-ची ओळख करून देत असतांना म्हटलें, "Glad to see you!" नीरेनें मात्र कांहींच उच्चार केला नाहीं. कदाचित् चालू कार्यक्रमाच्या संभ्रमानें तिनें असें केलें असावें असें वाटून बॅ.विजयनीं तिच्या शिष्टाचारभं-गाची उपेक्षा केली! बोलण्याचा विषय इंग्लंडमधील शिक्षणपद्धति हाच होता. बॅ. विजय पुष्कळसे इंग्रजींतून बोलले. मधुनमधूनच ते मराठी बोलले ते मिशनरी थाटांत!

× × ×

त्या सबंध दिवसभर आणि दुसऱ्याहि दिवशीं त्या घरांतलें वातावरण अगदीं स्तब्ध होतें. अष्टौप्रहर खडखडाट करणाऱ्या एकाद्या कारखान्यां-तील मुख्य यंत्राचें मळसूत्र एकदम बंद पडून सारें वातावरण बधिर आणि स्तब्ध होऊन जावें, तसें त्या घरांतील साऱ्याच माणसांचें झालें होतें. एकमेकाशीं कांहीं बोलणीं-चालणीं झालीं नाहींत असें नाहीं. पण पट्टयांनीं फिरणारीं चाकें बंद झालीं असतांना नुसते हाताचे धक्के देऊन यांच्यांत गति उत्पन्न करण्याचा प्रयत्न करावा, तशीं तीं बोलणीं चालणीं होतीं! आणि कुठली तरी कळ अनपेक्षितपणें दाबली जाऊन साऱ्या चाकांचा प्रचंड खडखडाट क्षणार्धांत सुरू व्हावा तसा प्रकार तिसऱ्या दिवशीं अकस्मात घडला.

× × ×

तिसऱ्या दिवशीं संध्याकाळीं बाबासाहेब कोर्टांतून परत आले, ते कांहींशा संतापानेंच ! त्यांच्या हालचालीवरून त्यांचा हा संताप व्यक्त होत होता. चहा घेण्याच्या वेळेला त्यांनीं पत्नीला विचारलें, " नीरा कुठं आहे ? " त्यावर तिनें उत्तर केलें, " बसली असेल वर कांहीं वाचीत. मघाशींच तिचा चहा झालाय्, म्हणून तिला नाहीं हाक मारली मी. "

' मुलीनं अगदीं कमाल केली हं. त्या बॅ. विजयना हिनं पत्र पाठविलं ! '

' म्हणजे ? '

' म्हणजे काय ? अगदींच शेफारून गेलेली आहे कारटी. '

' पण त्या पत्रानं असं केलं काय ? '

' काय व्हायचं आहे ? तुमचीं माझीं मतं जुळतील असं मला वाटत नाहीं आणि आपल्या लग्नानं कुणालाच सुख लागायचं नाहीं, असं तिनं त्यांना साफ कळविलें आहे. आज मला कोर्टांत त्यांनीं हें सांगितलं. त्यांनीं माझी काय किंमत केली असेल पहा. '

' त्यांना देखील वाईट वाटलं असेल. '

' त्याला वाईट वाटण्याचं असूं दे एक. त्याचं काय, ही नाहीं तर त्याला दुसऱ्या दहा मुली सांगून येतील. पण माझ्या इभ्रतीला नि प्रतिष्ठेला केवढा धक्का बसला हा ! कल्पना नाहीं करतां यायची कुणाला. तिनं मलाच जर सारं तोंडीं सांगितलं असतं तर काम झालं नसतं कां ? '

पण तिला धाडस झालं नसेल आपल्याशीं बोलण्याचं ! '

' माझ्याशीं बोलायचं तर त्याला धाडस कशाला करायला हवं ? मी तिचा प्रत्यक्ष जन्मदाता बाप ! तिच्या सुखाकरितां आजपर्यंत काय वाटेल तो खर्च केला. काय अडचण होती तिला माझ्याशीं बोलायची ? '

' ही गोष्ट फार नाजुक असते. बोलवत नाहीं तीं ! आणि त्यांतून—'

' त्यांतून काय ? '

‘ मी तरी या बाबतींत स्पष्ट कशी बोलूं ? ’

‘ तूं सुद्धां माझ्याशीं मनमोकळेपणानं वागत नाहींस ? ’

‘ कसं वागायचं ? प्रत्येक गोष्ट यंत्रासारखी शिस्तीत बसावयची. माणसाचं सारं चांगलं करण्याचा प्रयत्न करायचा. आपण आजपर्यंत किती खस्ता खाल्ल्या आमच्यासाठीं. समजत नाहीं कां आम्हांला हें ! पण दुसऱ्याचं मन आपल्या निर्भेळ प्रेमाच्या जिव्हाळ्यानं सुखवायचं हा त्यांत हेतु दिसत नाहीं. आपलं घर म्हणजे इस्पितळासारखं आहे. त्यांत अगदी पहिल्या दर्जाची शुश्रूषा आणि उत्तम प्रकारची औषधं मिळायचीं ! पण त्या साऱ्या प्रकारांत मनाला बांधून टाकणारं असं कांहीं नसतं ! मला सांगतां येत नाहीं तें काय असतं तें ! पण कांहीं तरी असतं हें मात्र खरं. घरांतल्या साऱ्या माणसांना बाकी सारी सुखं मिळत असतांना या कांहींतरीची तहान लागलेली असते, आणि तीच गोष्ट नेमकी मिळत नाहीं ! उन्हानं काहिली होत असतांना साध्या मडक्यातलं थंडगार पाणी जितकं समाधान देतं, तितकं बाजारांतलीं बर्फ घातलेलीं गोड पेयं कांहीं देत नाहींत ! मी आजपर्यंत कधीं बोललें नाहीं. म्हटलं आपल्याला राग येईल. पण प्रसंग आला म्हणून सांगतें; आजपर्यंत आपण आमच्यापुढं या अमृतासारख्या गोड पेयांचें पाट वाहविले आहेत. पण साध्या पाण्याची तहान मात्र कधीं भागविली नाहींत. आंत वस्ती नसलेल्या अतिशय सुंदर इमारतीसारखं आपलं मन आहे ! ’

अर्धवट् पिऊन झालेला चहाचा कप खालीं ठेवीत उद्वेगाच्या मंद स्वरांत बाबासाहेबांनीं म्हटलें, ‘ आजपर्यंत कसं समजलं नाहीं मला हें ! तूं कसं सांगितलं नाहींस ? ’

‘ वस्ती नसलेल्या सुंदर इमारतीचा मोहही बाळगायला शिकले मी ! मला रोजच्या व्यवहारांत अभ्यास घडत गेला. अन् मग माझा त्रास आपोआपच कमी होत गेला. जनावराच्या मानेवर पहिल्यांदाच जूं ठेवलं म्हणजे मान रक्तबंबाळ होते. पण पुढें सरावानें त्या ठिकाणची स्पर्शाची जाणीवही नाहींशी होते. तसं झालं माझं. पण मुलीचं तसं आहे कां ? तिला—’

आणि बोलतां बोलतां तिच्या डोळ्यांत टचकन् पाणी आलें. तिनें डोळ्यांना पदर लावला !

' पण आतां कसं बदलणार हें सारं ? ' असें म्हणत म्हणत बाबा-साहेब तेथून उठून आपल्या खोलींत निघून गेले.

× × ×

मात्र ' नीरा आपल्या खोलींत वाचीत वसली असेल ' हा तिच्या आईचा कयास अगदीं खोटा होता ! बॅ. विजयना आपण पाठविलेल्या पत्राची हकिकत बाबांना कोर्टांत कळणार अशी तिची नक्कीच अपेक्षा होती. म्हणून बावा बैठकीच्या खोलींतून बाहेर पडून माजघरांत चहा घेण्याक-रितां गेल्याचें पाहून ती जिन्याच्या तोंडाशीं येऊन उभी राहिली होती. दोघांच्या मधला सारा संवाद तिनें लक्ष लावून ऐकला होता !

× + ×

आणि दुसऱ्याच दिवशीं सकाळी पोष्टमननें शिरीषकुमारांचें नीरेच्या नांवाचें पत्र टाकल्याचें निमित्त होऊन या साऱ्या स्तब्धतेचा जोराचा भंग झाला. वास्तविक आजपर्यंत नीरेच्या नांवानें आलेलीं कोण-तींच पत्रें तिच्या वडिलांनीं फोडलीं नव्हतीं. पण आज त्यांना मागच्या साऱ्या पार्श्वभूमिमुळें हें पत्र फोडून पाहाण्याची इच्छा झाली. तें पत्र त्यानीं कोणत्या अपेक्षेनें आणि कोणत्या हेतूनें फोडलें होतें तें त्यांचें त्यांनीं कधींच सांगितलें नाहीं.

तें उघडलेलें पत्र हातांत घेऊन घरांत येत येत त्यांनीं नीरेला हांक मारली आणि ती समोर आल्याबरोबर तिला विचारलें,

' यांत लिहिलेले हे सारे विचार तुझ्या डोक्यांत भरविण्याचं काम त्या मूर्खानं इतके दिवस केलेलं दिसतंय ! आणि असल्या विचारांनीं डोकं भडकून देऊन तूं कालचा माझ्या प्रतिष्ठेवर चिखल फासण्याचा प्रकार केलास हं ?'

' कालच्या प्रकाराचा नि या पत्राचा काय संबंध आहे ?' दुरूनच परिचयाचें अक्षर ओळखीत नीरेनें उत्तर केलें.

‘ काय संबंध आहे ? असलेच विचार वरचेवर वाचून ’नि ऐकून [illegible]ख्या अर्ध्याकच्च्या मुलांमुलींचीं माथीं भडकतात. बरं झालं. कालपासून मी या साऱ्या प्रकाराचं कारण शोधीत होतों. हें तें कारण ! तरी बरं, त्याला आपल्या जवळच्या जागेतून मी काढून टाकला होता. शेवटीं तुला वरचेवर पत्रें पाठवून त्याला स्वतांला नशा आणणारें विष त्यानं तुझ्या डोक्यांत भिनविलें. माझं काय जाणार आहे. पण सांगून ठेवतों. हें विष तुलाच जाळून टाकील. वेळेलाच सावध हो. ’

नीरेच्या अंतर्मनांतील सुप्तस्थितींत असलेल्या बंडखोर वृत्तीनं एक-दम उसळी घेतली. तिनेंही संतापानें म्हटलें, ‘ वाटेल तो मनाचा कोंडमारा करण्यापेक्षां हें विष मारक झालं तरी चालेल मला ! आणि या घरांत तर यापुढें विषापेक्षांही कितीतरी दाहक गोष्टी माझ्याभोंवतीं एकसारख्या जळत राहाणार. हें आजचंच पहा. सारा शिष्टाचार गुंडाळून ठेवून तुम्ही मला आलेलं पत्र फोडलंत ! ’

‘ तूं कितीसा शिष्टाचार पाळलास. त्या अनोळखी माणसाला, तूं काल माझ्याशीं प्रतारणा करून पत्र धाडलंस. त्यानं माझ्या तोंडांत फक्त शेणच घालण्याचं बाकी ठेवलं. ’

‘ मग मी काय त्या शेणाच्या गोवऱ्या जन्मभर थापीत राहून त्या बरबटलेल्या हातानीं माझं तोंड माखून घ्यावें असं तुमचं म्हणणं. तुम्ही आपल्याच कर्तबगारीच्या कैफांत व प्रतिष्ठेच्या तोऱ्यांत एक गोष्ट विसरतां. आपली मुलं जन्मभर लहान राहात नाहींत; तीं कधींतरी मोठीं होतात हें विसरल्यामुळं हा सारा तमाशा झाला. मी दुसरं काय करायचं होतं. माझं लग्न म्हणजे तुमच्या प्रतिष्ठेच्या शृंगाराचा एक भाग समजलां तुम्ही. आणि माझ्या मनाला.........’

एवढया बोलण्यानेही नीरेला आपल्या संतापाला आवर घालतां आला नाहीं. तिचें सारे शरीर थरथर कांपत होतें, डोळ्यांत आसवें तरारत होतीं. शेजारच्या बैठकीवर ती मटकन् खालीं बसली !

‘ तें कांहीं नाहीं. असलीं पत्रें तुला पुन्हां येतां कामा नयेत.

बॅरिस्टर विजयांचं मन कांहीं झालं तरी मी वळविणार आहें. माझ्या शब्दाला मी आजपर्यंत मागितली ती किंमत मिळत गेली आहे, बॅ. विजय माझं खास ऐकतील. आणि तुलाही हे स्वैरपणाचे बाकीचे प्रकार बंद केले पाहिजेत. भिंतीना कान असतात तसेच वाऱ्याला डोळें असतात. कोणत्यावेळीं तो कोणती चहाडी करील आणि त्या क्षुल्लक चहाडींतून काय कल्पान्त उसळेल याचा नियम नसतो, निष्कारण हटवादीपणा करूं नकोस. थोडया शहाणपणानं वाग. '

' नको. तुम्ही कशाला हवं आहे त्यांचं मन बळवायला ! मीच त्यांच्याकडे जाणार आहें. मी त्यांना माझं म्हणणं स्पष्टपणें कळवीन. त्यांना हृदय, अंतःकरण कांहीं असेल तर त्यांनाच विचारीन कीं तुमच्याशीं मनानं एकाग्र न होणारी स्त्री तुम्ही पत्नी म्हणून कशी स्वकारतां तें सांगा. '

' मूर्ख, मूर्ख आहेस तूं. माणसाचा जिवंतपणा हृदयाच्या ठोक्यावर अवलंबून असला तरी समाजाचं जीवन पैशाच्या आवाजावर अवलंबून असतं हें विसरूं नकोस. या घरांतून बाहेर पडून आपल्या पायांनीं चार आठ पावलं चालण्याचा प्रयत्न करून पहा, म्हणजे समजेल तुला तुझ्या हृदयाची काय अवस्था होते ती ! तुझा मगदूर तुलाच कळत नाहीं. या घराच्या बाहेर पडण्याचा प्रसंग आला तर त्या हृदयाचा चुराडा होऊन जाईल. सुखासीनपणाची संवय लागलेली आहे तुला ! बाहेरच्या जगांत स्वतंत्रपणानें तुला एक पाऊलही टाकतां यायचं नाहीं. '

' शरीराचे क्लेश एकवेळ पतकरले. पण मनाचे क्लेश....'

' काय सारखं त्या मनाचं एवढं चालवलं आहेस ? काय केलं मी तुझ्या मनाला ? तुझ्या मनाला सुख मिळावें म्हणून मी प्राण पाखडतों आहे आणि तूं....'

' पण माझ्या मनाला......'

' चूप नीरे. या घरांत राह्यचं म्हणजे माझं ऐकलं पाहिजे. मी इतर बापांसारखा पड घेणारा नाहीं. तूं शहाणी झालीस, नवीन विचार पैदा केलेस, आणि तूं आयती....'

‘ बाबा !....’

पण पुढले शब्द नीरेला बोलवले नाहींत. तिला हुंदका आला. त्या हुंदक्यांतच तिचे सारे शब्द विरून गेले. तिच्या अंगावर पत्राचे कागद रागारागानें फेकून देऊन बाबासाहेब तिथून निघून गेले.

× × ×

त्या दिवशीं दुपारीं प्रत्येकजणानें पानावर बसण्याचें नाटक केलें. बाबासाहेब कोर्टांत निघून गेले.

दुपारीं ती आपल्या खोलींत व्याकुळ अन्तःकरणानें पडली असतां तिची आई तिच्याजवळ गेली. तिच्यापुढें दुधाचा कप ठेवीत आईनें म्हटलें, “ त्या परवांच्या आजारानें तूं तामसी झाली आहेस फार. असं काय करतेस वेडयासारखं. हें दूध घे. ”

आईच्या मांडीवर दुःखावेगानें आपलें अश्रूंनीं डबडबलेलें तोंड टेकीत नीरेनें जोराचा हुंदका दिला !

“ आई, तूं म्हणालीस तें खरं आहे. वृत्ती नसलेल्या सुंदर इमारतीसारखं मन आहे बाबांचं ! तुझ्या बोलण्याचा अर्थ मला आतां कळला ! जास्तीत जास्त किंमत यावी म्हणून, कीर्ति मिळावी म्हणून, अहोरात्र देहदंड सोसून चित्र तयार करीत राहाणारे व्यापारी कारागीर आहेत बाबा. अन् मी त्या चित्रासारखी ! कशाला राह्यचं इथं ? ”

“ हं. असलं भलतंसलतं कांहीं बोलूं नकोस. ”

“ पाहाशील तूं आई. ”

× × ×

“ आज रात्रीं मी मुंबईस जात आहे. फार विचार केला मी. पण मला इथं राहाणं कांहीं दिवस तरी अशक्य आहे असं वाटल्यावरून मी चाललें आहे. स्वतंत्र रीतीनं, माझीं मी, असं मला राहातां आलं तर कर्तबगार बापाच्या पोटीं जन्म घेतल्याचं खरं सार्थक होईल असंच मला वाटतं. पांगुळगाडा टाकून देऊन स्वतःच्या पायावर केव्हांतरी उभं राहिलं

पाहिजे हा धडा आज मी शिकलें. दुसऱ्याचा पैसा हा एक सामाजिक पांगुळगाडा आहे! त्याला धरून चालण्याची एकदां संवय लागली म्हणजे त्याला कायमचे हातपाय चिकटून बसावेत अशी कांहींतरी त्यांत जादु असल्याचा मला भास होतो. हे चिकटणारे हातपाय जोरानें ओढून काढले पाहिजेत. ते तसे ओढून काढतांना फार मोठी इजा होईल. हो. खरं आहे, पण त्या इजेचे वण व्यक्तिस्वातंत्र्य कमावतांना केलेल्या प्रचंड युद्धाचे स्मारक ठरतील......"

× × ×

हें पत्र मागें ठेवून नीरा खरोखरच अनपेक्षितपणें घराबाहेर पडली! तिच्या दुपारच्या बोलण्यांत "पाहाशील तूं आई," हे शब्द आले होते, त्याचा अर्थ त्या बिचाऱ्या आईला मागाहून कळला. तिची परवानगी घेऊन बाहेर पडणें नीरेला शक्य नव्हतें. तिला नकळतच तिनें सारी तयारी केली आणि तिला नकळतच घराच्याबाहेर पाऊल ठेवलें!

———

# प्रकरण दहावें

—oo—

## सामाजिक बटाटेवडा !

घर सोडण्यापूर्वी घडलेला सारा प्रकार शिरीषकुमारांना सांगतांना नीरेच्या डोळयापुढें त्यांतील सारीं दृश्यें मूर्तिमंत उभीं राहिलीं. प्रसंगाचा ताजेपणा अजून ओसरला नसल्यामुळें बऱ्या झालेल्या जखमेलाही कांहीं नाजुकपणा राहावा तसें तिच्या मनाचें झालें होतें. त्या प्रसंगांतील मुख्य मुख्य गोष्टी सांगतांना तिला त्यांच्या विरोधानें कांहीं मागल्याही गोष्टींचें नि प्रसंगांचें स्मरण झालें. त्यांचा उल्लेख न करतां कथन संपविणें तिला शक्य झालें नाहीं.

आपण पाठविलेलें पत्र वस्तुत: पूर्वी पाठविलेल्या अनेक पत्रांसारखेंच होतें. त्यांत वेगळें असें कांहीं नव्हतें. तरीही त्यामुळें नीरेला घराबाहेर पडण्याचा प्रसंग कां यावा याचें शिरीषकुमाराला मोठें कोडें पडल होतें. पण तें पत्र ज्या परिस्थितींत नीरेच्या घरांत गेलें ती परिस्थिति त्या पत्राचा सुलभतेनें स्वीकार होण्याला फार प्रतिकूल होती हें त्याच्या मनाला पटल्यावांचून राहिलें नाहीं. चंद्राचें प्रतिबिंब स्वच्छ पुष्करणींत पडलें तर अधिक शोभिवंत दिसतें. पण तेंच प्रतिबिंब शेवाळयानें आच्छादलेल्या जलाशयांत पडलें तर छिन्नविच्छिन्न होतें आणि भेसूर दिसतें !

शेवटीं सारें बोलून झाल्यावर शिरिषकुमारांनीं नीरेला म्हटलें, "दाखव तरी तें पत्र मला एकदां. माझं मलाच पुन्हां वाचून पाहू दे. वातावरणांत सहज एकादा खडा भिरकावून द्यावा नि त्याचें एक जंगी अस्त्र बनावं तसं झालेलं दिसतेय् त्या पत्राचं."

"पण अस्त्र फेंकणाराला तें आवरून घेण्याचीही कला माहिती असावी लागते !"

" कांहीं अस्त्रं अशीं असतात कीं, मारण्याऐवजीं तीं संजीवक ठरतात. अजाच्या इंदुमतीला फुलांनीं मृत्यु आला. त्याच्या उलट अशा अस्त्रांनीं नवचैतन्य येतं. आणि तसंच झालेलं दिसतेयू. मोठ्या माणसाचा हात धरून जत्रा पाहात हिंडणाऱ्या लहान मुलासारखी तूं इतके दिवस जगांत वावरत होतीस !"

" आणि आवडत्या खेळण्याचा शोध करीत होतें असंच ना !"

" पण तें आवडतं खेळणं त्या जत्रेंत नव्हतें. जत्रेच्या बाहेर होतें. !"

" म्हणजे ?"

मन गुंतवून टाकतील असे प्रकार त्या जत्रेच्या बाहेरच जास्त आहेत एवढंच माझं म्हणणं !"

" एका जत्रेंतून दुसरींत जायचं एवढाच काय तो फरक !"

" नाहीं. एवढाच फरक कसा असेल ? प्रत्येक जत्रेचं दैवत वेगळं असतं. त्या दैवताच्या नांवानं उत्सव साजरा होत असतो. कांहीं दैवतं प्रसन्न होऊन सुख देतात. कांहीं दैवतं कोपून दुःखांच्या राशी ओततात. तुझ्या या नव्या जत्रेंतलं दैवत फार उग्र आहे. लक्षांत ठेव हं. बरं पण पाहू दे तर खरं तें पत्र."

आणि मग नीरेनें तें पत्र शिरीषकुमाराच्या हातीं दिलें.

"—मागें तुला तूं बी. ए. झालीस म्हणून अभिनंदनाचं पत्र पाठविलं होतं. त्यानंतर सविस्तर पत्र पाठवीन म्हणून म्हणत असूनही हातून कांहीं आजपर्यंत लिहून झालं नाहीं. रोज कांहीं ना कांहीं उद्योग किंवा ज्याला तुझे वडील वायफळ चळवळी म्हणतात त्या चालू आहेत. गेलीं दोन वर्षें तर माझी तऱ्हा मोठी मजेदार झाली आहे. मला पोटाकरितां शिकवण्या करण्याकरितां जावं लागतं श्रीमंत गुजराथी शेटसावकारांकडे ! असल्या 'गुजराथी' शिकवण्यांनीं पैसे मात्र छान मिळतात हं. भाषाशास्त्राचा विशेष अभ्यास करण्याच्या हेतूनें मी मागें बहुतेक प्रांतिक भाषा शिकलें; त्यांचा मला हल्लीं फार उपयोग होतो. विशेषतः

गुजराथी आणि हिंदी या दोन भाषांनीं माझं फार चांगलं काम झालं आहे. अलीकडं तर सरावानं मी या भाषा फारच चांगल्या बोलतों. परवांच त्या शिवलालची ( एक गिरणीमालक ! ) मुलगी हंसा मला गंमतीनं म्हणाली सुद्धां कीं, " मास्तर तुम्ही गुजराथी पोशाख कां नाहीं करीत ? " त्यावर मी तिला चेष्टेनं उत्तर दिलें, " सकाळीं गुजराथी, दुपारीं हिंदी, संध्याकाळीं बंगाली आणि रात्रीं ॲंग्लोइंडियन अशा निरनिराळ्या जातीच्या लोकांच्या मी शिकवण्या करतों. प्रत्येक खेपेला मला पेहराव बदलीत राहवं लागेल. " मात्र चेष्टेकरितां म्हणून हें उत्तर दिलं हं मी. नाहींतर तुला वाटायचं कीं मी एक बडा पैसेवाला शेट बनत चाललों आहे. तसलं कांहीं नाहीं हं. पैशाची तोंडमिळवणी करतां करतां माझी कशी तारांबळ उडते हें कुणालाही सांगून समजायचं नाहीं. बिचारी माई ! तिला माझ्या हातून कधीं सुख मिळेलसं दिसत नाहीं. किती दुर्दैवी बिचारी ! माझ्यासारख्याची आई होऊन सारा जन्म काबाडकष्टांत आणि हालांत घालविण्यापेक्षां तिला एकाद्या सुखवस्तु घरांत जन्म काढण्याचा योग आला असता तर किती बरें झालें असतें, असें मला अलीकडे राहून राहून वाटतें. पण आमची माई अगदीं कुंतीसारखी आहे. बिचारीनं जणूं कांहीं आपल्याला सदैव दुःख असावं असं मागणंच मागितलेलं दिसतेय्. आणि तें मागणं माझ्यासारख्या मुलाच्या सान्निध्यांत फळाला आलं असावं ! माझ्या पैशाच्या ओढगस्त स्थितींत, मला सुखाचा घास भरविण्याकरितां जिवाचं रान करतांना तिला पाहिलं, म्हणजे माझं मन कालवल्यावांचून राहात नाहीं. पण मी गरिबींत जन्माला आलों एवढंच काय तें एक पाप केलं आहे. तें पाप निस्तरण्याचा मी कितीही प्रयत्न केला तरी तें निस्तरलं जाणार नाहीं, अशी माझी दिवसेंदिवस खात्री पटत चालली आहे. आणि म्हणूनच या असल्या वैतागांत विरंगुळा म्हणून मी माझ्यासारख्याच दरिद्री लोकांशी समरस होण्याचा प्रयत्य केला. त्यांच्यावर उपकार करण्याच्या निमित्तानं मी त्यांच्याकडे गेलों नाहीं. त्यांच्याकरितां कांहीं चारदोन गोष्टी करण्याकरितां झटतांना मोठा स्वार्थ-

त्याग केल्याचा रुबाब करण्याचं मला कधीं कारण पडलं नाहीं. कारण मी त्याग कशाचा करणार? दरिद्री मजुरांच्या संबंधानं बोलतांना आपण 'मजूर' आणि 'मालक' असे शब्द उच्चारतों. पण मालक कुणाला नाहीं? आजची परिस्थिति हीच मुळीं साऱ्यांची मालक आहे. आणि आपण सारे त्या मालकाचे मजूर आहों! आणि माझ्या उदाहरणावरून तर मला असंही म्हणतां येईल कीं आजचे बी. ए. एम्. ए. झालेले माझ्यासारखे लोक धनिकांच्या घरच्या शिकवण्या मिळाव्यात म्हणून अधाशीपणानें वाट पहात असतात. आणि याच धनिकांनीं चालविलेल्या कारखान्यांतून शेंकडों मजूर राबत असतात. हेंच पहा ना. या शिवलालच्या दोन गिरण्या असून एक बादल्या आणि घमेलीं करण्याचा कारखाना आहे मुंबईत. त्यांतून काम करणाऱ्या मजुरांना आपल्या स्वतःच्या न्याय्य हक्कांची ओळख पटावी म्हणून खटपट करणारा माझ्यासारखा त्यांचा मित्र त्यांच्याच मालकांच्या घरीं वेगळ्या प्रकारची मजुरी करीत असतों. हे गुजराथी लोक मोठे जागरूक असतात हं आमचे शिकवण्यांचे दिवस मोजण्यांत! एकाद्या दिवसाचाही खाडा झाला कीं ताबडतोब पैसे काटायला कमी करीत नाहींत. मजुरांच्याकरितां भांडतांना मला एक आंतून सूक्ष्म जाणिव असते कीं आपण आपल्याही हक्कांकरितां भांडत आहों. नकळत कां होईना पण Substitution केल्याशिवाय माणसाला तन्मयतेनें कार्य करतांच येत नाहीं. मुद्दामच हा शब्द वापरला आहे मी. कारण फिलॉसफी घेऊन तूं बी. ए. झाली आहेस. आतां तुला बरोबर सांगतां येईल माझ्या साऱ्या चळवळींचं मर्म! दिवसेंदिवस माझं मन या खालच्या वर्गाकडं एकसारखं ओढ घेतं आहे. तुझ्या आवडीचा बटाटेवडा माई करते, त्याचा या संबंधांत दाखला घेण्याचा मला नेहमीं मोह होतो. त्या वड्यांत वरच्या आणि खालच्या अशा दोन वाटोळ्या चकत्यांत भरण असतं. खातांना वरची चकती सबंध वड्यांतून सोडवून घेतली तर ती अलग होऊं शकते. आपल्या समाजांतले तीन वर्ग अगदीं या वड्यासारखे आहेत. वरची चकती म्हणजे धनिक वर्ग, मधलें भरण

म्हणजे बुद्धिजीवि गरीब वर्ग, आणि खालची चकती म्हणजे मजूर कामकरी यांचा वर्ग! वरची चकती अलग होते. पण भरण चिकटतें तें खालच्या चकतीला! उकळत्या तेलांत वडा जितका जितका अधिक तळावा तितका तितका या भरणाचा आणि खालच्या चकतीचा एकजीव होतो. समाजांतही असंच होतं. जितका जितका आर्थिक विषमतेचा दाह जास्त होतो तितका तितका बुद्धिजीवि वर्ग मजुरांशीं समरस होत जातो.

पण हें सारं लिहिल्यानंतर मला हें मी पत्रांत उगीचच लिहिलं असं वाटून हसूं येतं. तुझ्यासारख्या एका बडया सब-जज्जाच्या मुलीला या सामाजिक बटाटेवडयाची चव कळायची नाहीं. माझ्यासारख्या हजारो लोकांचं जें भरण आहे त्यापासून तूं नेहमीं अलगच राहाणार? खरंच नीरे! मी तुला एकदां विचारणारच आहें. तूं बी. ए. झालीस. तत्त्वज्ञान शिकलीस. त्या साऱ्याचा समाजाला कोणता उपयोग करून देणार? मला तर अशी भीति वाटते कीं, असें एकादें माझें पत्र तुझ्या हातीं पडण्याच्या बेताला तुझ्या भोंवतीं उत्कृष्ट सोनेरी छपाईच्या जाड कार्डाच्या राशी पडल्या असतील आणि त्यावर इंग्रजी मजकुरांत तुझ्या वडिलांच्या नांवानें लिहिलें असेल कीं, Mr. N. V. Joag, At Home इत्यादि. आपल्या या विवाहाच्या निमंत्रणपत्रिका पाठविण्याच्या गडबडींत माझ्यासारख्याचं हें असलं रुक्ष पत्र वाचायला तरी फुरसत होईल कां तुला?

आणि तूं जर असा विवाहच करणार असशील तर मागें एकदां कॉलेजांत मीं जें भाषण केलें होतें त्यावर तुम्ही मैत्रिणी आक्षेप घेऊन माझ्याशीं कडकडून भांडलां त्या भांडणाचा उद्रेक खोटा होता असंच म्हणायचं कां? भोंडल्यांच्या गाण्यांतून वर्णन केलेलीं स्त्रियांचीं संसार-विषयक कल्पनाच का आमच्या स्त्रियांच्या जीवनाचं मर्मभेदक प्रतीक होऊन राहाणार? माहेरीं असतांना कोणता उद्योग करायचा? तर—
" आतां माझा दादा येईल ग, दादाच्या मांडीवर बसेन ग, वहिनीच्या

चहाड्या सांगेन ग " इत्यादि गोष्टी गिरवण्याचा ! आणि सासरीं गेल्यावर ' भोज्येषु माता ' आणि ' शयनेषु रंभा ' ! आणि शयनांतल्या या क्षणिक रंभा शापित अप्सरांप्रमाणें बाकीचा सारा वेळ शिळा होऊन पडतात ! असल्याच जीवनक्रमाची तूं मार्गप्रतीक्षा करीत बसली आहेस कां ? आईबापांच्या वात्सल्याच्या पांघरुणांत तूं आज गुरगटून निजली आहेस. आणि पुढें पतीबद्दलच्या प्रणयाच्या उन्मादक कल्पनेचं पांघरुण घेणार तूं ! पण लक्षांत ठेव कीं एक मातेचं वात्सल्य सोडलं, तर जगांतल्या कोणत्याही प्रेमाच्या पांघरुणाला मत्सराचं अदृश्य अस्तर असतं ! पांघरुणांत लपेटून ठेवलेली प्रत्येक व्यक्ति ही आपल्या अंकित असावी अशी विचित्र अभिलाषा असते पांघरुण घालणाराची ! आणि या अभिलाषेला शेंकडो स्त्रीपुरुष बळी पडल्यावांचून राहात नाहींत.

तुझ्याकडून बरेच दिवसांत पत्र नाहीं, असें कां ? कोणत्या उद्योगांत इतकी गुंतली आहेस ? निदान पत्रतरी पाठीव. परवांच मी बर्ट्रंड रसेलचं " Roads to Freedom " हें पुस्तक वाचलं. जुनंच पुस्तक आहे. जुनं म्हणजे सात आठ वर्षापूर्वीं प्रकाशित झालेलं. पण त्यांतले विचार आणि विषय हे मात्र नवीन आहेत ! तशा प्रकारचीं पुस्तकं वाचलीं म्हणजे वाटतं कीं भूतदया आणि हृदयपालट यांच्या आधारावर राजकारण पार पाडणारे महापुरुष आंधळे असावेत ! ' हृदयपाटल ' आणि ' आत्म्याची प्रेरणा ' हे शब्द ऐकले कीं वाटतं सृष्टींत स्पर्धा सुरू होण्यापूर्वीच्या जगांतले हे समाधानी तपस्वी असावेत ! पण त्यांची तपश्चर्या बंदिवान् राष्ट्राचा मोक्ष करण्याकरितां उपयोगीं पडत नसते......"

या पत्रांतील हे विचार वास्तविक शिरीषकुमारांनीं कांहीं पहिल्यांदाच लिहिले नव्हते. नीरेच्या संग्रहीं असलेल्या मागल्या कांहीं पत्रांतूनही असलेच तळमळीचे विचार व्यक्त झालेले होते. पण हें पत्र बॅरिस्टर विजयांच्या बद्दल नीरेच्या वडिलांनीं मनांत कांहीं संकल्प उभे करण्याचा जो प्रयत्न चालविला होता, तो ढासळण्याच्या बेताला नेमकें जाऊन पोहोचलें, आणि त्यानें सारा कल्पान्त उसळला !

× × × ×

त्या दिवशीं संध्याकाळीं शिरीषकुमारांनी सांगून ठेवल्याप्रमाणें त्यांच्या बरोबर जाण्याकरितां नीरा तयार होऊन बसली होती. बाहेर गेलेले शिरीषकुमार अद्याप परत आले नव्हते. नर्मदाबाई आनंदकर आजही अनाथालयांत नीरेला भेटण्याकरितां आली होती. आपल्या दुरवस्थेचा नीरेच्या मनावर शक्य तितका परिणाम व्हावा म्हणून तिनें नीरेला कळवळा वाटण्यासारखी आणखीही पुष्कळ माहिती सांगितली. आणि नर्मदाबाईच्या अपेक्षेप्रमाणें नीरेला तिच्या दुःस्थितबिद्दल खरोखरंच फार वाईट वाटलें. नीरेनें जवळजवळ मनाशीं ठरवूनच टाकलें होतें कीं, या बाईला अनाथाल्यांत प्रवेश देऊन तिला शक्य तें साहाय्य करावयाचें. पण तिच्या मनांत असेंही येत होतें कीं ज्या घटनेमुळें ही वाईट स्थिति त्या बाईच्या वाट्याला आली आहे, त्या घटनेंतील व्यक्तींशीं आपला चांगला परिचय आहे. प्रमिलेशीं तर आपली फार मैत्री आहे. तिची कानउघाडणी करून आणि त्या दादासाहेबाला जोराच्या कानपिचक्या देऊन त्या बाईच्या तीव्र दुःखाची थोडीशी तरी कां होईना पण उलटफेड केल्याशिवाय आपण राहूं नये. पण हें सारें करावयाचें तें मोठ्या चातुर्यानें करावयाला हवें होतें ! त्याचा नक्की मार्ग ठरविण्यासंबधांत आपण शिरीषकुमारांची मदत घेतली पाहिजे असा नीरेनें मनाशीं बेत केला होता. संधि साधून शिरीषकुमारांजवळ हा विषय काढावयाचा असें तिनें ठरविलें होतें आणि मन त्याच विचारांत गुंतले असतांना बाहेर जाण्याची सारी वेषभूषेची तयारी तिनें चालविली होती.

शिरीषकुमारांनीं लगबगीनें घरांत पाऊल ठेवीत नीरेला आपल्याबरोबर ताबडतोब निघण्याची सूचना केली. आणि त्याप्रमाणें तीं दोघेंही ट्रॅममध्यें जाऊन बसेपर्यंत एकमेकांशीं कांहीं न बोलतां झपाट्यानें हालचाल करीत होतीं. ट्रॅमच्या कंडक्टरनें जवळ येऊन जेव्हां विचारणा केली तेव्हां त्याच्या हातावर पैसे ठेवीत शिरीषकुमारांनीं म्हटलें, " परेळ "

तें ऐकून नीरेनें विचारलें, " म्हणजे ? परेळला चाललों आहों आपण ? "

" होय. आज तिथं आमच्या कामगारसंघाचा सत्यनारायण आहे. '

" कशाकरितां पूजणार आहेत ते सत्यनारायण ? "

" मी निर्दोषी सुटलों म्हणून ! "

आणि कांहींवेळ थांबून हंसत शिरीषकुमारांनीं म्हटलें, " माझं अनिष्ट टळावं म्हणून माई मंगळाचा जप करते आणि हे सारे कामगार असली पूजा करतात. साऱ्यांनाच जणूं वाटतं कीं हा कोप दैवी आहे. त्यांना जेव्हां हा कोप दैवी नाहीं, माणसांचा आहे, तो माणसानं निर्माण केलेला आहे, आणि माणसानं आपला स्वार्थ साधण्याकरितां तो निर्माण केला आहे असं समाजायला लागेल, तेव्हां त्यांना मग असंही वाटायला लागेल कीं हा राग घालविण्याकरितां जे जप करावयाचे ते वेगळ्या प्रकारचे असले पाहिजेत, आणि जे प्रसाद द्यायचे तेही निराळ्या पद्धतीचे दिले पाहिजेत ! "

या बोलण्याचें नीरेला हसूं आलें आणि कौतुकाच्या भावनेनें तिनें जवळच बसलेल्या शिरीषकुमाराच्या मुद्रेकडे किंचित् टक लावून पाहिल्या सारखें केलें. अशी ती पाहात असतांनाच मधली कुठली तरी थांबण्याची जागा आल्यामुळें ट्रॅम थांबली, आणि त्या दोघांच्याही शरीरांना धक्के बसून एकमेकांना परस्परांचा स्पर्श झाला. त्यावेळीं नीरेला वाटलें कीं, या स्पर्शातून नवविचारांची नाजुक लहरी आपल्या शरीरांत घुसते आहे आणि ती आपलें सारे शरीर महिरून टाकीत आहे !

परेळला उतरून डाव्या हाताच्या रस्त्यानें दोन तीन वळणें घेऊन गेल्यावर एक जुनाट इमारत लागली. त्या इमारतीच्या तिसऱ्या मजल्यावर एका लहानशा दिवाणखान्यांत पूजा चालली होती. त्या दिवाणखान्याभोंवतीं चौफेर असलेल्या अरुंद गॅलरींत अनेक मळक्या सतरंज्या एकमेकींना जोडून अंथरल्या होत्या, आणि त्यावर पुष्कळ स्त्रीपुरुष गर्दी करून बसले होते. शिरिषकुमार म्हणजे त्या पूजेची मुख्य देवता ! त्यामुळें शिरीषकुमार आणि नीरा अशीं दोघेहीजण जिने चढून गेल्यावर साऱ्याजणांनीं एकदम चाळवाचाळव करून शिरिषकुमाराचें स्वागत के`.

त्याच्यासाठीं मुद्दाम घालून ठेवलेल्या बैठकीकडे लोक त्याला घेऊन जाऊं लागले. लांबूनच त्यानें ती गादीलोडाची बैठक पाहिली आणि थबकून त्यांना म्हटलें,

" हें पहा, मी इथंच बसतों. मी नेहमीं तुमच्यामध्यें असाच बसत नाहीं कां ? मग कशाला मला अगदीं वेगळ्या बैठकीवर बसवितां ?

त्याचे हे उद्गार ऐकून त्याला बसविण्याकरितां निघालेल्या कामगारांचीं तोंडें केविलवाणीं झालीं. तीं पाहून शिरीषकुमारांनीं तत्परतेनें म्हटलें,

" पण तुमची बैठक वाया जायची नाही. या बाई आहेत ना, त्या बसतील तिथें. त्या आज तुमच्यामध्यें पहिल्यांदाच आल्या आहेत ना? मग त्यांचा आदरसत्कार नीट करायला नको कां ? मी काय,मी तुमच्यांतलाच आहे ! यांना नेऊन बसवा त्या जागेवर ! "

ही चेष्टा आपल्याला आवडली नाहीं हें दाखविण्याकारतां भुंवया वक्र आणि आकुंचित करून नीरेनें शिरीषकुमाराकडे पाहून मान रागानें वेळावली जणूं तिनें असेंच विचारलें कीं, " हें काय ? असली चेष्टा करण्याकरितां आणि मला लाजविण्याकरितां कां मुद्दाम इथें आणलेंत ? "

आणि नंतर शिरीषकुमाराच्या जवळच बसतां बसतां तिनें त्याला म्हटलें, "माझी श्रीमंती आतां मी विसरण्याचा प्रयत्न करतें आहे बरं का?"

× × × ×

त्या सत्यनारायणाच्या पूजेला गिरण्यांचे मालकही आले होते. शिरीषकुमारांच्या प्रामाणिक त्यागवृत्तीबद्दल त्यांना आदर होता आणि शिवाय आजपर्यंत शिरीषकुमारानें कामगारांची संघटना करण्याचें कार्य करीत असतांना या मालकांच्या धंद्यांला फारसा बाध आगला नव्हता. म्हणून अजूनपर्यंत तरी त्यांनीं शिरीषकुमाराबद्दल कसल्याच प्रकारची अढी धरली नव्हतीं. मोफतलाल आणि शिवलाल यांच्या घरीं मुलांमुलींना शिकविण्याकरितां शिरीषकुमार तर रोज जातच होता ! शिवलालची मुलगी हंसा हिला ती इंग्रजी चौथ्या इयत्तेत असल्यावेळेपासून तो

शिकवीत होता. सध्यां ती इंटरमिजिएट मध्यें होती, आणि अजूनही शिकवणी चालू होती. मोफतलालचा मुलगा यंदांच मॅट्रिकच्या वर्गात आला होता, त्याचीही तयारी करून घेण्याचें काम शेटजींनीं शिरीषकुमारावर मोठ्या आस्थेनें सोंपविलें होतें.

प्रसाद घेऊन बाहेर पडतां पडतां शिवलालची आणि शिरीषकुमाराची गांठ पडली. त्यावेळीं नीरेला त्यांच्यामध्यें झालेलें बोलणें ऐकावयास मिळालें.

" मास्तर, काय, मध्यें तुम्ही पंधरा दिवस आमच्या मुलीला मोकळी सोडली होती म्हणे ! कसं जमायचं असं वरचेवर झाल्यावर ? "

अनपेक्षित रीतीनें विचारलेल्या या प्रश्नाने शिरीषकुमाराचा थोडासा गोंधळ उडल्याशिवाय राहिला नाहीं ! अगदीं नम्रपणानें त्यानें उत्तर केलें,

" असं नेहमीं नेहमीं कसं होईल ? आणि परवांचं सारंच कांहीं—माझा दोष नसतांना निष्कारण माझ्यावर ओढवून आलं ! मी तरी काय करणार ? "

" सोडून द्या ना मास्तर या असल्या चळवळी ! काय मिळणार आहे तुम्हाला त्या करून ? आमचं शास्त्र असं आहे कीं दाम देणारं काम करावं. नॉटपेड कामं करून कांहीं स्वर्ग मिळत नाहीं, हें आम्ही बरोबर शिकलों आहों. "

शिवलालनाही जाण्याची घाई होता, आणि शिरीषकुमाराभोंवतींही कांहीं लोकांनीं गर्दी करून, त्याला थोडा वेळ थांबण्याविषयी सूचना करावयास आरंभ केला म्हणून हें बोलणें तेवढ्यावरच थांबलें.

आणि इतक्यांत शिरीषकुमाराची दृष्टि त्या घोळक्यापैकीं एकाकडे गेली, आणि त्यानें एकदम हाक मारली, " जगन्नाथ, केव्हां आलास रे तूं इथं ? "

जगन्नाथ जवळ येत असतांना नीरेकडे वळून शिरीषकुमारांनीं म्हटलें,

" हा एक रेल्वे पोर्टर आहे. कल्याणला असतो हा. फार बुद्धिवान् आहे, पण बिचारा......"

पण तेवढ्यांत जगन्नाथ अगदीं जवळ येऊन पोहोंचला. आणि नीरेची दृष्टादृष्ट झाल्याबरोबर त्या दोघांची ओळख पटली आणि जगन्नाथानें एकदम विचारलें, " कां ? ओळख आहे कां ? "

नीरेनें माननेंच होकार दिला. शिरीषकुमारांनीं आश्चर्यानें विचारलें,

" म्हणजे ? तुमची ओळख आहे वाटतं ? "

" तर ? तुमच्या जन्मापूर्वीपासूनच आमची ओळख आहे ? " हंसत हंसत नीरेनें उत्तर केलें.

" आश्चर्य आहे बुवा ! "

पण नीरेनें शिरीषकुमारांना संपाच्या दिवशीं रात्रीं झालेली हकिकत थोडक्यांत सांगितली, तेव्हां सारा उलगडा झाला.

जगन्नाथानें आपली आई बरीच आजारी असल्याचें जेव्हां सांगितलें, तेव्हां शिरीषकुमारानें नीरेला म्हटलें, " त्या माउलीला तूं पाहिलं नाहींस. मोठी हुशार बाई आहे, पण परिस्थितीनं वायां गेली. " आणि जगन्नाथाकडे वळून त्यानें विचारलें, " फार आजारी आहे कां ती ? काय होतं आहे तिला ? "

जगन्नाथाच्या आईला गेले आठ दिवस ताप येत होता. आणि तो मुदतीचा असावा असें जगन्नाथाला वाटत होतें. हें कळल्याबरोबर शिरीषकुमारांनीं म्हटलें, " अन् मग औषधपाण्याचीं काय व्यवस्था केली आहेस ? "

जगन्नाथानें कांहीं उत्तर दिलें नाहीं. त्याच्या डोळ्यांत आंसवें चमकत होतीं. त्यानें तोंड खालीं केलें, आणि तो स्वस्थ उभा राहिला.

कांहीं वेळानें तीं दोघेंहि तेथून बाहेर पडलीं तेव्हां चालतां चालतां शिरीषकुमारानें नीरेला म्हटलें,

" नीरे, मीं जगन्नाथाबरोबर त्याच्या घरीं जातों. उद्यां सकाळीं येईन. माईला काळजी वाटायला नको म्हणून तुला आतांच घरीं पाठवून देतों. आज सकाळींच तिनं आपल्याला घरीं परत येण्याबद्दल आठवण ठेवण्याची ताकीद दिली होती. पण हें असं होतं. निरुपाय आहे माझा! मला जायला पाहिजे. "

× × × . × ×

नीरा एकटीच घरीं गेली. आणि तिनें माईला शिरीषकुमार कल्याणला गेल्याचें सांगितलें.

अगदीं निजण्याच्या वेळीं कांहीं आठवण झाल्यासारखें होऊन माईनें म्हटलें, " नीरे, विसरलेंच मी. तुझं एक पत्र आलं आहे दुपारीं. "

नीरेनें तें पत्र हातीं घेऊन पाहिलें. पाकिटावर बरेच शिक्के होते! पुण्याहून आलें होते तें पत्र!

त्या पत्रांत तिच्या वडिलांनीं लिहिलें होतें....

" तूं मुंबईला आहेस, प्रमिलाही मुंबईला आहे, म्हणून तिच्या पत्त्यावर हें पत्र लिहीत आहे. तुला तें मिळेल अशी आशा आहे. मिळालं तर सांगतों तसं कर.

मी मुंबईला ता. ११ रोजीं सरदारगृहांत येणार आहें, त्यावेळीं तुझी गांठ पडायला पाहिजे. पुण्याहून जातांना तूं माझ्याशीं कांहीं न बोलतां, माझी गांठ न घेतां गेलीस. तुला मला भेटायचं आहे. सरदारगृहांत केव्हांही ये. येणं शक्य झालं नाहीं तर फोन कर. म्हणजे मग मीच तूं कुठं असशील तेथें येऊन तुला भेटेन. "



## प्रकरण ११ वें

# मागल्या प्रवाहांत डोकावून पाहिलें !

———:o:———

त्या दिवशीं नीरा अनाथालयांतल्या आपल्या खोलींत कांहींसें काम करीत बसली असतां तेथें प्रमिला अकस्मात् आल्याचें पाहून तिला आश्चर्य वाटलें. एकतर प्रमिला शाळेंत काम करीत असण्याची ती वेळ होती, आणि दुसरें म्हणजे, मागें एका रात्रीं नीरा प्रमिलेच्या येथून आली होती त्यावेळीं प्रमिलेच्या मुद्रेवरून नीरेनें मनाशीं अशीं खुणगांठ बांधली होती कीं, प्रमिला यापुढें शक्यतोंवर आपणांस टाळण्याचाच प्रयत्न करील ! कारण त्या रात्रीं नीरेला निरोप देण्यापुरतीच काय ती प्रमिला तिच्या समोर येऊन उभी राहिली होती. भलत्याच वेळीं नीरा आल्याचें पाहून प्रमिला त्यावेळीं मनस्वी गोंधळून गेली होती, इतकेंच नव्हें, तर खोलींत दिवा न लावणें आणि न्हाणीघरांत जाऊन तोंडावर पाणी घेत राहाणें, या गोष्टी तिनें बुध्याच केल्या होत्या, याचीही नीरेला सूक्ष्म जाणीव झाली होती. त्या जाणीवेमुळेंच तिला प्रमिला आतां आपल्याला मुद्दाम भेटण्याकरितां आल्याचें पाहून फार आश्चर्य वाटलें !

आणि दुसरीही एक अपेक्षा खोटी ठरल्याबद्दल तिला फार अचंबा वाटला. त्या रात्रीनंतर प्रमिलेची आणि आपली पुन्हां जेव्हां गांठ पडेल तेव्हा तिच्या चर्येवर विषाद किंवा ओशाळगत यांची दाट छाया पसरल्याशिवाय राहाणार नाहीं, अशी जवळ जवळ तिची खात्री होती. पण आतां त्या खोलींत प्रवेश करीत असतांना प्रमिलेच्या मुद्रेवर कोणत्याच स्वरूपाचा विषाद चमकून गेला नाहीं.

या अपेक्षाभंगामुळें तिच्याशीं काय बोलावें अशा बुचकळ्यांत पडलेल्या नीरेला प्रमिलेनें म्हटलें, " नीरे , आज तुझ्याशी मला पुष्कळ पुष्कळ बोलायचं आहे. पण इथून कुठंतरी बाहेर जाऊं अन् मग बोलत बसूं."

" इथं देखील तसं बोलत बसायला कांहींच हरकत नाहीं." या नीरेच्या बोलण्यावर उत्तर देण्याकरीतां प्रमिला म्हणाली " छे इथं नको. अगदी अशा जागीं जाऊ कीं, त्याठिकाणीं माणसाच्या चाहुलीचा ओझरताही भास आपल्या दृष्टीला व्हायचा नाहीं !"

काम संपवून बाहेर पडण्याची वेळ झाली नसतांही नीरेनें हातांतलें काम बाजूला ठेवलें, आणि ती प्रमिलेबरोबर जाण्याकरितां त्या अनाथालयाच्या बाहेर पडली.

शीव स्टेशनच्यालगत असलेल्या खाडीपर्यंतचा रस्ता चालतांना त्यानीं एकमेकींशीं बोलण्याचा फारसा प्रयत्नच केला नाहीं. वाटेवरच्या एक देवळांतील घंटा कुणीसें मोठमोठ्यानें वाजवीत होतें. त्यामुळें त्या दोघींच्याही तंद्रीचा भंग झाला. त्या देवळाच्या आसपासच्या हिरव्यागार शोभेकडे पाहात प्रमिलेनें म्हटलें, " किती मोकळं आहे नाहीं, या बाजूला ? सारं कांहीं सोडून द्यावं नि इथं येऊन राहावंसं वाटतं अगदीं !"

नीरेला उत्तर देण्याचा मोह आंवरला नाहीं. तिनें चटकन् म्हटलें, " देऊळ आहे बरं का हें ! इथं येऊन तूं राहिलीस तर लोक म्हणतील, करून सवरून भागली नि तपाला लागली !"

पण केवळ विनोद करण्याच्या हेतूनें दिलेल्या या उत्तरांतूनही प्रमिलेच्या अन्तःकरणाला चाटून जाणारी धार निर्माण झाली. रोखल्या नजरेनें तिनें नीरेकडे पाहात विचारलें, " म्हणजे ?"

" असली एकान्ताची एकादी देवळाची जागा पाहिलीं कीं, मला टेनिसननें वर्णन केलेल्या आर्थरच्या ग्विनेव्हर राणीची आठवण होते. तशी आठवण व्हायला कारण काय तें सांगतां नाहीं यायचं. पण होते हें मात्र खरं."

आपल्या बोलण्याची धार कमी करण्याकरितां म्हणून केवळ नीरेनें हा वाङ्मयांतला उल्लेख केला. पण त्या उल्लेखाचाही प्रमिलेच्या मनावर थोडासा विपरीतच परिणाम झाला. अगदीं न कळतच प्रमिलेच्या अन्तः-

करणानें स्वतांची ग्विनेव्हरशीं क्षणमात्र तुलना करून पाहिली. आणि त्या-मुळें तिला वाटलें कीं, त्या रात्रींच्या प्रकारावर प्रहार करण्याच्या हेतूनें नीरेनें मुद्दामच असें खोंचदार भाषण केलें असावें !

त्यामुळें बराचवेळ एकमेकींचें कांहींच भाषण झालें नाहीं. त्या खाडीपाशीं पोहोंचल्यावर दोन दगडावर चांगलीशी जागा पाहून त्या दोघी बसल्या. बसल्यानंतरही बोलण्यास सुरवात कशी करावी हा प्रमिलेला मोठा प्रश्नच पडला. ‘ मला तुझ्याशीं बरेंच बोलायचं आहे, असें ती म्हणून गेली खरी, पण प्रत्यक्ष वेळ आल्यानंतर विषयाला सुरवात कशी करावी, याची तिला अडचण वाटल्याशिवाय राहिली नाहीं ! त्या अडचणीं-तून मार्ग काढण्याकरितांच प्रमिलेनें नीरेला विचारलें,

“ पुण्याकडची कांहीं हालहवाल समजली कां तुला ? परवांच तुझ्या नांवाचं एक पत्र माझ्या पत्त्यावर आलं होतं; मिळालं तुला तें ? शिक्क्या-वरून पुण्याचं वाटलं मला तें ! ”

मघां ग्विनेव्हरच्या उल्लेखानें नीरेकडून प्रमिलेचें मन जसें नकळतच दुखावलें गेलें, तसें आतां या पत्राबद्दलच्या प्रमिलेच्या प्रश्नानें नीरेच्या मनाला किंचित् विव्हळ करून सोडलें. शरीराच्या एकाद्या नाजुक जागीं मुका मार बसलेला असावा आणि त्यांतून कसल्याही ओझरत्या धक्क्यानें तीव्र कळ यावी तसें नीरेच्या मनाचें झालें. त्या पत्रांत लिहिलेली अकरा तारीख उजाडायला अद्याप तीन दिवसाचा अवधि होता. अप्रिय गोष्ट करण्याचा प्रसंग येणार असेल तेव्हां येवो, पण त्यासंबंधानें आधीं विचार करीत बसून निष्कारण दुश्चित्त होऊं नये अशी माणसाची प्रवृत्ति असते. त्या प्रवृत्तीला अनुसरून त्या दिवशीं काय करावयाचें त्याचा त्रास आतांच कशाला करावा, असा मनाशीं अर्धवट निर्णय करून नीरेनें त्या पत्राचा विचार डोक्यांतून काढून लावण्याचा प्रयत्न केला होता ! पण विरलेलें वस्त्र आव-रून घेण्याच्या प्रयत्नांत तें एकाद्या लहानशा खिळ्याला ओझरतें लागावें आणि त्याची जास्तच चिरफाड व्हावी तसें या पत्राबद्दलच्या विचारानें

झालें! आणि शिवाय, मुद्दाम जाणीव ठेवून एकाद्या गोष्टीचें विस्मरण पाड-ण्याचा प्रयत्न मनाकडून होऊं लागला म्हणजे आपण अमुक एका गोष्टीचें विस्मरण पाडण्याचा प्रयत्न करीत आहों, याचीच जाणीव जास्त दृढ होते! मनाच्या या स्थितींत प्रमिलेनें विचारलेल्या प्रश्नानें नीरेची वृत्ति गोंधळून गेली! तरीही तिनें उत्तर केलें,

" तसं विशेष कांहीं नाहीं. बाबांचं पत्र होतं तें. ते इथं कायसे येणार आहेत अकरा तारखेला! म्हणून त्यांनीं सहज लिहिलं होतं मला!"

हें उत्तर देतांना भोंवतालच्या साऱ्या उदास सृष्टीकडे तिनें अगदीं शून्य दृष्टीनें पाहिलें. शीव स्टेशनवर न थांबतां शिटीचा कर्कश आवाज करीत जोरानें धडधडत जाणाऱ्या गार्डानेंच तिथल्या एकांताचा फक्त भंग होत होता. समोरच्या खाडीचें पाणी अगदी निश्चल होतें. किंचित् डाव्या बाजूनें खाडीच्या एका तीराला वांद्र्याची वसाहत पसरली होती. तेथील निसर्गत:च लवलेली कांहीं नारळींचीं झाडें पाण्यांत डोकावून पाहात असल्यासारखीं दिसत होतीं! जीवनरसाची आवड यत्किंचितही कमी न झालेल्या एकाद्या वृद्धानें जणूं पूर्वायुष्याच्या प्रवाहांत डोकावून पाहण्याचा तो प्रयत्न चालविला होता! वर्षानुवर्षें धूर लागून धुरकटलेल्या पांढऱ्या छतासारखें दिसणारें आकाश अगदीं नि:स्तब्ध होतें. प्रतिबिंब क्षमता क्षीण झालेल्या एखाद्या जुन्या आरशाच्या कांचेप्रमाणें त्या खाडीचें पाणी गढुळल्यासारखें वाटत होतें, आणि त्या आरशांत पडणारें प्रतिबिंब-जसें पुसट आणि धूसर दिसतें तशी भोंवतालच्या सृष्टीची त्या विस्तीर्ण जलाशयांत पडलेली छाया अस्पष्ट आणि काळवंडलेली दिसत होती! किंब-हुना पुण्याकडे जाणारा डांबरी रस्ताही या साऱ्या औदासीन्याच्या छायेनें जणूं अधिकच काळवंडून गेला होता. वर इतस्तत: पसरलेल्या तारा-यंत्राच्या आणि वायुमापनाच्या तारा पाहून तर असाच भास झाला असता कीं, क्षितिजापाशीं मिळलेल्या आकाश आणि खाडी यांनीं तयार झालेल्या

मलिन आवरणांत धूळ खात पडलेल्या एखाद्या दिलरुब्याच्या तारा अंगुलिस्पर्शाची जणूं आतुरतेनें वाट पाहात आहे.

ही सारी उदासीनता असह्य वाटूनच कीं काय, प्रमिलेनें म्हटलें,

"फार दिवस माझ्या मनांत तुला भेटावं असं होतं!"

"म्हणजे? मी मुंबईला आल्यापासून तर आपल्या कितीदांतरी गांठीभेटी झाल्या! आणि फार दिवस भेटावंसं वाटत होतं असं म्हणतेस याचा अर्थ काय?"

"पण तुला कांहीं सांगावं, असं जें आज बरेंच दिवस माझ्या मनांत आहे तें न सांगतांच या साऱ्या भेटीगाठी होऊन गेल्या, म्हणून मी त्या जमेंत धरायलाच तयार नाही!"

"यः! छान आहे हा हिशेब! एखाद्यावेळीं संबंध आयुष्यभरही एखादी गोष्ट सांगायची राहून जाईल आणि मग तूं आयुष्यही जमेंत धरायला तयार व्हायची नाहींस!"

"खरं नाहीं कां हें! आयुष्यांत ज्यावेळीं जी गोष्ट घडायला पाहिजे ती घडायची राहून गेली तर त्या आयुष्याचा जमाखर्च बरोबर झाला नाहीं असं म्हणायला नको कां?"

प्रमिलेचें बोलणें कांहींसें वैतागाचें, किंबहुना पश्चातापाचें भासलें म्हणून नीरेनें निरखून पाहिलें. दूरच्या क्षितिजापर्यंत पसरलेल्या त्या जलाशयाकडे टक लावून पाहात प्रमिलेनें म्हटलें,

"नीरे, खरंच, मला हल्लीं आतां असं वाटायला लागलं आहे कीं, आपल्याला स्वतांच्याच आयुष्याचा नीट अंदाज करतां येत नाहीं."

"कधीं कधीं एखाद्या गोष्टीनं माणसाला वैताग आला म्हणजे असं वाटतं इतकंच! मला वाटतं, तुला अलीकडे वैराग्याची मधूनमधून लहर यायला लागली आहे, याचा हा परिणाम असावा!"

" किती बरोबर बोललीस नीरे ! वैराग्याची लहर ! लहरीमधले माणसाचे व्यवहार हे मनापासूनचे नसतात ना ? का मनापासून जे करायची इच्छा असते तें एरवींच्या व्यवहारांत करायला मिळालं नाहीं म्हणजे लहर येते ? कांहींच सांगतां येत नाहीं नीट. पण वैराग्याची लहर आपल्याला येते, ती फार काळ टिकवून ठेवणं हाच आपला नित्याचा मनोधर्म आहे, अशी आपण आपली फसवणूक करून घेतों आणि त्या लहरीशीं चाळे करतों हें मात्र अगदीं खरं ! भलत्यावेळेला आलेली कोणतीही लहर जशी हानिकारक ठरते, तशीच आयुष्यांत अकालीं येणारी ही वैराग्याची लहर माणसाच्या किती तरी शक्तीला खाऊन टाकते ! "

" हेंच तत्वज्ञान ऐकण्याकरितां तूं मला इतक्या लांब आणलेंस वाटतं ? कुणाला जर हें सांगितलं, तर मात्र, आपण दोघीही वेडाच्या लहरींत आहों, असं निदान करायला फारशी अडचण पडणार नाहीं ! "

" नाहीं. मला सांगायचं होतं तें या वैराग्याच्या लहरीबद्दलच ! तुझ्या माझ्यासारख्या शेंकडा नव्वद मुलींना आपण फार वैराग्यशील आहों असं वाटत असतं, नव्हे, असं वाटून घेणं ही एक फॅशन पडून गेली आहे. मनांतून सर्वसामान्य सुखांची अपेक्षा उसळून वर येत असते, तरीही स्वतःला आणि इतरांनाही आपण त्यागाचे भोक्ते आहों, असं भासविण्याची आपली सारखी यातायात झालेली असते ! मागें पुण्यांत यशवंत संगीत मंडळीचं सौभद्र नाटक लागलं होतं तें आठवतं ना तुला ? नाटकाचा प्रयोग फार चांगला होतो असा फार बोलबाला झाला होता साऱ्या पुण्यांत, म्हणून आपण मुद्दाम तो प्रयोग पाहाण्याकरितां गेलों होतों. तिसऱ्या अंकांतील कृष्ण–रुक्मिणीचा शृंगाराचा प्रवेश चालू असतांना आपण भरल्या नाटकगृहांतून उठून येण्याचं नाटक केलं. हो, नाटकच वाटलं तें मला ! काय विशेष होतं त्या प्रवेशांत ? निदान उठून येण्यासारखं त्यांत काय होतं ? पण आपल्याला स्वतांची आणि इतरांची फसवणूक करायची होती, आणि असं खोटंच पटवून द्यायचं होतं कीं, आम्हाला असल्या भोगवृत्तीचा मनस्वी तिटकारा आहे ! आमचं मन कोणत्याही सामान्य सुखासंबंधांत

अगदीं निर्लेप आहे ! पण फसवणूक नव्हती कां ही ? हेंच पहाना, इंटरच्या वर्गात शाकुंतल नाटक शिकत असतांना आपण एरवीं कोणतेही तास बुडवायला तयार झालों असतों, तरी तिसऱ्या अंकाच्या वेळीं आपण आवर्जून हजर राहात होतों. त्या अंकांतील शृंगारपूर्ण वाक्यांची पृथक्करणं चालू असतांना विद्यार्थी स्टॅंपिंग करीत, त्यावेळीं आपणही स्मितपूर्वक त्या करण्याला मनानं कितीदांतरी संमति दिली होती ! तास संपल्यावर मात्र तासाला न चुकतां हजर राहणाऱ्या आपण सोवळेपणाचा आव आणून एकमेकींना फसविण्याकरितां कितीदांतरी मुद्दामच म्हणत होतो कीं, कालिदासानं लिहिलं म्हणून काय झालं ? प्रोफेसरांना कशाला सगळं तें अगदीं सायसंगीन वाचून दाखवायला हवं ? ”

पण नीरेला वाटलें, प्रमिलेचें हें बोलणें म्हणजे सुद्धां फसवणुकीचाच एक प्रकार नाहीं कां ! त्यारात्रीं ती व दादासाहेब आनंदकर अशीं दोघें अंधारांत एकत्र होतीं. हें आपण प्रत्यक्ष पाहिलें ! त्या पाहाण्याचा आपल्या मनावर कोणताही विपरीत परिणाम होऊं नये म्हणूनच हें सारें बोलणें चालू आहे. नाहींतर सारं जग कुठं चुकतं आहे हें सांगत बसण्याचा प्रमिलेनें हा एवढा खटाटोप कशाला चालविला असता ? आपल्या हातून घडलेल्या गोष्टींचं समर्थन करण्याकरितां माणसाला जगाचा हवाला देण्याची जरूर भासूं लागते, त्यांतलाच हा प्रमिलेचा प्रकार आहे ! म्हणून तिनें प्रमिलेला मुद्दामच विचारलें,

“ तुझ्या स्वतांच्या आयुष्यांत तुला असा कांहीं अनुभव आला आहे कां प्रमिले ? ”

“ आला असला तरी धावत जाऊन कोणा जिव्हाळ्याच्या माणसाला सांगावं असे कोण आहे मला ? आईबापांजवळ मनांतली गोष्ट बोलून दाखवायला वयपरत्वें आपोआप मर्यादा पडत जाते ! आणि कांहीं गोष्टी अशा असतात कीं त्या समवयस्क माणसाला सांगता येतात, पण जन्मदात्या आईलाही सांगायचा संकोच वाटतो ! माझंच पहा ना. आज मला कांहीं

सांगावसं वाटलं तर तें मी कुणाला जाऊन सांगायचं ? कुणा मायेच्या माणसाच्या गळां पडायचं आणि कुणाजवळ सारं मन उघडं करून दाखवायचं ? बोलतांबोलतां प्रमिलेच्या डोळ्यांतून खळकन् अश्रु गळले ! तिचा हात आपल्या हातांत घेत नीरेनें तिला म्हटलें, " प्रमिले, आपण दोघी अगदीं लहानपणापासूनच्या मैत्रिणी ना ? मग असं काय करतेस ? मला सांग सारं तुझं दुःख ! "

' पण नीरे, दुःखानं ऊर पिटीत असतांना त्या उराच्या आंतल्या बाजूला कोणत्या भावनांची खळबळ माजून राहिली आहे हें जसं आपलं आपल्यालाच समजत नाहीं, त्याप्रमाणेंच ज्या व्यक्तीच्या हृदयावर डोकं टेकून आपण दुःखभार हलका करण्याचा प्रयत्न करितों त्या व्यक्तीच्या हृदयाच्या आंतही काय चाललेलं असतं त्याचा पत्ता लागत नाहीं. किती फसवं असतं नाहीं शरीर ? '

' माझं शरीर नि मन हींही फसवीं आहेत असं कां तुझं म्हणणं आहे ? '

' नाहीं. असं मला वाटलं नाहीं, म्हणून तर तुझ्याकडे मी धावत आलें ! '

आणि मग प्रमिलेनें मनाला आलेला सारा भर वायां जाऊं दिला नाहीं. तिनें संभाषणाच्या ओघाओघांत, त्या रात्रीं नीरेनें पाहिलेल्या प्रकारापर्यंत तिचे आणि दादासाहेबांचे संबंध कसकसे वाढत गेले होते, त्याचें सविस्तर वर्णन केलें.

× × ×

एकदां एका बाळंतपणांत प्रमिलेची आई अगदीं मरतां मरतां वांचली. उन्हाळ्याचे दिवस होते ते ! थंड हवेच्या गांवीं जाऊन हवाफेर केल्याशिवाय तिच्या प्रकृतीला उतार पडणार नाहीं, असें डॉक्टरांनीं सांगितल्यावरून प्रमिलेची आई, प्रमिला आणि तिच्या एकदोन बहिणी इतकी मंडळी लोणावळ्यास जाऊन राहिली. भांगारवाडींतील सॉलिसिटर

दीक्षितांच्या बंगल्यापैकीं मोठ्या बंगल्यांत नानांनीं मुद्दाम जागा मिळविली होती. आपल्या कांहीं स्नेह्यांच्या मध्यस्थीनें दीक्षितांशी बोलणें करून कमी भाड्यांत बंगला मिळण्याची व्यवस्था केली होती. प्रमिलेच्या कॉलेजला सुट्टी झाल्याबरोबर ही सारी मंडळी लोणावळयास आली. वरचेवर बाळंतपणें होऊन प्रमिलेच्या आईची प्रकृती आधींच हलख झाली होती. त्यांतून या दुखण्यानें तर तिची अगदींच दशा झाली होती. त्यामुळें या खेपेला प्रमिलेवर कामाचा फार भार पडे. आईचीं गेलीं दोनतीन बाळंतपणें तर जवळ जवळ प्रमिलेनेंच केलीं होतीं. लग्न होऊन बाळंतपण होण्याचें वय असलेल्या आपल्या मुलीनें आपल्या घरांत कष्ट उपशीत राहावें याचें प्रमिलेच्या आईला राहून राहून वाईट वाटे. शारीरिक दुखण्यापेक्षांही मनाच्या या क्लेशांमुळें प्रमिलेची आई अलीकडे फार खिन्न असे. लोणावळयासारख्या गांवीं नवीनपणामुळें पहिले दोनचार दिवस तिला प्रसन्नता वाटली. तसें पाहिलें तर तिच्या प्रकृतींतही थोडथोडा आराम पडत होता. दीक्षितांच्या बंगल्याचा माळी आणि त्याचा जोडिदार रखवालदार असे दोघेहीजण घरांतील मोलमजुरीनें होण्यासारखें काम आटपीत असत. पण स्वयंपाकपाणी प्रमिलेलाच करावें लागे. भांगारवाडींत या बंगल्यांच्या बाजूला फारशी वसती नव्हतीच. दीक्षितांचे बंगले आणि भारतसेवक समाजाची एक लहानशी इमारत याखेरीज बाकीचा सारा प्रदेश ओसाड होता. बंगल्यापासून सुमारें मैलाच्या अंतरावर लहान मोठ्या टेकड्या होत्या, त्या बंगल्याच्या मागल्या व्हरांड्यांतून दिसत. त्या टेकड्यांच्या रांगांकडे पाहात मनाची करमणुक करीत बसण्याचा प्रसंग प्रमिलेवर कितींदां तरी येई. कारण आईला वाचून दाखविणें, गाणें म्हणणें इत्यादि गोष्टी कितीही वेळ केल्या तरी दिवसाकाठीं असा कितीतरी वेळ उरे कीं त्यावेळीं प्रमिलेला एकट्याशींच स्वस्थ बसावें लागे. बंगल्याच्या पुढल्या बाजूला विस्तीर्ण बगीचा होता. त्या बगीचांतून हिंडतांना कांहीं अंतरावरून जाणाऱ्या आगगाड्या दिसत. त्या आगगाड्यांच्या जाण्यायेण्यावरून घरांतील घड्याळ नक्की लावतां येईल अशी वेळ कळत असे.

त्या प्रदेशाच्या ओसाडपणामुळें संध्याकाळच्यावेळीं फार भीति वाटे. संध्या-काळच्या वेळीं माळी आणि रखवालदार गांवांत हिंडण्याकरितां जात. ते एकदोन तास तर कित्येक वेळां फारच अवघड वाटत. नानांची सोबत असती तर एकवेळ इतकी भीति वाटली नसती. पण नानांना कोल्हापूरला कांहीं जरूरीच्या कामाकरितां जावें लागलें, आणि त्याच कामाकरितां आप-ल्याला कोल्हापुरास एकदोन महिने राहावेंही लागेल असें त्यांनीं प्रमिलेला पत्रानें कळविलें होतें, आईचें कांहीं जास्तकमी वाटलें तर ताबडतोब पत्रानें किंवा तारेनें कळविण्याबद्दलही त्यांनीं लिहिलें होतें.

त्या जागेच्या ओसाडपणामुळें प्रमिलेला नुसती भीतिच वाटे असें नाहीं तर बोलायला बरोबरीचें कोणी नाहीं, म्हणूनही तिला कित्येकवेळां करमेनासें होई. आपल्या दोघी लहान बहिणींना घेऊन प्रमिला कित्येक-वेळां शिवाशिवी, लपंडाव, लंगडी असले खेळही खेळे. त्या लहान मुलींबरो बर आपला मोठेपणा विसरून खेळणाऱ्या प्रमिलेला पाहून तिथला माळी व रखवालदार यांची मोठी करमणुक होत असे. एकदां तर त्या रखवाल-दारानें गांवांतील कुणब्याच्या दोन परकऱ्या पोरींना मुद्दाम आपल्याबरोबर आणून प्रमिलेचा खेळ त्यांना दाखविला होता ! नाचून म्हणण्याची किती-तरी गाणीं प्रमिलेनें आपल्या बहिणींना यावेळेला शिकविलीं; पण पुढें पुढें त्या मुली स्वतंत्रपणेंच गाणीं म्हणून किंवा खेळून आपली करमणूक करून घेऊं लागल्या ! त्यामुळें प्रमिलेचा वेळ पुन्हां मोकळा पडूं लागला. आईच्या प्रकृतीचे चढउतार अधूनमधून होत, त्यांचीही काळजी एकट्या प्रमिले-लाच फार वाटे.

आणि एके रात्रीं प्रमिलेची ही काळजी आकस्मिकपणें खरी ठरली. सर्वांचीं रात्रींचीं जेवणींखाणीं झालीं होतीं. प्रमिलेची आई, औषध घेतल्या-नंतर चूळ भरून टाकण्याकरितां मागील दारीं उघड्यावरच असलेल्या न्हाणीघरांत गेली होती. दुरून पडणारा प्रकाश पुरेसा होईल या कल्पनेनें तिनें कंदील व्हरांड्यांतच ठेवला होता. न्हाणीघरांतून आई परत येत

हसतां प्रमिलेला आईचें घाबरल्या आवाजांतील ओरडणें ऐकूं आलें. आंतला कंदील उचलून प्रमिला बाहेर धांवत आली आणि तिनें विचारलें, ' काय झालं ग ? " आणि आईनें उत्तर देण्यापूर्वीच प्रमिलेला सारा प्रकार आढळून आला. आसपासच्या जंगलांतल्या कोल्ह्यांच्या या बंगल्याभोंवती रात्रीं घिरट्या घालण्याचा क्रम असतो, असें माळयानें सांगितलें होतें, त्याचें हें आज प्रत्यंतर आलें होतें. दोन कोल्ह्यांच्या आकृती पाहून आईला कांपरें भरलें, आणि किंकाळी फोडून ती उभ्याजागींच खालीं बसली. प्रमिलेनें माळी व रखवालदार यांना हाका मारल्या. त्यांनींही आईला आंत नेऊन बिछान्यावर ठेवण्याला मदत केली. पण नीरेला जी काळजी वाटली ती पुढचीच वाटली. तिची आई अगदीं बेशुद्धावस्थेंत होती. आतां अशा वेळेला गांवांत जाऊन डॉक्टर बोलावून आणण्याची तर फार आवश्यकता होती. वस्तुत: पुण्यास प्रमिलेच्या आईला फक्त अशक्तपणाखेरीज इतकें बरें वाटूं लागलें होतें कीं डॉक्टरांच्या प्रत्यक्ष साहाय्याचें असें आकस्मिक रीतीनें कारण लागेल अशी कोणाचचि कल्पना नव्हती. अशक्तपणावर शक्तिवर्धक औषधें डॉक्टरांनी घ्यावयास सांगितलीं होतीं, तीं आईला वेळेवर देण्याची तत्परता प्रमिलेनें आजवर फार चांगल्यारीतीनें बाळगलीं होतीं. तरीही हें अनपेक्षित संकट अशारीतीनें उभें राहिलें होतें ! माळी किंवा रखवालदार यांचा गांवांतून डॉक्टर बोलवून आणण्याच्या कामीं उपयोग करावा, असा विचार तिच्या मनांत प्रथम आला. पण त्यांतल्या साऱ्या अडचणी लक्षांत येऊन ती सचिंत झाली. त्या वृद्ध माळयानें तिची ही अडचण जाणली आणि तिला म्हटलें, " डॉक्टर आणायला हवा तर या शेजारच्या बंगल्यांतल्या बुवाला सांगावं. " त्यावर प्रमिलेनें उत्तर दिलें, ' छे. असं कसं उगीच दुसऱ्याला सांगायचं काम ? शिवाय आज महिना झाला, आम्ही कधीं त्यांच्याशीं बोललों नाहीं, कीं, कसली विचारपूस केली नाहीं ! " " पण फार चांगले आहेत हां ते बाबा. एकटेच राहातात त्या बंगल्यांत. मालकानं त्यांना एक खोली देऊन तिथं फुकट राह्यला जागा दिली आहे. मी जातों ना रोज सकाळचा त्यांच्याकडे ! शाळा काढली आहे

त्यांनीं या वाडीच्या वरच्या अंगाला. तिथं गांधींचा पोशाख केलेलों पोरं येतात शिकायला सांगा त्यांना डॉक्टर आणायला. असा उपयोग नाहीं व्हायचा तर पुरुषमाणसाचा शेजार काय करायचाय् ? " माळी सांगत होता तो उपाय अमलांत आणण्याशिवाय गत्यंतर नाहीं, हें नीरलाही पटत होतें. आंत आई बेशुद्ध पडलेली. बाहेर रात्र किर्र झालेली ! दिवा घेऊन रान तुडवायचं म्हटलं तरी जीव जिवाणू चावण्याची भीति !

शेवटीं प्रमिलेनें माळ्याला दिवा घेऊन आपल्याबरोबर चलण्याविषयीं सांगितलें, आणि उजव्या हाताला सुमारें शंभर पावलांवर असणाऱ्या त्या लहानग्या बंगल्यांत जाऊन पोंचल्यावर तिनें माळ्यानें दाखविलेल्या खोलीवर टिचकी वाजविली. तत्परतेनें दार उघडणाऱ्या गृहस्थानें प्रमिलेला, शेजारच्या बंगल्यांत राहाणारी एक तरुण मुलगी, म्हणून ताबडतोब ओळखलें. आणि तशी ओळख दाखवीत त्यांनीं प्रमिलेला आंतल्या खाटेवर बसण्यास सांगितलें. ती वेळ गर्दीची होती, म्हणून प्रमिलेनें ताबडतोब मुख्य विषयालाच सुरवात केली.

' आमची आई असते फार आजारी. '

' हो दिसतात कधीं कधीं त्या या बागेंत फिरतांना. काय होतं त्यांना ? '

' बाळंतपणांतून उठल्यापासून तिला आतांशा बरंच नसतं ! आतां तर ती बेशुद्ध पडली आहे. म्हणूनच आलें होतें आपल्याकडे जरा. '

' मग हुंगवायला अमोनिया वगैरे आणवायचा आहे कां ? '

' छे, अमोनियाचा उपयोग नेहमींचाच आहे. अशक्तपणामुळे तिला फिट्स येतात. त्यांतून आजची जरा जास्त जोराची आहे. डॉक्टरांनाच बोलायला हवं. '

प्रमिलेचे हे उद्गार ऐकल्याबरोबर त्या गृहस्थांनीं कपडे केले आणि ते प्रमिलेबरोबर बाहेर पडले. प्रमिलेच्या बंगल्यांत येऊन त्यांनीं प्रमिलेच्या आईची अवस्था प्रत्यक्ष पाहिली नि म्हटलें,

केलं तुमचं हें ? आमची जात मात्र बक्षिसावांचून नाहीं हां मनापासून असलं काम करायची ! "

" हे गृहस्थ मागतील कां रे बक्षिस आपल्या कामगिरीचं ? " प्रमिलेनें चेष्टेनें विचारलें.

" छे, छे, काय वेड आहे कां ? दिलं तरी घ्यायचा नाहीं तो माणूस ! "



# प्रकरण १२ वें.

# धुक्या आड !

---

आतांपर्यंतच्या प्रमिलेच्या आयुष्यांत समवयस्क पुरुषाशीं प्रमिलेची ओळख होण्याचा प्रसंगच आला नव्हता. लोणावळ्याच्या मुक्कामांत दादासाहेबांशीं झालेली ओळख ही अशी पहिली ओळख होती. मैत्रिणी, वहिणी, आई यांच्याशीं आजपर्यंत निरनिराळ्या प्रसंगीं बोलणारी प्रमिला या नवीन परिचयानें बदलत चालली. तिच्या पाहाण्यांतला सलगीचा पुरुष म्हणजे तिचे नाना ! नाना समाजांत सुधारक म्हणून ओळखले जात होते. समाजकारणांत आगरकरसंप्रदाय आणि राजकारणांत रानडे-परंपरा मानण्याबद्दल नानांची फार ख्याति होती. आपल्या मुली लग्नाशिवाय वाढविणें आणि त्यांना उच्चशिक्षण देणें, या गोष्टी कांहीं काळापूर्वी सुधारकपणाच्या मानल्या जात. त्या तशा मानणारांपैकीं नाना होते. ते स्वतां कॉलेजांतले प्राध्यापक होते. पण त्यांच्या काळीं कॉलेजांत विद्यार्थिनी शिकावयास आल्याचे प्रसंग अपवादादाखल असत. त्यामुळें पालटलेल्या मनूंत मुली कॉलेजांतून जाऊं लागल्या तरी नानांच्या डोळ्यापुढें आपण ज्या कॉलेजांत शिकविलें होतें, तेंच उभें राहात असें.

प्रमिलेला नानांनीं घरांत स्वतंत्रपणानें वागूं दिलें यांत शंका नव्हती. पण कांचनमृगाचा पाठलाग करण्याकरितां जातांना रामानें जशी सीतेकरितां जमीनीवर एक मर्यादा आंखून दिली, तशीच नानांनीं प्रमिलेसंबंधांत मनाशीं एक काल्पनिक मर्यादा पाळलेली होती. प्रमिलेच्या परिचयक्षेत्रांत स्त्रीवर्गाच्या सामान्यतः कोणत्याहि सुसंस्कृत प्रतिनिधीचा समावेश झाला तरी नाना सहसा चौकशीही करीत नसत. पण या परिचयक्षेत्रांत पुरुषवर्गाला नुसता ओझरताही प्रवेश नव्हता. नानांनीं प्रमिलेसंबंधांत पाळलेली काल्पनिक मर्यादा हीच होती ! विशेषतः

समवयस्क तरुण मुलांकडे प्रमिलेनें नुसतें पाहूंही नये असा नानांच्या मनाचा संकल्प होता. आणि प्रमिलेवर हा निर्बंध लादण्यांत नानांनीं फार मोठें चातुर्य वापरलें होतें. प्रमिलेला त्याचा कांच वाटेल अशारीतीनें नानांनीं हा निर्बंध कधींच लादला नाहीं. उलट त्या निर्बंधांतील निषिद्ध संकेताबद्दल प्रमिलेला नावड उत्पन्न होईल असें वातावरण त्यांनीं प्रमिला आणि आपल्या इतर मुली यांच्याभोंवतीं न कळत माजूं दिलें. पुरुषजातीबद्दल आपल्या मुलींच्या मनांत तिरस्कार बाणावा अशी नानांनीं योजना केली होती. त्यामुळें पुढें पुढें तर प्रमिला समवयस्क मुलांचा निष्कारण तिरस्कार करण्यांत, आणि खोट्याच वाईट प्रवृत्ति त्यांच्या अंगीं लावण्यांत एक प्रकारचा विचित्र आनंद मानूं लागली ! समवयस्क कॉलेजांतील मुलांसंबंधांत प्रमिलेनें केवढी मोठी डायरी तयार ठेवलेली असे ! त्या काल्पनिक डायरींत तिच्या आसपास वावरणाऱ्या कितीतरी मुलांच्या फाजिलपणाच्या मनोवृत्तींची मोजदाद केलेली होती. कॉलेजांतील कोणताहि विद्यार्थी आपल्याकडे निर्विकार वृत्तीनें पाहूच शकत नाहीं, अशी प्रमिलेनें आपली ठाम समजूत करून घेतली होती. त्यादृष्टीनें नीरा आणि प्रमिला या दोन मैत्रिणींची वाढ दोन निरनिराळ्या तऱ्हांनीं झाली होती. आपण मनांत आणूं त्याच तऱ्हेनें एकादा वेल वळावा म्हणून काठ्यांच्या कुंपणांनीं त्या वेलाची वाढ करीत बसणाऱ्या माळ्याप्रमाणें नीरेच्या वडलांची स्थिति होती, तर एकाद्या झाडाचा सारा जीवनरस एका विशिष्ट कलमाला मिळावा म्हणून त्या झाडावर दुसऱ्या झाडाचें हलक्या हातानें कलम बांधणाऱ्या बागवानाप्रमाणें नानांची वृत्ति होती ! नानांची ही कलम बांधण्याची योजना प्रमिलेसंबंधांत अपेक्षेप्रमाणें फळाला आली होती. ती तशी फळाला यावी म्हणून नानांनीं कितीतरी दक्षता बाळगली होती. आपल्या स्वत:च्या स्नेहीमंडळींना सुद्धां नाना सहसा घरीं येऊं देत नसत ! कामाकरितां आलेला कोणीही पुरुषमाणूस आपल्या घरांतील स्त्रीक्षेत्राच्या आटोक्याबाहेर राखण्याकरितां नानांची नेहमीं धडपड चालत असे.

× × ×

प्रमिलेची ही वृत्ति कॉलेजांतल्या बऱ्याच विद्यार्थ्यांना माहीत झाली होती. तिची ही वृत्ति पालटावी असें कांहीं सहृदय विद्यार्थ्यांना मनापासून वाटे. अशाच विद्यार्थ्यांपैकीं एकानें एकदां प्रमिलेशीं परिचय होण्यास कांहीं कारण पाहिजे म्हणून, मकरसंक्रांतीचें निमित्त साधलें. कधीं कधीं संध्याकाळच्या वेळीं प्रमिला अणि तिच्या कांहीं मैत्रीणी एक मेळाव्यानें हिंडावयास जात असत. मोठ्या रस्त्याच्या बाजूनें जीं लहानमोठीं मैदानें पसरलेलीं असत, त्यांतल्याच एकाद्या मैदानांत हवा खात बसण्याचा त्यांचा क्रम असे. या विद्यार्थ्याला ही सारी माहिती होती. आपल्या इतर स्नेही मंडळींना मागें ठेवून त्यानें मनाचा हिय्या केला व त्या मुलींच्या जवळ जाऊन तिळगुळाचा एक डौलदार पुडा प्रमिलेच्या हातीं ठेवला. अनपेक्षितपणानें हातीं पुडा ठेवला जात असतांना प्रमिलेचे हात नकळतच पुढें झाले आणि तिनें त्या पुड्याचा स्वीकार केला! त्या मुलाचें नांव प्रमिलेला माहीत होतें. आश्चर्याची गोष्ट अशी कीं, वडिलांच्या कांचांत वाढलेल्या नीरेला त्याचें कांहीं वाटलें नाहीं. प्रमिलेच्या मात्र मनाची मागून लाही झाली. कॉलेजच्या प्रिन्सिपलना प्रमिलेनें दुसऱ्या दिवशीं हा प्रकार सांगितला. सांगतांना त्या मुलाच्या हेतूबद्दल शंका प्रदर्शित करावयाला प्रमिला विसरली नाहीं. त्यामुळें प्रिन्सिपलनीं त्या मुलाला भेटीस बोलावून त्याला झाल्या प्रकाराबद्दल जबरदस्त समज दिली! नानांना प्रमिलेच्या या बाणेदारपणाचें फार कौतुक वाटलें.

असाच आणखी एक प्रसंग. कॉलेजचें एका वर्गाचें गॅदरिंग होतें. जेवण्याकरितां पानें मांडलेलीं होतीं. मुली आणि मुलगे यांच्यामध्यें दोन तीन पानें शिल्लक राहिलीं होतीं; आणि दोन विद्यार्थ्यांना दुसरीकडे कोठें बसण्याकरितां जागा नव्हती. तीं मुलें या मुलींच्या जवळ येऊन बसल्याबरोबर प्रमिला ताबडतोब पानावरून उठली, आणि कांहीं तरी निमित्त करून बाकी साऱ्या मुलींना घेऊन वसतीगृहाकडे निघून गेली; या प्रकाराचा तर एका वर्तमानपत्रांतूनही गवगवा झाला. पण आपण केलें तें अगदीं योग्य होतें, अशी जी प्रमिलेला स्वतांबद्दल खात्री वाटत होती ती

कशानेंही बदलली नाहीं. त्यामुळें गॅदरिंगच्या दुसऱ्या दिवशीं जेव्हां ग्रूप फोटो काढण्याचा प्रसंग आला तेव्हां वर्गातील इतर कांहीं विद्यार्थ्यांशीं संगनमत करून प्रमिलेनें, फोटोसंबंधांत मुलींच्या कांहीं अटी आहेत, असा सर्वत्र पुकारा होऊं दिला. त्या अटी म्हणजे दुसऱ्या तिसऱ्या कांहीं नव्हत्या. फक्त मुलींच्या शेजारीं जवावयास बसणारे ते दोन विद्यार्थी फोटोंत असतां कामा नयेत असा साऱ्या विद्यार्थिनींना प्रमिलेनें हट्ट धरावयास लावला होता. पण ते दोन विद्यार्थीही कांहीं कमी नव्हते. त्यांनीं ही अट वरपांगी मान्य असल्याचें सांगून फोटोच्या ऐनवेळीं मात्र मागल्या रांगेंत येऊन उभे राहाण्याची गुप्तपणानें तयारी केली होती. आणि मौजेची गोष्ट अशी कीं ते दोन्ही विद्यार्थी फोटोंत नेमके प्रमिलेच्या मागेंच निघाले. फोटो निघून गेल्यावर मागून खूप रण माजलें. शेवटीं तो फोटो रद्द करवून नवीन फोटो काढविला तेव्हां प्रमिलेनें समाधान झाल्याची मुलींच्या वतीनें ग्वाही दिली !

० ० ० ०

अशा रीतीनें स्वतांची हुशारी गाजवण्यांत प्रमिलेनें अनेक प्रसंगीं धन्यता मानली होती. त्या वर्षीच्या त्यांच्या इंग्रजी कवितेच्या उताऱ्यांच्या पुस्तकांत रॉबर्ट हेरिकची एक कविता होती. शिकविणारे प्रोफेसर मोठे रसिक होते. ही कविता शिकवितांना ते नानाप्रकारचा अभिनय करून ती शक्य तितकी रंगवून शिकविणार, अशी साऱ्यांचीच अपेक्षा होती. प्रमिलेनें साऱ्या मुलींना ती कविता चावटपणाची असल्याचें आपलें मत पटवून दिलें, आणि त्या कवितेच्या तासाला साऱ्याजणींना गैरहजर राहाण्यास लावलें होतें. गैरहजर राहाण्यास एवढेंच कारण नव्हतें. दोन दिवसांपूर्वी फळ्यावर या कवितेच्या शेवटच्या चार ओळी कुणीतरी लिहून ठेवल्या होत्या, आणि त्याच्याखालीं म्हटलें होतें:—" Left benchers, for your consideration please "—हेरिकच्या कवितेच्या त्या चार ओळी अशा होत्या:—

Then be not coy, but use your time,
And while ye may, go marry:
For having lost but once your prime
You may for ever tarry.

पण मुलींच्या या गैरहजर राहाण्यावर प्रोफेसरांनींच एका वाक्यांत मोठी मजेदार कोटी करून खूप हशा पिकविला ! ती बातमी व तें वाक्य ऐकून प्रमिलेनें कडकडून संताप व्यक्त केला होता, पण तो फक्त मुलींच्या वसतीगृहाच्या आवारांतच ! प्रोफेसरांनीं म्हटलें होतें, " They seem to have taken it quite seriously, " आणि तें वाक्य उच्चारल्याबरोबर जीभ किंचित् चावून आणि डोळे मिचकावून त्यांनीं म्हटलें, "not taken it, but taken to it !" हसणाऱ्या साऱ्या मुलांबद्दल प्रमिलेनें अढी बाळगण्याचें ठरविलें होतें. आणि त्याप्रमाणें विद्यार्थ्यांच्या कोणत्याही सभासंमेलनांतून ती आणि तिच्या मैत्रिणी यांनीं मुळींच भाग घेतला नाहीं.

० ० ० ०

अशी तिच्या मनाची आजपर्यंत वाढ होत आली होती. लोणावळ्याच्या मुक्कामांत कोणीतरी पुरुषमाणूस सोबतीला असावें अशी कल्पना नानांनीं बोलून दाखविली, तेव्हां प्रमिलेनें त्या कल्पनेचा निषेध केला. आणि म्हणूनच मागें सांगितल्याप्रमाणें ती आईबरोबर लोणावळ्यास येऊन राहिली होती. पण आई बेशुद्ध पडण्याचा तो प्रकार झाल्याचें जेव्हां तिनें नानांना कळविलें तेव्हां त्यांनीं आईच्या माहेरकडचा एक गरीब, अर्धवट शिकलेला, पण तरतरीत असा मुलगा लोणावळ्यास पाठवून दिला. तो आईचा मावसभाऊ होता. तो आल्यानें प्रमिलेची काळजी कमी झाली, आणि लोणावळ्यांत इकडे तिकडे हिंडण्यास तिला अवसर मिळूं लागला. वेळ जाण्याकरतां तिला पुस्तकें वाचण्याची जरूर पडूं लागली तेव्हां साहजिकच त्या रात्रीच्या ओळखीचें निमित्त करून ती दादासाहेबांकडे गेली आणि आगरकरांच्या लेखसंग्रहाचें पुस्तक तिनें त्यांच्याकडून वाचावयास आणलें.

० ९ ० ०

वाचावयास आणलेलीं पुस्तकें त्या दिवशीं संध्याकाळीं परत करावयाचीं होतीं, म्हणून प्रमिला दादासाहेबांच्या खोलींत गेली. मे महिन्यांतील स्वच्छ सूर्यप्रकाशाची ती संध्याकाळ होती, लोणावळ्यांतील नागमोडी वळणाच्या तांबडया निरुंद रस्त्यावर पडलेलीं सूर्याचीं लांबचलांब सोनेरी किरणें रस्त्यावरील तांबडया मातीवर पडून त्या मातींतील तेलकटपणाला अधिकच तकाकी आणीत होतीं. संध्याकाळच्या वाऱ्याच्या मंदमंद लहरींत रस्त्याच्या दुतर्फा असणारीं झाडें एकमेकांकडे लवून समोरच्या झाडांना स्पर्श करण्याचा प्रयत्न करीत होतीं. डोंगरांच्या कडावरून उनाचे कवडसे पडले होते. डोंगरांच्या उतरणीवरील ठिकठिकाणीं वाळून गेलेल्या गवताचे पट्टे सूर्यकिरणांच्या मिश्रणानें रंगीबेरंगी दिसत होते. दादासाहेबांच्या खोलींतून हा देखावा दृष्टीस पडत होता. पुस्तकें परत दिल्यावर प्रमिला दादासाहेबांच्या आग्रहावरून तेथें बसली, तेव्हां तिचीही दृष्टि या साऱ्या देखाव्याकडे गेली. सहजच तिच्या तोंडून उद्गार निघाले,

" किती छान आहे नाहीं ही वेळ ! फिरायला जायला फार चांगली आहे. "

दादासाहेबांनीं उत्तर केलें, " यायचं आहे कां फिरायला ? आज सुट्टी असल्यामुळें मी सारा दिवस घरांतच बसलों होतों. लिहून लिहून कंटाळा आला अगदीं. "

" काय लिहीत होतां इतकं ? "

" रामदासांवर एक प्रबंध लिहितों आहें मी. रामदासांचा मनोविकास ध्यानांत घेऊन मी त्यांच्या वाङ्मयाचें समालोचन करतों आहे. "

" बरं बाई साधतं तुम्हांला त्याह्यचं. आम्ही भाषाविषय घेतला असून आम्हाला जमतच नाहीं कांहीं. कधींकधीं मनांत आलं तरी हातून होत नाहीं. "

" मग हेंच तुम्ही कांहीं न लिहिण्याचं कारण असेल. आणि शिवाय आपलं लिहिणं वाचकांना वेडयासारखं वाटेल अशी जी भीति वाटते, ती खरं म्हणजे चुकीची असते. आमचे वासुदेवराव पटवर्धन नेहमीं आपल्या विद्यार्थ्यांना सांगत असत कीं, ' थोडे वेडे व्हा, वेडे ! ' वासुदेवरावांनींच खरं म्हणजे माझ्याठिकाणीं असल्या व्यासंगाची प्रेरणा केली ! वासुदेवरावांना आगरकरांचा फार अभिमान. त्यांच्या सान्निध्यांत मला आगरकरांच्या कार्याबद्दल आदर वाटूं लागला. वासुदेवरावांनीं मला एकदां एका मे महिन्यांत आगरकरांवरील टिपणें करून घेण्याकरितां मला स्वतच्या घरीं ठेवून घेतलें होतें. आगरकरांचें चरित्र लिहावयाला उपयुक्त होईल अशी पुष्कळ सामग्री माझ्याजवळ आहे. शिवाय कुणाकडून आगरकरांच्या आठवणी मिळतील त्यासंबंधानेंही वासुदेवरावांनीं मला माहिती दिली होती. सीतारामपंत देवधर, विनायकराव जोशी, भाऊसाहेब लेले, अकोल्याचे दादासाहेब महाजनी इत्यादि अनेक लोकांकडून त्यांनीं मला आठवणी जमवायला लावलं होतं. माझ्या संग्रहीं आहे ती चरित्राची सामग्री सहज कुणालाही उपयोगीं पडेल ! सध्यां तरी निदान मी आगरकरांवर कांहीं लिहीत नाहीं. माझं मन गुंतलं आहे खरं माझ्या दीर्घ प्रबंधाकडे ! " कालिदासकालीन समाज " या विषयांवर मी प्रबंध लिहितों आहे. असहकारितेसारख्या चळवळींत कॉलेजची धरसोड केल्यामुळें माझं करीअर पार गेलं आहे. मला बी. ए. त सेकंडक्लासही मिळाला नाहीं. तेव्हां पी. एच्. डी. साठीं हा कोर्सच कुठं परदेशांत घेऊन जाण्याचा विचार आहे. सारे संकल्प आहेत. पैसा मिळण्यावर हें जमायचं. नाहीतर जाग्यावरच पडून राहिलं पाहिजे ! "

ओढ घेणाऱ्या नदीच्या पाण्यांत एकादें वस्त्र जसें आपोआप वाहून जावें तसें संभाषणाच्या ओघांत दुसऱ्याचें मन ओढून घेण्याची शक्ति दादासाहेबांच्या वाणींत होती ! भावनाप्रधान मनावर पकड बसविण्याची कला त्यांनीं असहकारितेच्या काळांत जाहीर सभांतून भाषणें करून पैदा केली होती. आणि ती त्यांना हल्लीं खासगी संभाषणांतूनही उपयोगीं पडूं लागली होती !

" आमचे नाना सारखे माझ्यामागें लागले आहेत कीं तूं कांहींतरी पुस्तक लिही. भरीला त्यांना बातमी लागली आहे कीं, दोनतीन वर्षांतच केव्हांतरी युनिव्हर्सिटी परमानंद बक्षिसाकरितां आगरकरांच्या चरित्राचें आणि वाङ्मयाचें विवेचन करणारा दोनशे पानांचा निबंध मागविणार आहे. असला विषय नानांना कळल्यावर नाना कुठले गप्प बसायला. त्यांनीं अलीकडे आगरकरांची माहिती सांगण्याचा मधून मधून सपाटा चालविला आहे. काय तर म्हणे, आगरकर शनिवारांतील त्यावेळच्या होळकर वाड्यांतील कॉलेजांत शिकविण्याकरितां तट्टावरून जात ! '

तें ऐकून दादासाहेबांनीं आश्चर्यानें म्हटलें, " अरे, बरीच दिसते आहे तुमच्या नानांना माहिती ! माझ्या संग्रहांतल्या गोष्टींत ही माहिती नाहीं. मग खरोखरच तुम्ही लिहा आगरकराचं चरित्र ! '

' चरित्र लिहिण्याचं एक असूं द्या. पण जातें मी आतां ! आई वाट पाहात असेल. '

' वः तुम्ही मघांशी फिरायला येणार होतां ना माझ्या बरोबर ? '

"आज नको आतां. जाऊं आपण पुन्हां कधीं तरी. आतां आणखी दीड महिना आम्ही इथंच राहाणार आहों. येतें हं मी ! '

× × ×

काय असेल ते असो पण स्वतांमध्यें होणाऱ्या एका विचित्र बदलाचें प्रमिलेला स्वतांलाच राहून राहून आश्चर्य वाटूं लागलें. दादासाहेबांची खोली, ती राहात होती त्या बंगल्याच्या मागल्या व्हरांड्यांतून दिसत असे. त्या व्हरांड्यांत कामाच्या निमित्तानें किंवा कित्येक वेळां काम नसतांनाही ती आतां वरचेवर येऊं लागली. त्या पडवीसमोर वास्तविक केवढा तरी मोठा भूप्रदेश पसरलेला डोळ्यांना दिसत असे. पण प्रमिलेची दृष्टि मात्र नेमकी त्या खिडकीकडे जात असे. रात्रींच्यावेळीं त्या खिडकींतून दिव्याचा प्रकाश दिसे. त्या प्रकाशांत एका मेजाशीं बसून लिहीत

किंवा वाचीत असलेली दादासाहेबांची मूर्ति अर्धवट दृष्टीला पडे. त्या अंधारत्या दिसणाऱ्या मूर्तीकडे पाहिल्याशिवाय प्रमिलेचें पाऊल त्या पडवीतून निघत नसे. कित्येकवेळां अपरात्रीं देखील ती त्या पडवींत येऊन जाऊं लागली. वास्तविक त्या ओसाड जागेंत उघडयावर येण्याची अपरात्रीं कुणालाही भीति वाटावी ! पण प्रमिलेच्या मनाला भीतीचा स्पर्श होण्यापूर्वीच तें त्या दूर दिसणाऱ्या खोलीशीं किंवा त्या खोलीच्या खिडकींतून अस्पष्टपणें दिसणाऱ्या एखाद्या वस्तूशीं चाळा करण्यांत गुंग होऊन गेलेलें असे ! कित्येकवेळां माळयाला सहज विचारल्यासारखें दाखवून ती दादासाहेबांबद्दल बारीकसारीक हालचालींचीही उगीच माहिती मिळवूं लागली. एकदां आईकरितां केलेलें टोमॅटोचें सूप फार चांगलें झालें होतें, म्हणून तिनें माळयाबरोबर एका पेल्यांत दादासाहेबांकडे पाठविलें. पण त्यांनीं आपलें नुकतेंच जेवण झालें आहे, असें सांगून तें परत पाठविलें. त्यामुळें तिचा किती तरी हिरमोड झाला ! पण पुढें एके प्रसंगीं पुस्तकाच्या देवाण घेवाणीच्या निमित्तानें गांठ पडली असतां दादासाहेबांनीं मोहक शब्दांनीं त्या सूपबद्दल प्रमिलेचे आभार मानले, इतकेंच नव्हे, तर तो पदार्थ आपल्या फार आवडीचा असूनही केवळ नाइलाजानें आपल्याला परत पाठवावा लागला त्याबद्दल हळहळ व्यक्त केली, तेव्हां तिला कांहीं अनिर्वचनीय आनंद वाटला !

× × ×

माणसाचें मन हें लहान मुलाच्या मनासारखें असतें, याची प्रचीति प्रमिलेला हळुहळू येऊं लागली. प्रथमच दृष्टीस पडणाऱ्या वस्तूबद्दल हव्यास धरण्याची जशी बालमनाची प्रवृत्ति असते, तशी मोठया माणसांच्या मनालाही अगदीं नव्यानेंच पहावयास मिळणाऱ्या व्यक्तीचें आकर्षण मानीत राहाण्याची एक स्थिति येत असते. प्रमिलेनें आजपर्यंत पुरुषाशीं मैत्री करण्याचें टाळलें होतें ! पण तिच्या आयुष्यांत तिच्या असाहाय्य स्थितींत तिला मदत करण्याकरितां धाव घेणाऱ्या पहिल्याच पुरुषानें तिच्या मनावर जबरदस्त मोहिनी घातली ! सर्कशींतील अस्वलांना

नाचावयास यावें म्हणून आरंभीं तापलेल्या वाळूवर उभें करतात. पायाला चटके बसून तीं आपोआपच पाय उचलूं लागतात, आणि त्यांतूनच त्यांना नृत्यकौशल्य पैदा करतां येईल अशी योजना करतात! परिस्थितीच्या आंचेनें किंवा कांचानें एकाद्या माणसानें एकादी गोष्ट सहज करावी आणि मग नित्यशः ती गोष्ट करीत राहाण्याचा क्रम त्याच्या अंगवळणी पडावा हा प्रकारही या अस्वलांच्या नाचासारखाच नाहीं कां? आईच्या बेशुद्धावस्थेच्या प्रसंगीं दादासाहेबांचें सहाय्य घेण्याकरितां त्यांच्या खोलीकडे पावलें वळविणारीं प्रमिला या सर्कशींतील अस्वलांप्रमाणें तीं पावलें नित्यशः तिकडे वळविण्याचा तोच तोच चाळा घेऊन बसली!

× × ×

त्या दिवशीं संध्याकाळीं प्रमिला व दादासाहेब दोघेहीजण समोरच्या डोंगरावरच्या एका प्रशस्त पठारावर बसलीं होतीं. समोर सारें गांव पसरलें होतें आणि गांवाच्या पलीकडच्या बाजूला वळवंड धरणाचा विस्तीर्ण जलाशय मावळत्या सूर्याच्या तेजस्वी किरणांनीं चमकत होता. गोकुळअष्टमीच्या दिवशीं लहानशा लाकडी पाटावर मातीचें गोकुळ करतात, तसा साऱ्या गांवाचा देखावा त्या पठारावरून दिसत होता. ठिकठिकाणचे बंगले आणि गांवांतलीं घरें हीं त्या गोकुळासारखीं चिमुकलीं दिसत होतीं, आणि पलीकडल्या धरणाचा पट्टा त्या गोकुळाच्या सान्निध्यांत वाहणाऱ्या यमुनेसारखा भासत होता! सारे आकाश निरभ्र होतें. भांगारवाडींतील बंगले समुद्रकिनाऱ्याला लागलेल्या लहानलहान तुरळक तारवांसारखे दिसत होते!

त्या दिवशीं दुपारीं प्रमिलेनें दादासाहेबांकडून रवींद्रनाथ टागोरांचा शाकुंतलावरील लेख वाचून परत केला होता. त्या लेखांतील उदात्त कल्पनांचा कैफ अद्यापही त्या दोघांच्या मनांत भरून राहिला होता. अंधारामध्यें चालतांना डोळ्यांपुढें एकदम लखलखीत वीज क्षणार्ध चमकून जावी, तसें असल्या प्रकारचे लेख वाचल्यावर सामान्य वाचकाचें होतें. अगदीं लाचार जीवनक्रमाची वाटचाल करणाऱ्या वाचकाला एक

तेजस्वी प्रकाश अंतर्दृष्टीसमोर चमकून गेल्याचा भास होतो. समोर दिसणाऱ्या वळवंड धरणाच्या तलावांत जणूं त्या तेजस्वी प्रकाशाचें प्रतिबिंब पडलें होतें, त्याकडे टक लावून पाहात प्रमिलेनें म्हटलें,

"शाकुंतलाच्या कल्पनेवरच टागोरांनीं अगदीं नवीन प्रकाश पाडला आहे नाहीं? त्या प्रकाशांत शाकुंतलाचं एक अवर्णनीय स्वरूप स्पष्ट झाल्यासारखं वाटतं!"

"पण तो प्रकाश साऱ्या वाचकांना नेहमींच उपयोगीं पडतो असं नाहीं!"

"सामान्य वाचकांची दृष्टी दुष्यन्तानं केलेल्या प्रणयक्रीडेच्या पलीकडे जातच नाहीं, म्हणून या प्रकाशाचा उपयोग त्याला करून घेतां येत नाहीं."

"पण त्या दुष्यन्ताच्या प्रणयक्रीडेलाही महत्त्व आहे. किंबहुना साऱ्या नाटकाचं मुख्य मळसूत्रच तें आहे. दुष्यन्तानं प्रणयक्रीडा केली नसती तर कण्वाला शकुंतलेला सासरीं पाठविण्याचा प्रसंगच आला नसता, आणि कालिदासाच्या हातून चौथ्या अंकाची अशी अनुपम रचना झाली नसती. आणि या प्रणयक्रीडेच्या मुळाशींही मानसशास्त्र आहे.

माणसाचं मन कांहीं एकरंगचि असत नाहीं. मला तर नेहमीं माणसाच्या मनाला इंद्र धनुष्याची उपमा द्यावीशी वाटते. त्याच्या मनाचे हे निरानिराळे रंग आपल्याच समानधर्मी रंगांचा इतर व्यक्तींच्या ठिकाणीं एकसारखा शोध घेत असतात! आणि त्याला भिन्नभिन्न व्यक्तींच्या ठिकाणीं एकेक असा समानधर्मी रंग समरस होण्याकरितां लाभतो. एक पुरुष अनेक स्त्रियांवर प्रीती करतो किंवा एक स्त्री अनेक पुरुषाशीं मैत्री करते, त्याचं मूळ या रंगसाम्य शोधींत समरस होण्याच्या प्रवृत्तींत आहे!"

"म्हणजे मग दुष्यन्ताचा जनानखाना सप्तरंगी इंद्रधनुष्याचा खेळ होता असंच म्हणायचं ना?"

"हो. कांहीं अंशीं असंच म्हटलं पाहिजे. पुरुष हा बहुस्त्रीक असतो. त्याचं कारण ही समरसता शोधण्याची लालसा असते हें कांहीं खोटं नाहीं. आजच्याही समाजांत तुम्ही पहा, अशिक्षित स्त्रियांशी लग्न झालेले पुरुष शिक्षित स्त्रियांशीं प्रेमप्रसंग निर्माण होऊं देतात! हे रंगच मुळीं निरनिराळे आहेत. शारिरीक आसक्ति ही ज्या ठिकाणीं जडेल त्याच ठिकाणीं मानसिक आसक्ति जडेल असं नाहीं. मनुष्याला विनोद हवा, शृंगार हवा, बुद्धीशीं क्रीडा करायलाही हवी. साऱ्या गोष्टी हव्यात पण त्या कधीं कधीं हव्यात. यांतली एकेक चोवीस तास करीत बसण्याइतकं मन खुळं नसतं. त्याचा आजच्या काळांत फार विकास झालेला आहे. म्हणून ही एकेक गोष्ट उत्कटपणानें ज्या ठिकाणीं ज्या ज्या वेळीं हातीं लागेल, तिकडे त्या त्या वेळीं धांव घेण्याची मनाची वृत्ती असते!"

हे विचार प्रमिलेला फारच चमत्कारिक वाटले! शाकुंतलाच्या वातावरणांतून आजच्या पुरुषांच्या चालीरीतीवर उडी घेण्यास तिचें मन तयार नव्हतें. दुष्यन्ताचा काळ वेगळा, आजचा काळ वेगळा! आजचे पुरुष.........आणि अशा रीतीनें तिनें जन्मापासून आजपर्यंत ज्या पुरुष तिरस्काराची स्वतांच्या मनाला संवय जडवून घेतली होती, ती वर उसळून आली. तरीही शेजारीं बसलेल्या दादासाहेबांकडे दृष्टी जाऊन तिला वाटत होतें, 'छे. आपण मानीत होतों तशी पुरुषजात कांहीं तिरस्करणीय नाहीं. पुरुषाच्याही सहवासांत जीवनाची एक वेगळीच बाजू अनुभवायला मिळते.'

अशा परस्परविरोधी विचारांनीं मनाचा गोंधळ उडाला असतांना तिनें घरीं चलण्याविषयीं दादासाहेबांना सूचना केली.

आणि एका अवघड उतरणीवरून उतरत असतांना अकल्पितपणें तिचा पाय निसटला आणि सांवरण्याचा स्वतांकडून तिनें खूप प्रयत्न चालविला असतांही ती वेडीवांकडीं घसरून पडली. उतरणीवरून झपाट्यानें उतरून गेलेल्या दादासाहेबांनीं मागें झालेल्या आवाजामुळें चमकून

पाहिलें, तों प्रमिला घसरून पडली होती. तिच्याजवळ धावत येऊन त्यांनीं तिला हात देऊन उठविलें. ती उभी राहिली तरी तिला सांवरून धरण्या करितां दादासाहेबांनीं तिच्या पाठीभोंवतीं कमरेलगत आपल्या डाव्या हाताचा विळखा घातला होता ! आणि उजव्या हातानें ते तिच्या अंगा वरची माती झाडण्यांत आणि वाळलेल्या गवताची काळी कुसळें काढण्यांत तिला मदत करीत होते. एकदोन ठिकाणीं खरचटण्याशिवाय प्रमिलेला कुठें फारसें लागलें नव्हतें. तरीहि तिचें सारें शरीर थरथरत होतें.

"।किती कांपतां आहां तुम्ही ? बायका भित्र्या हेंच खरं !" दादासाहेबांनीं हंसत हंसत म्हटलें.

माझं कांपणं हें कांहीं भीतीचं नाहीं. स्नायूंच्यावरचा ताबा कमी झाला म्हणजे ते अपोआपच असे थरथरतात, आणि त्यामुळं शरीर कांपल्यासारखं वाटतं !"

पण असें उत्तर देऊनही आपल्या थरथरत्या पायांना आधाराशिवाय पाऊल पुढें टाकण्याचें बळ नाहीं, याची जाणीव मनांत जागी असल्यामुळें तिचें तिलाच हसूं येत होतें !

कांहीं वेळ ती दादासाहेबांच्या आधारानेंच उतरली. त्या स्पर्शानें तिच्या मनाला आजपर्यंत न अनुभवलेल्या एका विचित्र मोहाचें ओझरतें आंदोलन बसलें. किंबहुना तिच्या मोहव्याप्त मनांत वेड्यासारखी अशीही एक कल्पना चमकून गेली कीं, या लोणावळ्याच्या मातींतच माणसाला असले विचित्र अनुभव आणून देण्याचा गुण असावा ! त्यादिवशीं, ती घरीं आपल्या बिछान्यावर रात्रीं पडली असतांना झोपेच्या अर्धवट गुंगीत तिला आपले पाय लटपटत असल्याचा वारंवार भास होत होता, आणि कुणाचा तरी आधार घेण्याकरितां आपण आपले हात पुढें करीत आहों असें वाटत होतें !

× × ×

लोणावळ्याहून ही मंडळी हालण्यापूर्वी नाना शेवटचे पंधरा दिवस लोणावळ्यास आले होते. त्यांची आणि दादासाहेबांची ओळख आगरकरांच्या चरित्राची सामुग्री जमविण्याच्या निमित्तानें अनायासानेंच जुळून आली. त्यांनीं एकें रात्रीं केलेल्या मदतीबद्दल नानांनाही त्यांच्याबद्दल थोडीफार आपुलकी वाटूं लागली ! बोलण्याच्या ओघांत एकदां दादासाहेबांचें लग्न झालें असून त्यांना दोन मुलेंही आहेत हें जेव्हां नानांनीं ऐकलें तेव्हां त्यांना त्यांच्याशीं घरोबा वाढविण्यास कांही हरकत आहे असें वाटेनासें झालें. त्यांच्याकडून प्रमिला पुस्तकें आणीत असे त्यावरून दादासाहेबांची अभिरुचि, गृहस्थाला साजेशीं असल्याचा नानांना प्रत्यय येत गेला. असहकारितेसारख्या सार्वजनिक चळवळींत पडलेल्या सुबुद्ध माणसाला सामान्य लोकांना आश्चर्य वाटावयास लावणारा जो एक मजेदार बहुश्रुतपणा येण्याचा संभव असतो, तो दादासाहेबांच्या ठिकाणीं चांगल्यारीतीनें वेळोवेळीं व्यक्त झाल्यामुळे नानांनाहीं त्यांबद्दल बरेंच कौतुक वाटूं लागलें. विवाहित माणसाशीं प्रमिलेचें थोडेसें संघटन असलें तरी कांहीं फारसें बिघडत नाहीं असे मानून नानांनीं त्या दोघांचा स्नेह वाढूं दिला. शिवाय त्यांच्या इच्छेप्रमाणें प्रमिलेला आगरकरचरित्र लिहिण्यास खूप मदत करणारा माणूस दादासाहेबांच्या निमित्तानें भेटला, या सूक्ष्म आनंदानें त्यांना हा मैत्रीचा योग इष्टच वाटला !

× × ×

सारी मंडळी पुण्यास गेली आणि दादासाहेब लोणावळ्यास आपल्या विद्यालयाचे नित्याचे काम करीत राहिले. आगरकरचरित्र लिहिण्याच्या कामीं प्रमिलेला त्यांनीं मदत करावी असें नानांनींच त्यांना आग्रहानें वरचेवर सांगितल्यामुळें त्यांनीं मधूनमधून पुण्यास जाऊन प्रमिलेची गांठ घ्यावी असें त्यांचें आणि प्रमिलेचें ठरलें होतें. परमानंद बक्षिस युनिव्हर्सिटीकडून ठेवलें जावो किंवा न जावो, पण आपला आणि आगरकरांचा जो स्नेहसंबंध आला त्याचें स्मारक म्हणून आपल्या मुलीकडून असें चरित्र लिहिलें जावें असें त्यांना वारंवार वाटूं लागलें. स्वतां

नानांनीं लिहिण्याची कला साध्य करुन घेण्याचा कधीं प्रयत्न केला नाहीं. शिवाय त्यांनीं एकदां सुधारकांत 'शिमग्यावर' एक लेख लिहिला. त्यानें सुधारकाच्या संपादकावर अब्रुनुकसानीचा खटला होऊन त्याला त्यांत माफी मागण्याचा प्रसंग आला, त्यामुळें नानांच्या मनानें लेखनासंबंधांत जो एकदां धाक बाळगला तो कायमचाच !

× × ×

पुण्यास अनेकवेळां गांठी पडून अलीकडे त्यांचें संघटन फार वाढलें! एकदा पांचगणीला हिंदु हायस्कूलच्या चालकांनीं पुण्यामुंबईकडच्या कांहीं लोकांचे एक संमेलन भरविलें. आपण चालविलेली शाळा लोकांच्या पाहाण्यांत यावी असा चालकांचा हेतु होता. त्या हेतूप्रमाणें अनेकानां निमंत्रणें गेलीं होतीं. दादासाहेबानाही निमंत्रण होतें. प्रमिलेला आग्रह करुन त्यानीं आपल्याबरोबर गेलें. त्यावर्षी प्रमिलेची बी. ए. ची परीक्षा होऊन गेली होती. ती मोकळी होती. मे महिन्यांत जाग्यावरच राहाण्यापेक्षां कुठेंतरी परक्या गांवीं जाऊन यावें असें तिलाहि वाटत होतें. पांचगणीला अनेक लोक आले होते. वाङमय, शिक्षण, राजकारण, समाजकारण इत्यादींवर निरनिराळया विद्वानांचीं भाषणें होत असत. दादासाहेबांबरोबर म्हणून जरी प्रमिला गेली होती तरी घरांतून निघाल्यापासूनच तीं दोघेही एकमेकांपासून तुटकपणानें वागत होतीं. पांचगणीस तर स्त्रियांची व्यवस्था वेगळी असल्यामुळें दोघें बरोबर आली होतीं याचें कित्येकांना ज्ञानहि झालें नव्हतें !

पांचगणीसारख्या गांवांत इतकीं माणसें जमलीं असतांना त्या दोघांनाच एकत्र येऊन कुठें तरी दूर जाऊन बोलत बसणेंही अशक्य झालें. एका व्याख्यानानंतर ओझरती गांठ पडली असतांना दादासाहेबांनीं प्रमिलेला विचारलें, "महाबळेश्वरला यायचं आहे कां ? जाऊं या संध्याकाळीं. या माणसांच्या गजबजाटाचा अगदीं कंटाळा आला आहे. कुणाला न सांगतां जाऊं. नाहींतर आम्हींही महाबळेश्वर पाह्यला येतों म्हणून दहावीस लोकांचं लटांबर मागं लागेल !"

प्रमिलेला ही कल्पना आवडली. अनोळखी बायकांबरोबर औपचारिक बोलणींचालणीं करतांकरतां तिचें मन आंबून गेले होतें.

× × × ×

महाबळेश्वरच्या दवे हिंदु हॉटेलमध्यें त्यांना रात्रभर राहाण्याचा प्रसंग आला. कारण बॉम्बे पॅाइंट पाहण्याकरितां तीं दोघें गेलीं असतांना त्यांना मोटारच्या धक्क्यावर येण्यास थोडा उशीर झाला. त्यामुळें मोटार चुकली. आतां सकाळशिवाय मोटार मिळणे शक्य नव्हतें. दोघाच्याजवळ असलेल्या पैशांत दवे हॅाटेलमधील एका खोलींत राहाण्याचा खर्चही निभेल कीं नाहीं याची पंचाईत पडण्याचा प्रसंग होता. शेवटीं तीं दोघेंही त्या हॅाटेलमधील एका सिंगलरूममध्यें राहिली. मे महिना असल्यामुळें त्यांना कशीबशीच जागा मिळाली.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं दृष्टीस पडणारी सृष्टि ही प्रमिलेच्या दृष्टीला अजीबात नवीन वाटूं लागली. नाना, आई, कॉलेज, पांचगणीचें संमेलन या साऱ्या गोष्टी जणूं कुठल्यातरी वेगळयाच सृष्टींतल्या तिला भासूं लागल्या. सकाळीं तीं दोघें ज्या ठिकाणीं उभीं होतीं तेथून एका दरींत साचलेल्या धुक्याकडे पहातांना तिला वाटलें, ' खरंच, आपलं आतांपर्यंतचं आयुष्य हें सारं या धुक्यासारखं होतं. हें धुकं वाफेसारखें वरवर येऊन अदृश्य होतं आहे तशा मागल्या आयुष्यांतल्या साऱ्या गोष्टी उचंबळून आल्या आणि नाहींशा झाल्या. कालची उन्मादक रात्र हीच एवढी काय ती आपल्या आयुष्यांतला बिनधुक्याचा काळ दर्शविणारी ! '

* * S

पांचगणीच्या स्त्रीविभागांत प्रमिला नाहीं म्हणून त्या रात्रीं सर्वत्र हाहाःकार आला. पुरुष संख्येनें पुष्कळ असल्यामुळें आणि पुरुषाची जबाबदारी इतरांनीं मानण्याचें कारण नसल्यामुळें दादासाहेबाबद्दल कुणी चौकशीच केली नाहीं. पण प्रमिलेचीं मात्र साऱ्या पांचगणींत चौकशी झाली. पुण्याची नाना दीक्षितांची मुलगी म्हणून ती साऱ्यांच्या ओळखीची झाली होती, म्हणून नानांच्याकडेही तार करण्यांत आली.

* × S

दुसऱ्या दिवशीं सकाळीं दादासाहेब व प्रमिला परत आल्यावर साऱ्या लोकांना त्या दोघांचें अकस्मात नाहींसें होणें ही एक चर्चेची बाब झाली. प्रमिलेनें स्वतांच नानांना तार करून आपण महाबळेश्वरला जाऊन आल्याचा थोडक्यांत खुलासा केला. त्यामुळें नानांच्याकडून कुणी हालचाल करण्यांचें कारण पडलें नाहीं. पण पुण्याकडील नानांच्या ओळखीचीं माणसें पांचगणीहून परत आल्यावर नानांना सारा प्रकार समजला तेंव्हां त्यांना आश्चर्य आणि दुःख वाटल्याशिवाय राहिलीं नाहींत.

असल्या नाजुक गोष्टीसंबंधांतही त्यांनीं प्रमिलेशीं उघड भाषण करून तिच्याकडून साऱ्या प्रकाराचा खुलासा करून घेतला. नानांचें मन निश्चिंत झालें. तरीही दादासाहेबाचे आधीं लग्न झालें असल्याची आठवण करून द्यावयाला ते विसरले नाहींत ! यापुढें मात्र नाना त्या दोघांच्या गांठीभेटीसंबंधांत शंका दाखवूं लागले. एका संध्याकाळीं त्यांनीं आपली शंका स्पष्टपणें प्रमिलेला बोलून दाखविली. डोळयांत प्रमिलेनें पाणी आणून नानांना त्यांच्या इच्छेप्रमाणें त्यादिवशीं वचन दिलें कीं, " तुमच्या दखत तरी निदान तुम्हाला कमीपणा आणण्यासारखी गोष्ट मी करणार नाही. "

× × ×

पण प्रमिला मुंबईस नोकरीस आल्यापासून दादासाहेबही लोणावळें सोडून तिच्या मागोमाग आले. सरकारच्या मंजुरीच्या अभावीं त्यांना लोणावळयाचें आपलें विद्यालय बंद करावें लागलें. मुंबईच्या सागर मासिकाला एका बहुश्रुत संपादकाची जरूर होती. दादासाहेबांनीं तें संपादकत्व स्वीकारून मुंबईत प्रवेश केला आणि प्रमिलेशीं तुटणारे पाश अधिक दृढ केले. उतारावरून भरवेगानें घसरणाऱ्या गाडीप्रमाणें प्रमिलेचें मन घसरत चाललें होतें. घसरणीवर मागच्या पावलाचा वेग पुढल्या पावलाला वाढावा तसें तिचें होत होतें. त्यारात्रीं नीरेनें पाहिलेला प्रकार हेंही अशा उतरणीवरून घसरणारें एक पाऊलच होतें !

× × ×

पावसाची जोराची सर आल्यामुळें त्या दोघींना त्या खाडीच्य काठी बसणें शक्य नव्हतें. त्या दोघीही झपाट्यानें घराकडेच येण्यासाठीं निघाल्या. त्या रस्त्याला त्यावेळीं बससारखे किंवा ट्रॅमसारखे कोणतेंही वाहन वाहातूक करीत नसे. त्यामुळें त्या दादरला चालतच आल्या. रस्त्यानें परत येतांना त्या अक्षरही बोलल्या नाहींत. प्रियतम माणसाची उत्तरक्रिया करून स्मशानांतून परतणारे जिवलग स्नेही जसे स्तब्धपणानें चालतात तशा त्या चालत होत्या. प्रमिलेची हकिकत ऐकून नीरेला वाटत होतें, " आज आपण आपल्या अतिशय आवडत्या ध्येयरूप विचाराना तिलांजलि दिली ! "

ओलें लुगडें प्रमिलेनें बदलून जावें म्हणून नीरेनें तिला शिरीषकुमाराच्या घरीं आणलें. त्या घरांत गेल्या तेव्हां शिरीषकुमार आपल्या खोलींत दिलरुबा वाजवीत होते. मधुर आवाजांत ते गुणगुणत होते !

भारती जडा सुधीही मंदधी वने बिंबसवनें !



## प्रकरण १३ वें

# जगन्नाथाच्या आईचें रहस्य

बरीच रात्र होऊन गेली तरी जगन्नाथाच्या खोलींतून शिरीष-कुमार व नीरा यांना हलतांच आलें नाहीं. जगन्नाथाच्या आईचा आजार कमी न होतां दिवसेंदिवस वाढतच चालला होता. तापाचे पहिले कांहीं दिवस नीट उपचारयोजना न झाल्यामुळें दुखणें भलत्या थरावर गेलें, असें डॉक्टरांचें म्हणणें पडलें. रोग्याजवळ एकसारखें कोणीतरी बसून राहिलें पाहिजे असें डॉक्टरांनीं सांगितल्यामुळें जगन्नाथाला मोठा पेंच पडला होता. मधल्या संपाच्या वावटळीनंतर रजा घेण्याची प्रत्येक काम-गाराला भीति वाटत होती. एक तर जगन्नाथाच्या बाबतींत अशी रजा ताबडतोब मिळण्याची शक्यता नव्हती आणि दुसरें म्हणजे रजा घेतली तरी कामावरून कमी करण्याच्या रेल्वे अधिकाऱ्याच्या योजनेंत, कोणावर नोकरी सोडण्याची केव्हां पाळी आली असती याचा कांहीं नियम उरला नव्हता! दोन दिवसांपूर्वी जगन्नाथानें शिरीषकुमारांना ही अडचण सांगितली, तेव्हां त्यांनाही तिचें निराकरण करण्यासंबंधांत चटकन मार्ग सांपडेना. 'तुझ्याऐवजीं मीं रोग्याजवळ बसेन' असें म्हणणें किंवा म्हट-ल्याप्रमाणें वर्तन करणें शिरीषकुमारांना अवघड होतें अशांतला भाग नाहीं. पण स्वतां त्यांनीच मागें नीरेला लिहिलेल्या पत्रांत म्हटल्याप्रमाणें 'परिस्थिति' ही साऱ्यांचीच मालक होती आणि सारेचजण त्या मालकाचे मजूर होते! चार पांच ठिकाणच्या शिकवण्या करणाऱ्या शिरीषकुमारांना तरी मोकळीक कोठें होती? शिवलालनीं तर त्या दिवशीं शिरीषकुमारांची अनियमितपणाबद्दल थोडीशीं कानउघाडणी करण्याचाही प्रयत्न केला होता! इतरही ठिकाणीं शिक्षकाच्या शिकविण्याबद्दल कितीही कौतुकाचे उद्गार निघत असले, तरी त्याच्या अनियमितपणाबद्दल बारीकसारीक कुरबुरी चालू असत. असल्या कुरबुरींनीं शिरीषकुमारांना कित्येक वेळां मनस्वी वैताग येत

असे. आपल्या सोयीप्रमाणें शिकवणीच्या शिक्षकाला हमालाप्रमाणें वागविण्याची पालकांची पद्धति शिरीषकुमारांनीं यापूर्वी कितीदां तरी पाहिली होती! आज काय, विद्यार्थ्याचें डोकें दुखतें आहे, उद्यां काय, साऱ्या मंडळींना नाटकाला जायचें आहे आणि परवां काय, तर विद्यार्थी नातेवाइकांच्या येथील एका लग्नाला गेला आहे, असल्या सबबी वरचेवर ऐकण्याची त्यांना संवय होऊन गेली होती. पण आपलें आणि माईचें पोट भरण्यासाठीं आवश्यक तेवढे पैसे मिळविण्याकरितां त्यांना हा सारा मनस्ताप सहन करूनही शिकवण्या पत्करण्याशिवाय गत्यंतर नव्हतें. अकरा ते पांच, एकाद्या कचेरींत किंवा दुसऱ्या एखाद्या संस्थेंत बांधलेली नोकरी करण्यापेक्षा या शिकवण्या थोड्या बऱ्या होत्या एवढेंच! परवांच्या संपांत अटक झाल्यामुळें बराच वेळ मोडला होता, व शिकवण्यांना आधीच खंड पडला होता. अशा स्थितींत जगन्नाथाच्या आईची शुश्रूषा करण्याकरितां पुन्हां अनियमितपणा करणें जरी शक्य होतें, तरी इष्ट नव्हतें.

शिरीषकुमारांचा स्वभाव मुळांत जरी तापट आणि आवेशसुलभ होता तरी अलीकडे निरनिराळ्या प्रकारचे प्रत्यक्ष अनुभव येत गेल्यामुळें त्या स्वभावाला बराचसा मऊपणा आला होता. नवीनच पोहावयास शिकलेला माणूस पाण्यांत पडल्यावर हातापायांची वाजवीपेक्षां जास्त हालचाल करतो, तसें शिरीषकुमारांचें आरंभीं आरंभीं होत असे. अगदीं सामान्य गोष्टीसंबंधांतही मनाची जबरदस्त हालचाल करण्याची आणि साऱ्या भावनांचा अकारण खळबळाट उडवून देण्याची त्यांची प्रवृत्ति होती. पण आतां परिस्थितीच्या प्रवाहांतील त्यांची हालचाल एकाद्या सराईत पोहोणाराप्रमाणें झाली होती. प्रसंगाला अनुरूप अशीच मनाची चाळवाचाळव करून घेण्याचा त्यांना अभ्यास घडलेला होता. म्हणून आवेशाच्या उसळींत 'तूं बेलाशक घरीं रहा.' असें जगन्नाथाला सांगणें त्यांना शक्य झालें नाहीं, किंवा स्वतांही सारा उद्योग बाजूला सारून त्याच्या खोलींत राहाण्याचा उपक्रम करावा हें त्यांना इष्ट वाटलें नाहीं.

ओळखीच्या कामगारांच्या कांहीं स्त्रिया आळीपाळीनें जगन्नाथाच्या आईजवळ बसण्याकरितां येत असत. शिरीषकुमार आपलीं सारीं कामें म्हणजे शक्यतोंवर शिकवण्या संपवून जगन्नाथाच्या खोलींत हजर होता विशेषत: रात्रीच्या वस्तीला तर गेले दोनतीन दिवस ते येतच होते. जगन्नाथ कामावर जात असे, पण त्याचें लक्ष घरीं पडलेल्या आईकडे लागलेलें असे. अधूनमधून वेळ सांपडला म्हणजे तोही वरचेवर घरीं येऊन काय हवें नको तें विचारून जात असे. डॉक्टरांकडील औषधें, व बाजारांतील ताजीं मोसंबीं आणण्याचें काम शिरीषकुमारांनीं स्वतः आपण होऊनच पत्करलें होतें. पैशाच्या अडचणींमुळें जगन्नाथ या गोष्टीची न बोलतां हेळसांड करील अशी त्यांना खात्री होती. एकदां तर त्यांच्या मनांत जगन्नाथाच्या आईला हॉस्पिटलमध्यें ठेवण्याचेंही आलें होतें. पण हिंदुस्थानांतील रुग्णालयांचे चालक अद्यापहि आपल्या रुग्णालयांत गरीबांचा जो प्रवेश होऊं देतात तो सहानुभूतीच्या नांवाखालीं होऊं देतात ! वस्तुतः सरकारी दवाखान्यांतून कोणत्याहि व्यक्तीला विनामूल्य आश्रय देणें हें सरकारचें कर्तव्य आहे, आणि असा प्रवेश मिळविणें हा प्रत्येक व्यक्तीचा हक्क आहे, याची समाजाला अद्याप जाणीव झालेली नाहीं. ती तशी झाली म्हणजे कितीतरी अडचणी चटकन् नाहींशा होतील. हेंच पहा ना ! जगन्नाथाच्या आईला रुग्णालयांत ठेवणें हें सहज शक्य व्हावयास हवें होतें. पण त्याला अनेक अडचणी आल्या असत्या. रुग्णालयांत जाणाऱ्या गोरगरीबांना औषधपाणी मिळत नाहीं असें नाहीं. पण चोहोंकडे पडणाऱ्या पावसानें सृष्टीचा प्रत्येक भाग सजल झाला तरी सुफलित होतो का ? दवाखान्यांत प्रत्येकावर उपचारांची ठराविक प्रमाणांत वृष्टि झाली, तरी त्या वृष्टीनें रोग्याला कितपत मन:समाधान मिळतें हा एक प्रश्न उरतोच ! शिवाय जगन्नाथाची आई ही जुन्या चालीची बाई ! हॉस्पिटलमध्यें आपल्याला न्यावयाचें आहे या नुसत्या कल्पनेनेंच ती अर्धमेली झाली असती. म्हणून तो विचार शेवटीं रद्द करावा लागला. विषमानें तळमळत पडलेल्या त्या बाईला आराम वाटावा म्हणून सर्वांचे प्रयत्न चालू होते.

जगन्नाथाच्या त्या लहानशा खोलींत ती एका कोपऱ्यांत पडून राहिली होती. कष्ट, मनस्ताप आणि जरा यांनीं तिचें शरीर आधींच खाऊन टाकलें होतें. त्यामुळें विषमासारख्या रोगाला तिच्यावर मारा करण्यास फारसे प्रयास पडण्याचा संभव नव्हता. तिची शरीराची ठेवण मुळांतच सडपातळ होती. आतां तर ती अगदींच अस्थिपंजर झाली होती. तिच्या रूपाची कोणतीच स्वाभाविक छटा आतां तिच्या मुद्रेवर उरली नव्हती. नाहीं म्हणावयास तिचें डोळे मात्र विलक्षण तेजस्वी दिसत होते. इतक्या आजारीपणांतही ते डोळे ज्याच्यावर रोखले जात, त्याला त्यांच्या तेजानें क्षणमात्र दिपविलें नाहीं असें क्वचितच घडत असे. नीरेलाही तिच्या डोळयांच्या तेजस्वीपणानें थबकवून सोडलें होतें. तिन्हींसांजच्यावेळीं शिरीषकुमार व नीरा जेव्हां जगन्नाथाच्या खोलींत आली, तेव्हां तेथें एकच बाई तिच्या शेजारीं बसलेली होती. हीं दोघजण आलेली पाहून जगन्नाथाच्या आईनें चेहऱ्यावर विषण्ण हास्य आणून शिरीषकुमारांना जवळ बसण्याची खूण केली. तिच्या शेजारच्या सतरंजीवर शिरीषकुमार बसले. नीराही त्यांच्या शेजारीं बसली. बाजारांतून आणलेलीं ताजीं मोसंबी हातरुमालातून बाहेर काढून ठेवतां ठेवतां शिरीषकुमारांनीं विचारलें, " कसं काय वाटतं आहे आतां ? पुष्कळ बरं दिसतं आहे ! "

या प्रश्नाचें उत्तर न देतां तिनें एकदम हुंदका दिला, आणि कपाळाला हात लावला ! तिच्या तोंडासमोर वांकून शिरीषकुमारांनीं म्हटलें " हं, हं, असं नाहीं करायचं बरं का आतां. इतकीं सारीं माणसं धावपळ करताहेत तीं तुमचं बरं व्हावं म्हणूनच ना ? हीं पाहिलींत कां ताजीं मोसंबी. मी मुद्दाम येतांना आठवणींन आणलीं. म्हटलं शिल्लक असतील नसतील. आपलीं असलेलीं बरीं. आणि औषध घेण्याचं काय केलं ? घेतलं ना वेळच्या वेळीं ? औषध मात्र न चुकतां घेतलं पाहिजे बरं कां. प्रकृतीची हेळसांड केली म्हणून तर दुखणं आलं. नाहीं तर असं पडून राहावं लागलं नसतं ! आणि तुम्ही अशा रडायला लागला म्हणजे मग जगन्नाथाला काय वाटेल ?

या बोलण्याचा कांहींसा परिणाम झाला आणि तिनें डोळयांतून पाणी गाळण्याचें बंद केलें. शिरीषकुमार व नीरा यांनीं मग तिला औषध देण्याचा व मुसंब्याचा रस तयार करून ठेवण्याचा उद्योग आरंभला. त्यांच्या त्या तत्परतेनें काम करण्याच्या पद्धतीकडे पाहात जगन्नाथाच्या आईनें क्षीण आवाजांत म्हटलें,

"कशाला करतां आहां वरं इतकी खटपट माझ्यासाठीं? पिकलं पान आतां गळूनच पडलं पाहिजे. आमच्यासारखीं पिकलीं पानं गळून पडून जा नवा मोहर येईल त्यानं जगाची शोभा अधिक वाढेल, डिंक लावून गळणारी पानं फांदीला चिटकवीत बसणं आणि माझ्यासारख्या म्हातारीला औषध पाजून जगविण्याचा अट्टाहास करणं हें सारखंच आहे. या नीराताई पहा. परवांपासून दोन दिवस तुमच्याबरोबर त्या इथं येत आहेत. खरं म्हणजे इतका त्रास सोसून त्यांनीं हें कशाला करायल पाहिजे?"

त्यावर नीरेनें उत्तर केलें, "असं कसं म्हणतां? असली कामं आम्हीं करायची नाहीं तर आमचा उपयोग काय? आणि शिवाय तुमच्या सारख्या म्हाताऱ्या माणसांचा तरुणांकडून सेवा करून घेण्याचा हक्क आहे. आजपर्यंत तुम्ही काय कमी कष्ट भोगलेत? तुमचा जगन्नाथ एखादावेळीं तुम्ही कसा त्रास भोगला, तें सांगायला लागला म्हणजे त्याचा चेहरा असा कांहीं फुलून येतो!"

म्हातारीनें चटकन् मध्येंच म्हटलें, "माझ्या कष्टांचे पाढे वाचतांना त्याला अभिमान वाटतो आणि ऐकणाऱ्याला वाटतं कीं ही बाई अगदीं साध्वी असली पाहिजे. पण तुमच्यासारखीं माणसं असं मानून अशी सेवा करायला लागली म्हणजे माझी मलाच लाज वाटायला लागते, आणि जीव आंतल्याआंत कासावीस होतो. आमच्या खेडेगांवांतून एक विचित्र चाल आहे तिची मला अशा वेळेला मग राहून राहून आठवण होते. कांहीं वेल आणि फळभाज्या खूप फोफावून वाढाव्यात म्हणून त्यांच्या मुळाशीं मेलेलीं

कुत्रीं मांजरं पुरण्याची एक पद्धत आहे. त्या प्राण्यांच्या पोटांतील वायूंनीं झाडं वाढतात खूप, हें कांहीं खोटं नाहीं. पण पाहाणाराला बहरलेलें झाड तेवढं दिसतें. गरीब प्राण्यांच्या मरणानं तीं बहरतात हें मात्र समजत नाहीं. तसंच कितीतरी माणसांचं असतं. त्या माणसांनी जन्मभर केलेल्या कामगिरीचा बहर तेवढा दिसतो. पण तो बहर येण्यापूर्वी कोणकोणत्या भावनांचीं प्रेतं त्यांनीं त्या कामगिरीच्या खालीं पुरून टाकलेलीं आहेत त्याचा कुणाला पत्ताच लागत नाहीं. "

इतक्या आजारांत तिनें असें एकसारखें बडबडत राहाणें चांगलें नाहीं, म्हणून शिरीषकुमारांनीं तिला न बोलण्याची ताकीद दिली. त्या ताकिदीप्रमाणें कांहीं वेळ तिचें बोलणें थांबलें इतकेंच नव्हे तर अधून-मधून तिला तापाची ग्लानि येत असे तशी ग्लानीही आली. तिन्हीसांजा टळून गेल्या होत्या. त्या खोलींत अंधार पडून दिवा लावण्याची वास्तविक आवश्यकता वाटू लागली होती. तरीही जगन्नाथाच्या आईचा डोळा लागला होता. तो प्रकाशानें मोडेल असें वाटल्यामुळें शिरीषकुमारांनीं नीरा दिवा लावण्याकरितां उठली होती तरीही तिला तसें करूं दिलें नाहीं. मघां तीं दोघेंजणें आलीं, तेव्हां त्या म्हातारीजवळ बसलेली बाई थोड्याच वेळांत निघून गेली. कांहीतरी बोलावयास पाहिजे म्हणून नीरेनं म्हटलें, " या खोलींत मी गेले दोन दिवस येतें आहें, पण मागें आलं होतें त्या वेळच्यापेक्षां कांहींतरी बदल झाल्यासारखं वाटतं आहे. "

" उगीच भास असेल तुझा. या खोलींत बदल कसला होणार ? त्या वेळीं दोन भांडीं फुटकीं असतील तर आज भरीला आणखी चार भांडीं फुटलीं असतील ! या केरसुणीच्या बुरखुंडांतील दोनचार सोपटं त्यावेळच्या मानानं आतां कमी झालीं असतील. हा स्टोव्ह जास्त किटला असेल आणि भिंतीवरच्या काजळ्या अधिक काळवंडून गेल्या असतील ! कसला आणखी बदल होणार इथं ! भवभूतीनं वर्णन केलं आहे कीं, रामाला दंडकारण्य चौदा वर्षांनीं पुन्हां जाऊन पाहिल्यावर पार पालटून गेलेलं

दिसलं ! पण तें दंडकारण्य रामाचं होतं ! अश्वमेध यज्ञ करून सारं जग अंकित करणाऱ्या एका सम्राटाच्या सृष्टींतलि तें अरण्य होतं ! जीर्णारण्यासारख्या गरीबांच्या संसारांत कुठला बदल होणार ? जुन्या जीर्णशीर्ण वस्तूंची पडझड होऊन त्या ठिकाणीं नवीन वस्तूची स्थापना गरिबांना कल्पनेनेंही करतां येत नाहीं. बिचाऱ्यांची कल्पनाशक्तिही धाकदपटशा दाखवणाऱ्या जगानें नाहीशी करून टाकलेली असते. अगदीं एकान्तांतही या गरीबांना कसलाही मनोरथ करण्याची धास्ती वाटते. ही धास्ती नाहींशी करावयास पाहिजे."

"इथल्या बदलासंबंधानें मी जी बोललें तें या अर्थानें नव्हे."
"माझ्या डोक्यांत अलीकडे एकच अर्थ भिनून राहिल्यामुळें बाकीचे अर्थ लक्षांतच येत नाहींत. त्याला काय करणार ? कोणत्या अर्थानं बोललीस तूं ?"

"मी या खोलींत मागे एकदां आलें होतें तेव्हांच्या स्वरूपांत कांहीं बदल झालेला नाहीं, पण भिंतीवरचा एक फोटो नाहींसा झाल्याचें पाहून मला मोठें नवल वाटलें ?"

"त्यांत नवल वाटण्यासारखें काय आहे ? हजारो अडाणी लोकांची परंपरागत अंध भक्ति नाहींशीं व्हावी म्हणून एकीकडून टाहो फोडावयाचा, आणि तसल्याच अंधभक्तीला पुन्हां दुसरीकडून मदत करावयची, त्यांतलाच हा प्रकार नाहीं का ? शेंदूर फासलेले दगड त्यांना फेंकून द्यायला लावायचे आणि नवीन पुढाऱ्यांच्या प्रतिमांची त्यांना पूजा करायला शिकवायची हा निवळ फसवेगिरीचाच प्रकार नाहीं का ? असली फसवाफसवी मला करायची नाहीं, म्हणून मी माझ्या हातानें तो फोटो फाडून टाकला. पण तुझ्या दृष्टीनें वास्तविक या खोलींत तसा कांहींच फरक झालेला नाहीं. कारण असें पहा कीं, फोटो गेला तरी फोटोंतील व्यक्ति चालत्याबोलत्या अवस्थेंत तुझ्यासमोर उभी आहे. 'तुझें आहे तुजपाशीं, परि तूं जागा चुकलीसी;' असंच आतां तुला म्हणण्याची पाळी आली !"

इतक्यांत नुसतेंच लोटलेलें खोलीचें दार उघडून जगन्नाथ आंत आला. सर्वत्र अंधार असून शिरीषकुमार व नीरा दोघेही तशींच बसल्याचें पाहून त्याला आश्चर्य वाटलें, आणि तें व्यक्त करण्याकरितां हलक्या आवजांत त्यानें विचारलें, '

" म्हणजे दिव्यांत तेल नाहीं कीं काय ?"

आणि असें विचारांत असतां त्याच्या चेहऱ्यावर विषण्णता आली. आपल्या दिव्यांत तेल नसल्यमुळें या मंडळाना आपल्या खोलींत अंधारामध्यें बसून राहावें लागलें. किती हलगर्जीपणा हा आपला, असेंच जणूं काय त्याला वाटत होतें. त्याला असें खात्रीनें वाटणार हें चटकन् जाणून शिरीषकुमारांनीं त्याच्या प्रश्नांना उत्तर दिलें.

" छे छे. म्हातारीचा जरा डोळा लागला आहे. तिला त्रास होऊं नये म्हणून आम्हीं मुद्दामच दिवा लावला नाहीं. आतां लावायला कांहीं हरकत नाहीं. बराच वेळ झाला तिचा डोळा लागून. "

आणि आवाज अगदीं खालीं करीत जगन्नाथाजवळ जाऊन शिरीषकुमारांनीं म्हटलें, " जगन्नाथ, हे एकदोन दिवस फार जपलं पाहिजे बरं का. मुदतीच्या तापांत मुदतीचे ठराविक दिवस संपण्याच्या वेळेला फार फार काळजी घ्यावी लागत. थोडीशीसुद्धां हेळसांड करून चालायचं नाहीं. आणि हें रे काय आहे तुझ्या हातांत ?"

" आईनं आज दुपारीं म्हटलं होतं कीं इथल्या शिवेवरच्या अंबाबाईचा अंगारा आणि भागीरथीचं पाणी कुठून तरी मिळवून आण. एका ओळखीच्या ठिकाणीं हा गंगेचा कमंडलू मिळविला. तिनं आज दुपारीं अगदीं बजावून सांगितलं होतं म्हणून या गोष्टी मुद्दाम घेऊन आलों. "

" कांहीं बिघडत नाहीं तिच्या म्हणण्याप्रमाणं केलंस तरी. पण तेवढंच करून काम झालं असं मानूं नकोस. "

त्यांचीं हीं बोलणीं होऊन जगन्नाथ दिवा लावीत असतांनाच त्याची आई जागी झाली. तिच्याजवळ जाऊन बसतांबसतां जगन्नाथानें म्हटलें, "आई, तूं सांगितल्याप्रमाणं अंगारा आणि भागीरथी आणली आहे. घेतेस का आतांच ?"

जागृया झालेल्या म्हातारीनें आपल्या तेजस्वी नजरेनें सभोंवार पाहिलें, आणि नीरेला उद्देशून म्हटलें,

"तुम्ही इतक्या रात्रींच्या इथं कशाला बसून राहतां ? साऱ्यांनीं माझ्या जवळ बसून राहाण्यानं का माझं दुखणं कमी होणार आहे ? आणि आतां ही भागीरथी जगन्नाथानें आणली आहे, ती घेतली कीं मला आपो-आपच उतार पडेल. तुमचीं तीं औषधें पिऊनपिऊन माझं तोंड कसं अगदीं विटून गेलं आहे. ही भागीरथी तुमच्या या मोसंब्यांच्या रसापेक्षां जास्त गोड लागेल."

"मोसंब्यांचं काम भागीरथीनं भागत असलं तर रस काढण्याचा त्रास तरी कमी होईल," असें म्हणत म्हणत नीरेनें हसून म्हातारीकडे पाहिलें.

जगन्नाथ आपल्या आईला, त्या आणलेल्या वस्तूंचा उपयोग करून देण्यांत गुंतला असतांना तेथें बसण्याचें फारसें कारण नव्हतें, म्हणून "भारीच उकडतं आहे नाहीं आज ?" असें अर्धवट मनाशींच बोलत नीरा त्या खोलीलगत असलेल्या बाहेरच्या निरुंद गॅलरींत आली आणि तेथील लांकडी कठड्यावर आपल्या स्वस्तिकाकार हातांची आढी टेकवून समोर पहात उभी राहिली. बाहेर सर्वत्र अंधार होता. मुद्दाम रोखून पाहिल्याखेरीज सहजासहजीं दृष्टींत भरावी अशी कोणतीच वस्तू आस-पासच्या प्रदेशांत स्पष्टपणानें दिसत नव्हती.

तिच्या शेजारीं येऊन उभ्या राहिलल्या शिरीषकुमारांनीं विचारलें, "कसली शोभा पाहाते आहेस इथं उभी राहून ?"

" शोभा कसली पाहाणार ? कांहीं तरी करायचं म्हणून इथं येऊन उभी राहिलें."

" हें कांहीं तरी बोलते आहेस. परवांपासून मी पहातों आहे, तुझ्या मनांत कसला तरी विचार चाललेला दिसतोय. काल संध्याकाळीं मी घरीं आलों आणि तुझ्यासमोर किती वेळ तरी येऊन उभा राहिलों, तरी तुझं कशाकडे लक्षच नव्हतंसं दिसलं मला. आणि तूं त्यावेळेला काय करीत होतीस आठवतं तुला ? "

नीरेनें नुसतेंच आश्चर्यानें शिरीषकुमारांकडे पाहिलें. ती तशी पाहात असतांच शिरीषकुमारांनीं म्हटलें, " कालिदासाचा आधार घेऊन तुझ्या त्यावेळच्या स्थितीचं मी वर्णन केलं तर तूं त्याचा विपरीत अर्थ करशील म्हणून नाहीं करीत तुझं वर्णन ! "

या संदिग्ध बोलण्यानें नीरेची उत्कंठा उलट जास्तच वाढली. "कालिदासानं केलेलं वर्णन तुम्हांला माझ्या संबंधांत आठवलं म्हणजे खरोखरच आश्चर्य म्हटलं पाहिजे. कालिदासानं प्रत्यक्ष मला पाहून स्फूर्ति मिळविण्याचा प्रयत्न केला असता तर त्याची कवित्वशक्ति पार गारठून गेली असती ! पण ऐकूं या तर खरं, कोणतं वर्णन तुम्हाला आठवलं मला पाहून तें ? " त्यावर शिरीषकुमारांनीं सांगितलं, " मेघदूतांतल्या यक्षपत्नीचं वर्णन आहे तें. केवळ तुझ्या त्या वेळच्या शारीरिक हालचालीपुरतंच मी म्हणतो आहे हं. नाहीं तर अर्थाचा अनर्थ करशील. यक्षानं मेघाजवळ आपल्या पत्नीचं वर्णन करतांना म्हटलं आहे कीं तुला माझी पत्नी ओळखतां येणं फारसं अवघड पडणार नाहीं. अंगावरचें वस्त्र मळून गेलेलं आहे, पुढ्यांत हलुवारपणानं वीणा घेतलेली आहे, माझं नांव ज्यांत गोंवलेलं आहे असं मुद्दामच रचलेलं गीत म्हणण्याची मनाची तयारी केलेली आहे, पण त्या नांवाच्या आठवणीनं व्यथित झाल्यामुळें डोळ्यांतून पाणी गळत आहे आणि वीणेवर आपण कोणते सूर वाजविले याचं भान पार हरपून गेलं आहे अशा स्थितींत असलेली स्त्री माझी पत्नी म्हणून ओळखण्यास हरकत

नाहीं. हें जें वर्णन आहे, तें मला नेमकं काल आठवलं! मी किती वेळ तरी तिथं बाजूला उभा होतो. तुझ्यापुढं माझा दिलरुबा पडला होता. दिलरुबा वाजवायचा नाहीं न् नुसताच पुढं घेऊन बसायचं ही तुझी पद्धत मला मोठी मजेदार वाटली. मी मुद्दाम बराच वेळ वाट पाहिली. म्हटलं, तूं केव्हां तरी वाजवायला आरंभ करशील आणि कितीतरी दिवसांत तुझं गाणंवाजवणं ऐकायला मिळालं नाही तें ऐकायला मिळेल. त्यांत तर माझी निराशा झालीच, पण तुझी विषण्ण चर्या पाहून त्या निराशेंत भर पडली!"

वास्तविक शिरीषकुमारांच्या या भाषणांत नुसतें वस्तुस्थितीचें वर्णन होतें. पण तेवढ्यानेंही नीरेचें हृदय भरून आलें. त्या भरून आलेल्या हृदयाचे कढ तिच्या डोळ्यांत उसळून आले. अंधार होता म्हणून तिचे भरलेले डोळे शिरीषकुमारांना दिसणें शक्य झालें नाहीं. ती अगदीं निश्चल असल्याचें पाहून शिरीषकुमारांनीं पुन्हा म्हटलें.

"नसत्या गोष्टीची काळजी करून उगीचच मनस्ताप करून घेण्याची तुम्हां बायकांना फार संवय असते हं! त्यातलाच हा तुझा प्रकार दिसतोय. थोडासा कुठं मतभेद झाला, घरांतून इकडं तिकडं जाण्याचा प्रसंग आला कीं अंगावर डोंगर कोसळल्यासारखं कासावीस व्हायचं. काय झालं आहे त्यांत एवढं. हें असं चालायचंच.

"तुमचं पुरुषांचं एक ठीक असतं. पण जाऊं द्या. हा वाद कधी संपायचा नाहीं. कालपासून तुम्हांला एक गोष्ट विचारीन म्हणून म्हणतें आहें, पण जमलंच नाहीं विचारायला."

"कोणती ती गोष्ट?"

"बाबांचं परवां पत्र आलं आहे. त्यांत त्यांनीं लिहिलं आहे, उद्यां ते इथं येणार आहेत. सरदारगृहांत त्यांनीं मला भेटायला बोलावलं आहे. भेट व्हायलाच पाहिजे, असा त्यांनीं पत्रांत आग्रह व्यक्त केला आहे. काय करावं अशा गोंधळांत आहें मी."

"त्यांत गोंधळण्यासारखं काय आहे? तूं कांहीं चोरी करून घरांतून बाहेर पडली नाहींस. अनिष्ट गोष्ट आपल्या हातून घडली तर तोंड लपवावंसं वाटतं. यांत तूं अनिष्ट, अनाचाराचं असं काय केलं आहेस? प्रामाणिकपणानं मतभेद व्यक्त करणं हें पाप नाहीं. असला मतभेद व्यक्त केला म्हणजे कांहीं खून केलेल्या एखाद्या गुन्हेगारासारखं लपून बसायला नको."

"म्हणजे? त्यांना भेटायला जाऊं?"

"हो, काय हरकत आहे त्याला?"

"पण कसं जायचं? त्या ठिकाणीं त्यांनीं आग्रहानं पुन्हां आपलंच म्हणणं माझ्या मनावर बिंबविण्याचा प्रयत्न केला, तर काय करावं असं मनांत येऊन मनाचा मोठा गोंधळ उडतो."

"म्हणजे त्यांच्या त्या प्रयत्नाला यश येईल अशी तुला भीति वाटते आहे असंच म्हणेनास! त्यांच्या प्रयत्नांना यश येणं म्हणजे तुझ्या मनांत कोणत्याही प्रकारचा ठाम निर्णय केलेला नसणं, असंच नाहीं कां? असा विचारपूर्वक ठाम निर्णय करण्यापूर्वी कांहीं तरी आवेशाच्या भरांत तूं जर मुंबईला निघून आली असलीस तर नीट विचार करून आपला निर्णय दुरुस्त करून घेणें जरूर आहे, असं उलट तुला वाटलं पाहिजे. तसा तो बदलून घेण्याची ही आयती संधि चालून आलेली आहे. ती आपल्या फायद्यासाठींच आली आहे असं मानावं आणि तिचा उपयोग करून घ्यावा. असल्या बाबतींत विकारामुळें उत्पन्न होणारा खोटा अभिमान विसरायला शिकलं पाहिजे माणसानं."

"विकारामुळं उत्पन्न झालेला तात्पुरता अभिमान टाकून द्यायचा म्हणजे त्याच्याबरोबर साराच स्वाभिमान गळून जातो. सहज निःश्वास टाकावा आणि त्या बरोबर प्राणच निघून जावा तसं होतं अशावेळीं."

"शरीराचं चैतन्य दाखविणारा निःश्वास प्राण घेऊन जात नाहीं. तसा मनाचा खरा निश्चय दाखविण्याच्या प्रसंगीं कशालाच भिण्याचं कारण

उरत नाहीं. झाल्या गोष्टीचा पश्चाताप करण्याची पाळी येऊं नये इतका ठाम निश्चय करण्याची मनाची तयारी तरी असावी, किंवा पश्चातापाची पाळी आली तरीही कसलाच पश्चाताप न वाटण्याइतकं मन कणखर तरी असलं पाहिजे. मऊ मन हें दोन्ही बाबतींत मारक होतं. डळमळीत निश्चय उराशी बाळगीत बसण्याचा अभिमान उत्पन्न करण्याला त्याची मदत होते आणि विषाद वाटण्याच्यावेळीं त्या विषादाची तीव्रता वाढविण्यास त्याचं साहाय्यही होतं. काय जें करायचं तें आपल्या मनाच्या प्रवृती कोणत्या प्रकारच्या आहेत त्यांचा नीट अंदाज घेऊन कर. आहारविहारांत आपण कसा स्वतांच्या प्रकृतीचा अंदाज घेतों ! आयुष्यांतील हालचाली हाही एक मानवी मनाच्या आहारविहारांचा प्रकार आहे. म्हणून या हालचाली करतांना मनाला त्या कितपत मानवतील याचा विचार अवश्य करायला हवा. पण तूं वडिलांना भेटायला जा. त्यांत काय बिघडणार आहे ?"

"सारा निर्णय तुम्ही माझ्यावरच सोंपवावा म्हणून नाही मी तुम्हाला विचारलें ?"

आणि हा प्रश्न विचारतांना नीरेला स्वतःलाही आपल्या व्याकुळ अंतःकरणाची कल्पना आली. त्या अंतःकरणाची व्यथा दुसऱ्याला चटकन् समजूं नये याचेंही तिला दुःख झालें. शिरीषकुमारांना आपल्याला कांहीं तरी विचारावयाचें आहे पण तें काय विचारावयाचें आहे हें आपल्याला स्वतःलाच नीटसें जाणतां येत नाहीं. खरें म्हणजे आपण कांहीं न विचारतांच त्यांनीं एकदम आपल्याला काय पाहिजे तें चटकन् सांगून टाकावें असें तिला वाटत होतें. अशावेळीं मोठ्या माणसाचें मनही अगदीं लहान मुलांच्या मनासारखें होतें. लहान मुलाच्या कल्पनेनें वस्तूंचे रंग, आकार, व प्रमाणें हीं सर्व कांहीं वेगळींच ठरविलेलीं असतात. तीं प्रत्यक्ष सृष्टीहून भिन्न असतात. लहान मुलें आपल्या कल्पनेंत असलेल्या विशिष्ट रंगाबद्दल किंवा विशिष्ट प्रमाणाबद्दल हट्ट धरून उच्छाद आणतात. आपल्याला नक्की काय हवें तें त्यांनाही सांगतां येत नाहीं. आणि मोठ्या माणसांनाही त्याचा

उमज पडत नाहीं ! नीरेच्या आभासमय कल्पनेंत शिरीषकुमारांकडून एका विशिष्ट उत्तराची अपेक्षा उत्पन्न झाली होती. पण त्या उत्तरांची स्पष्ट कल्पना तिला बोलून दाखवितां येत नव्हती, आणि ती अपेक्षा बरोबर जाणून तिला नेमकें हवें तें उत्तर देणें शिरीषकुमारांनाही शक्य नव्हते.

इतक्यांत दाराशी येऊन जगन्नाथानें म्हटलें, "आईकडं जरा पाह्यलं पाहिजे. ती कासावीस झाल्यासारखं करते आहे !"

त्यामुळें सारींचजण आईजवळ गेली. शिरीषकुमारांनीं तिच्या हाता-पायांना स्पर्श करून पाहिला तों तें बरेच गार झाले होते. डॉक्टरांना आणण्याकरितां ते ताबडतोब बाहेर पडले. त्यांच्याबरोबर रस्त्यापर्यंत आलेल्या जगन्नाथाला त्यांनीं म्हटलें, "तूं आईजवळ बस. तिचे हातपाय जरा विटकराच्या टोल्यानं शेक. मी ताबडतोब डॉक्टरांना घेऊन येतों."

डॉक्टरांनीं आवश्यक ते उपचार केले. रोग्याला स्वस्थ झोप लागली तरी घाबरण्याचें कांहीं कारण नाहीं, असें सांगून डॉक्टर निघूनही गेले, आणि डॉक्टरांनीं म्हटल्याप्रमाणें खरोखरच रोग्याचा डोळा लागला.

सर्व स्थिरस्थावर झाल्यावर जगन्नाथानें शिरीषकुमार व नीरा या दोघांनाही दादरला जाऊन स्वस्थ विश्रांति घेण्याबद्दल विनंति केली. त्या-वेळीं त्यानें शिरीषकुमारांना म्हटलें, "गेले चार दिवस तुम्ही इथें बसून अलोचन जाग्रणं केलीं आहेत. आज तुमचे डोळे फार लाल झाले आहेत. मला आतां उद्यां सुटीच आहे. तेव्हां तुम्ही इथं न थांबतां घरीं जाऊन विश्रांति घ्यायला हरकत नाहीं. नीराताईही दोन दिवस इथं मुद्दाम आल्या. आतां आणखी जास्त वेळ बसून त्यांनीं कशाला त्रास घ्यायचा ?"

त्यावर शिरीषकुमारांनीं उत्तर केलें, "नीराबाईंना जाऊं दे. पण मला थांबायला हरकत नाहीं. जाग्रणाचं म्हणशील तर मला नेहमींचीच संवय आहे ही. कांहीं नवीन नाहीं हा प्रकार. पहाटें चार चार वाजेपर्यंत

जाग्रणं करून उपाशी पोटानं चौपाटीपासून दादरपर्यंत मी कितीवेळां तरी चालत आलों आहे. ''

पण जगन्नाथानें फारच आग्रह केल्यावर नीरेनें एक तडजोड काढली. शिरीषकुमारांनीं रात्रीं दादरला जाऊन विश्रांति घ्यावी आणि नीरेनें सकाळपर्यंत तेथें थांबून सकाळीं दादरला जावें, अशी योजना मुक्रर झाली !

× × ×

फारसें भीतीचें कारण नसल्यामुळें जगन्नाथानें स्वतांकरितां बाहेरची गॅलरी पसंत करून तेथें आपली निजण्याची सोय केली. गेले तीनचार दिवस शिरीषकुमारांनीं स्वतांकरितां जी गादी मुद्दाम दादरहून आणली होती ती खोलींतलि स्वच्छशा भागांत हंथरून त्यानें नीरेची निजण्याची सोय केली. शिरीषकुमारांच्या सध्यांच्या वास्तव्यानें त्या खोलींतील दारिद्रय जरी नाहींसें झालें नव्हतें तरी तेथील अस्वच्छता पुष्कळच कमी झाली होती. त्यांनीं मुद्दाम विकत आणलेला पॉयशा वरचेवर उडवून आणि एकसारखी झाड-लोट करून त्या जागेचें स्वरूप पुष्कळच पालटलें होतें. शिवाय शिरीषकु-मारांनीं स्वतःकरितां आणून ठेवलेलें हंथरुणपांघरुण स्वच्छ होतें, त्यामुळें नीरेला तिथें थांबल्यानंतर फारसा संकोच वाटला नाहीं.

× × ×

बरीच रात्र उलटून गेली असावी असा डोळे उघडतांक्षणीं नीरेला भास झाला. तिच्यासमोरच असलेल्या खिडकींतून तिच्या दृष्टींत जो आकाशाचा पट्टा भरत होता त्यांत शुक्रतारा तेजस्वीपणानें चमकत होता. शुक्राच्याभोंवतींचें आकाश निरभ्र होतें. ती आंथरुणावरून उठली आणि म्हातारीच्या अंथरुणाजवळ जाऊन तिनें हलकेंच खालीं वांकून कानोसा घेतला. क्षीण आणि घोगऱ्या आवजानें म्हातारीनें विचारलें, " काय पाहातां आहां नीराबाई ? "

त्या अनपेक्षित बोलण्यानें नीरा दचकली. " कांहीं नाहीं, तुम्हाला झोंप लागली कीं नाहीं हें पाहिलें. " असें कांहींसें उत्तर तिनें दिलें, आणि

ती खालीं बसली. पाणी, मोसंब्याचा रस इत्यादि काय हवें नको तें नीरेनें विचारल्यावर म्हातारीनें नीरेच्या हाताला आपल्या हाताचा ओझरता स्पर्श करून म्हटलें, " तुम्ही रात्रभर कशाला थांबला इथें ? माझी इतकी काळजी वाहण्यासारखं काय झालं आहे मला ? साऱ्यांनीं कष्ट करून मला मुद्दाम जगवावं असं मी काय केलं आहे ? कितीतरी वर्षांपूर्वी मी या जगांतून जायची पण असाच एक धर्मात्मा प्रकट झाला आणि त्यानं मला पुन्हां जगांत ओढलं. "

तिला आतां जास्त बोलूं देणें योग्य नाहीं असें वाटून नीरेनें तिला गप्प बसण्याबद्दल सुचविलें. पण तिनें म्हटलें, " अहो, बोलूं द्या थोडसं मला. उलटं आजारांत, जें काय मनाला वाटतं तें बोलून टाकलं म्हणजे कमी त्रास होतो. " आणि असें म्हणत म्हातारीनें आपलें क्षीण आवाजांतील बोलणें चालूं केलें.

" जगन्नाथ बाहेर निजला आहे ना ? त्याला झोप लागली असली तर सांगतें तुम्हाला मला काय सांगायचं आहे तें ! " बोलतां बोलतां ती थांबली असतां जगन्नाथाचा गाढ झोपेंतला तीव्र श्वासोश्वास स्पष्टपणें ऐकूं येत होता.

" फार पूर्वीची गोष्ट. मी त्यावेळीं अगदीं तरुण होतें. कागलचे आम्हीं. अगदीं लहान वयांत माझं लग्न झालं होतं. आणि मी त्यावेळीं एक बालविधवा होतें. लोकांच्या घरीं धुणंपाणी करून मी एकट्याचा जिव वांचवीत होतें. अशा तरुण बालविधवांचं काय होतं हें माहीत आहे तुम्हाला. तेंच माझं झालं. एका पांढरपेशा तरुणानं मला पुनर्विवाहाचं आमिष दाखवून फसविलं. आणि जें व्हायचं तेंच झालं. त्यानं मला कोल्हापुरांत आणून ठेवलं होतं. एका पहाटेस आपलं पाप पोटाशीं घेऊन जगांतून नाहींसं होण्याकरितां मी पंचगंगेची वाट धरली. नदीतीराशीं पोंचून जगाचा निरोप घेण्याच्या बेतांत होतें, इतक्यांत मला कुणी तरी थबकावलं ! माझ्या पोटांत धडकी भरली. मी जागच्याजागीं खालीं बसलें.

त्या गृहस्थानें जवळ येऊन माझी ममतेनं विचारपूस केली आणि जीव देण्याचा मी जो मूर्खपणा करीत होतें त्याबद्दल त्यानं मला सौम्य शब्दांनीं दोष दिला. शेवटीं त्यांनीं मला आग्रहानं आपल्याबरोबर गांवांत नेलं आणि एकाद्या भावानं बहिणीची जशी व्यवस्था करावी तशी माझी व्यवस्था केली. पुढं काय सांगायचं ? मी जगांत परत आलें. त्यावेळीं पोटाशीं धरलेला तो गोळा म्हणजे हा जगन्नाथ ! त्यानंतर पुढच्या काळांत त्या गृहस्थांनीं आम्हाला कितीतरीं प्रकारांनीं मदत केली. पण मी आपण होऊनच कोल्हापूर सोडून मुंबईला निघून गेलें. कारण मला इतरांच्या अनुभवानं एवढं समजत होतं कीं, लोक म्हणजे मूर्ख असतात. जें कांहीं दिसेल त्यावरून वाटेल ते व्यूह रचायला ते माघार घेत नाहींत. आपल्यामुळं त्या सत्पुरुषाला निष्कारण त्रास भोगण्याची पाळीं येऊं नये म्हणून मी त्याला न कळवितां कोल्हापूर सोडलं. त्यांनीं मला कितीदां-तरी परोपरीनीं कोल्हापुरासच राहाण्यास सांगितलं होतं. पण मी त्यांचं म्हणणं कां मानलं नाहीं तें आतां सांगितलंच. त्या सत्पुरुषाच्या मदतीनं आम्हाला हे दिवस दिसले. कारण त्यावेळीं माझ्या हवालीं शंभर रुपये करून त्यांनीं म्हटलें होतें, " कुठंही गेलां तरी नीट कामधंदा मिळेपर्यंत त्रास होऊं नये म्हणून हे थोडेसे पैसे जवळ असूं द्या. " त्या पैशाच्या भांडवलावर आम्हीं दोन माणसें जगांत राह्यला तरी जगलों. किती वेळां तरी वाटतं कीं, धांवत जावं आणि तो माणूस जिथं असेल तिथं जाऊन त्याच्या पायांना घट्ट मिठी मारावी. तुम्हांला त्यांचं नांव माहीत नसेल ? "

उत्कंठेनें नीरेनें विचारलें, " काय त्यांचं नांव ? "

म्हातारीनें आपले क्षीण हात जोडण्याचा यत्न करीत म्हटलें, " नाना दीक्षित ! "

---

## प्रकरण १४ वें

# वडिलांनीं चमत्कार दाखविला!

——:०:——

नीरा आणि बाबासाहेब सरदारगृहांतील त्या खोलींत किती वेळ तरी समोरासमोर स्तब्धपणानें बसलीं होतीं. अर्धवट प्यालेल्या कसल्यातरी थंड पेयाचीं कांचपात्रें त्यांच्यामध्यें असलेल्या चौपाईवर ठेवलेलीं होतीं. त्या चौपाईच्या वर तुळईशीं तीन पाकळयांचा विजेचा पंखा फिरत होता; त्याच्या फिरण्याच्या आवाजानें तेथील स्तब्ध वातावरणाचा भंग होत होता. दुपारीं तीन वाजण्याचा सुमार होता तरी आभाळ ढगांनीं दाटून आल्यामुळें त्या खोलींतला प्रकाश क्षीण झाल्यासारखा भासत होता. भव्य घुमटानें आच्छादिलेल्या देवळाच्या सभामंडपांतील धूसर प्रकाशासारखा प्रकाश सर्वत्र भरून राहिलेला होता.

"तुझं म्हणणं खोटं नाहीं, नीरे. मी माझ्या प्रतिष्ठेवर प्राणांपलीकडे प्रेम करीत आलों आहें हें मला मान्य आहे. पण माझ्या जवळपास वावरणाऱ्या माणसांपैकीं सर्वांत जर मी जास्त असं कुणावर प्रेम केलं असेल तर तें तुझ्यावर हेंही कांहीं खोटं नाहीं. आयुष्यामध्यें खूप प्रतिष्ठा मिळवायची हें माझं एक आवडतं ध्येय अंमलांत आणण्याकरितां मी जसं जिवाचं रान केलं तसंच आपली मुलगी सुखांत, समाधानांत राहून तिलाही खूप नांवलौकिक मिळवितां येण्यासारखी परिस्थिति लाभावी हाही माझा एक अन्तःकरणापासूनचा हेतु होता. माझ्या भोंवतालचं जग मी जितकं उघडया डोळयांनीं पाहिलं आहे, तितकं तें फारच थोडया लोकांनीं पाहिलं असेल. परिस्थितीवर साऱ्यांनाच जय मिळवितां येत नाहीं. पराकाष्ठेचा प्रयत्न करूनही कितीतरी लोकांना सारीं शस्त्रास्त्रं खालीं ठेवून परिस्थितीला शरण जावं लागतं. अलीकडे तर दिवसेंदिवस कितीतरी तेजस्वी तरूण वाव मिळत नाहीं म्हणून खितपत पडलेले दिसताहेत. या शिरीषकुमाराचंच

उदाहरण घे. त्याला जर पैशाची अनुकूलता लाभली असती तर त्यानं केवढे तरी चमत्कार केले असते या जगांत. परदेशीं गेला असता तर एकादी मोठी परीक्षा देऊन परत आला असता, आणि इकडे एव्हांना बडा सरकारी अंमलदार झाला असता! आपल्या विद्वत्तेचं कोडकौतुक त्याला हजारों बांधवांकडून हक्कानं करून घेतां आलं असतं. पण आज एकाद्या सामान्य शिक्षकांप्रमाणं चार शिकवण्या करतो, पोट भरतो आणि राहावत नाहीं म्हणून दलितांच्या चळवळी करतो. त्याच्या अंतर्यामांत केवढी मोठी खळबळ माजून राहिली असेल त्याची मला कल्पना येते. आगगाडीच्या निरनिराळ्या डब्यांमधलि श्रेष्ठकनिष्ठत्वाचा भेद हा जसा केवळ पैशावर अवलंबून असतो तसा समाजांतील बुद्धीचें सामान्यत्व किंवा असामान्यत्व यांतील फरकही आज नुसत्या पैशावरच अवलंबून राहूं लागला आहे. परदेशीं जाऊन विलायती पदव्या मिळवितां आल्या, किंवा शास्त्रीय प्रयोगशाळेंतील सारीं उपकरणें पैशाच्या जोरावर अनायासें लाभून एकादा प्रयोग करून जगाचें लक्ष वेधतां आलें किंवा चार पुस्तकं लिहून पदरच्याच पैशानें तीं छापून काढतां आलीं कीं समाजाकडून असामान्यत्वाचा शिक्का हक्कानं मिळवितां येतो. पैशाच्या प्रतिकूलतेमुळें हें असलं कांहीं करतां आलं नाहीं म्हणजे तो मनुष्य अज्ञातवासांत गुप्त होऊन जातो!"

वडिलांचें हें बोलणें ऐकून नीरेच्या मनांत आलें, 'किती योग्य वेळ आहे आपल्या मनांतली गोष्ट बोलण्याला ही! पैशाची प्रतिकूलता असल्या-मुळें शिरीषकुमार मागं पडले, हें स्वतः आपले वडीलच जर म्हणताहेत तर आपणही त्यांना चटकन् सांगून टाकावं कीं त्यांना पैशाची मदत करा, त्यांची विद्वत्ता नि कर्तबगारी कसाला लागून त्यांचं तेज अधिक वाढेल अशी परिस्थिति त्यांना मिळावी म्हणून त्यांच्यावर तुमच्याजवळच्या पैशाची थोडीशी वृष्टि करा. माझ्यावर तुमचं अतिशय प्रेम आहेना? मग ज्या व्यक्तिबद्दल मला आज इतकीं वर्षं जिव्हाळा वाटत आला, तिला अधिक सुखी करतां यावं असं कांहींतरी साधन माझ्या हातीं द्या. तिच्या सुखी होण्यानं मीही सुखी होईन।'

पण या मनांत आलेल्या विचारांचा कांहींहि उपयोग झाला नाहीं. मनस्वी उकाडयानें हैराण होत असतांना शीतोपचारांच्या नुसत्या सुखमय मनोराज्यांतच माणसानें तल्लीन होऊन जाण्याचा प्रयत्न करावा तसें नीरेचें होत होतें. हृदयाला हळुवारपणानें स्पर्श करणारे हे विचार आपल्या चर्येवरील कोणत्याही छटेनें प्रकट होऊं नयेत अशीच उलट तिनें दक्षता बाळगली! समोर अर्धवट राहिलेला ग्लास तिनें तोंडाला लावला आणि तो ग्लास तोंडापाशीं मुद्दामच जास्त वांकडा धरला. त्या ग्लासाच्या पारदर्शक दमट कांचांतून आपल्या पुसटलेल्या दिसणाऱ्या मुद्रेवरील भावना तिनें दडविण्याचा यत्न चालविला होता!

खोलींत येरझारा घालतां घालतां बाबासाहेबांनीं तिला पुन्हां म्हटलें, "तुला एकदां सारं कळवळून सांगावं म्हणून मी इथं बोलावलं. तुझी आई तिकडे घरीं माझ्या वाटेकडे डोळे लावून बसली असेल. तूं इकडे निघून आल्यापासून तिच्या जिवाचं काय झालं असेल त्याची कल्पना कर. अद्यापर्यंत तूं वाटेल त्या घटकेला परत येशील म्हणून तुझी खोली अगदीं सज्ज राखण्याकरितां ती त्या खोलींत दिवसांतून दहादां जाऊन येते. मुंबईकडच्या गाडीची वेळ झाली असतांना दारावरून टांगे जाऊं लागले कीं ती किती उत्कंठेनें दरवाजाकडे एकसारखी पाहात राहाते? आणि अपरात्रीं तूं एकाद्यावेळीं येशील या कल्पनेनें मुद्दाम पेलाभर दूध नीट काळजीनें झाकून ठेवण्याची ती रोज यातायात करीत असते. समजायचं नाहीं नीरे, तुला, तिच्या मनाचं काय झालं असेल तें! तुझ्या आईकडं पाहिलें कीं मला मागें कुठेंतरी वाचलेली एक मजेदार गोष्ट आठवते. एकदां एक तरुण मनुष्य भर बाराच्या उन्हांत उघडयावर कांहींतरी काम करीत होता. त्याच्या म्हाताऱ्या बापानें त्याला उन्हांतून सांवलींत येण्याबद्दल कितीदां तरी कळवळून सांगितलें. म्हाताऱ्याच्या सांगण्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. आपल्या मुलाला फार ऊन लागतें आहे हें पाहून त्याचं मन अगदीं तुटत होतें. शेवटीं त्यानें आपल्या मुलाचा एक तीनचार वर्षांचा लहान मुलगा होता, त्याला घेतलें आणि खेळवीत खेळवीत

त्याला उन्हांत नेऊन बसविलें. आपलें मूल उन्हांत आहे, असें पाहिल्या-बरोबर त्या तरुणानें हातांतलें काम टाकलें, आणि त्या मुलाला घेऊन तो सांवलींत आला! परवांच तिच्याकडे एकदोन बायका सहज बसायला आल्या होत्या. मला मागील दारीं जायचं होतं म्हणून मी चाललों होतों, तों दाराच्या आंतल्या बाजूला बोलणं ऐकूं आलं म्हणून किंचित् थबकलों. त्यापैकीं एक-जण विचारीत होती, "नीरा कुठें दिसत नाहीं ती? आतां तर काय परीक्षा झाली. ती मोकळीच असेल ना?" यावर तुझी आई काय उत्तर देते हें ऐकण्याकरतां मी मुद्दामच थांबलो. ती म्हणत होती, "परीक्षा झाल्यावर आजारी पडली होती. अजूनही बरं वाटत नव्हतं तितकसं तिला. जरा थारेपालट म्हणून गेली आहे मुंबईला. मुंबईत मन रमायला काय वेळ लागायचाय्? तिकडे गेली ती तिकडेच रमली. येईल आतां परत." पण असें उत्तर देतांना तिच्या मनाची केवढी यातायात चालली होती, तें तिचें तिलाच माहीत. म्हणून म्हणतों नीरे, असल्या आपल्या प्रेमळ आईचा विचार कर. तिनं काय असा अपराध केला आहे म्हणून तिच्यावर तुझ्या वियोगाच्या या असह्य यातना भोगण्याचा प्रसंग यावा?"

वस्तुतः बाबासाहेबांचा स्वभाव हृदयस्पर्शी भाषण करून माणूस अंकित करून घेण्याचा नव्हता. कायद्याच्या जगांत मुरलेल्या त्यांच्या मनाला अनुकूल प्रतिकूल सवालांची छाननी करून समर्पक आणि भावनाशून्य उत्तरें काढण्याची इतकी संवय जडली होती कीं त्यांच्या तोंडून अशा प्रकारचे शब्द बाहेर पडतील आणि त्यांनीं दुसऱ्याच्या अंन्तःकरणाची पकड घेतली जाईल हें सहसा शक्य नसे. अन्तःकरणापेक्षां बुद्धीला आणि भावनेपेक्षां विचाराला त्यांच्या जीवनांत आजपर्यंत फार मोठें प्रामुख्य मिळालेलें होतें. नीरेनें केलेली आपल्या वडिलांच्या स्वभावाची परीक्षा पूर्वी अनेक प्रसंगीं जरी बिनचूक बरोबर ठरलेली होती तरी आज मात्र तिचा अंदाज पुरेपूर चुकला होता. सुदर्शनचक्र जवळ असूनही कृष्ण तें वापरीत नाहीं, अशा खात्रीनें अर्जुनावर शरसंधान करणाऱ्या भीष्माला कृष्णानें चक्राला हात घातल्याबरोबर सारी युद्धनिपुणता बाजूला गुंडाळून ठेवावी

लागली! नीरेलाही आज आपल्या वडिलांनीं कोमल भावनांना स्पर्श करणारी अनपेक्षित भाषणें केल्याचें पाहून अशीच असहाय्यता आली.

तिला वाटलें, 'काय खोटं आहे, आपले वडील म्हणतात तें? आईला त्रास व्हावा असं वर्तन आपण केलं. काय मिळविलं आपण तिच्या जिवाला यातना देऊन? आणि समोर बसलेल्या बाबांनीं तरी आपलं आजपर्यंत काय कमी केलं आहे? किंबहुना आपल्याला आज जी स्वतःच्या पायांवर उभं राहाण्यासारखी स्थिति आली ती बाबांच्यामुळेंच! आपल्या करितां त्यांनीं इतक्या तत्परतेनें साऱ्या सुखसोई बिनतक्रार सिद्ध करून दिल्या. आपण उलट त्यांच्यासाठीं काय केलं आहे? आईला तर आपल्यामुळें पूर्वी कितींदा तरी मनस्ताप सहन करावा लागला आहे. एकदां फोनोग्राफच्या प्लेट्स घ्यायच्या होत्या. आपण आणि आई बाबांच्या परवानगीनें बाजारांत गेलों होतों. सुंदराबाईची लावणीचीं गाणीं घेण्याचा आपण आग्रह धरला. आईनें त्या गाण्याच्या तबकड्या खरेदी केल्या. तीं गाणीं ऐकल्यावर बाबा किती संतापले, पण 'मला फार आवडलीं तीं गाणीं—म्हणून मीं या तबकड्या आणल्या," असें उत्तर देऊन आईनें बाबांचा सारा राग स्वतांवर ओढवून घेतला. आणि एकदां बाबा कोर्टांत गेले असतांना दाराशीं एक सुंदर पोपट विकण्याकरितां आला असतांना आईच्या मागें लागून आपण तो तिला विकत घ्यावयास लावला!

बाबांना पशुपक्षी पाळण्याबद्दल केवढी चीड होती. संध्याकाळीं बाबा घरीं आले आणि दारांत पाऊल टाकल्याबरोबर ओसरीवरील पिंजऱ्यांत टांगलेल्या त्या पोपटानें जोरजोराचे चीत्कार करून त्यांचं स्वागत केलं, तेव्हांचाही प्रसंग असाच. "दादा आज दुपारीं येऊन गेला, त्यानं आईची आठवण म्हणून हा माहेरचा पोपट मला मुद्दाम आणून दिला," असें आईनें सांगितलें, आणि दादा व तिची आई यांची बाबांनीं केलेली कुचेष्टा तिनें मुकाट्यानें सहन केली. आणि एकदां......

अशा आठवणींनीं ती एकदम व्याकुळ झाली. तंतुवाद्यावरील एका तारेच्या झंकारा बरोबर इतर तारांचीही कम्पनें व्हावीं, तसें या आठवणी-

संबंधांत झालें. सुसाट वाऱ्यानें एकादी खिडकी उघडावी, पावसाच्या आडव्या सरींचा झोतच्या झोत एकदम आंत घुसावा आणि मग त्याचा प्रतिबंध करण्याकरितां खिडकी लावणेंही मुष्कील व्हावें, तसा या आठवणींनीं धुडगूस मांडला ! तिच्या डोळ्यांत टचकन् पाणी आलें. खुर्चीतल्या खुर्चीत शरीर शहारल्यासारखें करून तिनें मान हालविली आणि आलेला गहिंवर दाबीत तिनें म्हटलें. " मी दुर्दैवी आहे. "

या शद्बांच्या उच्चाराबरोबर बाबा तिच्या जवळ एकदम गेले. तिनें दोन्ही हातांनीं आपलें तोंड झाकून घेतलें होतें. तिच्या डोक्यावरून हात फिरवीत त्यानीं म्हटलें, " वेडी आहेस तूं, म्हणून मी म्हणतो तें किती बरोबर आहे पहा ! किती निष्कारण त्रास करून घेते आहेस स्वतांला, आणि वाळली आहेस किती पहा. अशी काय मोठीशीं बाब आहे ? आणि खरें म्हणजे थोडासा देखील उद्वेग सहन करण्यांची ताकद नाहीं तुझ्या मनांत. गवती छपरं असलेल्या झोंपडया थोडयाशा वाऱ्यानंसुद्धां थडथडून हालतात, तसं झालं आहे, तुझ्या मनाचं. "

" गवती छपरांच्या झोपडयांसारखं माझं मन झालं तें कशामुळं झालं ? इथं मुंबईंत आल्यापासून एक दिवस मला अन्न गोड लागलं नाहीं. आगगाडयांचे खडखडाट, ट्रॅमचे ठणठणाट, आणि मोटारींचे धडधडाट, यांनीं कसा उबग आला आहे. परवां तर अगदीं असं वाटलं कीं जीव द्यावा कुठं तरी जाऊन ! त्यावेळीं डेक्कन क्वीन आयती जोरांत चालली होती प्लॅटफॉर्म जवळून. पण तेंहीं धाडस होत नाहीं. असल्या धाडसाच्या वेळीं आईची आठवण होते आणि...... "

" असलं वेड्यासारखं कांहीं बोलूं नकोस. जीव देण्याइतका कांहीं हा प्रसंग आणीबाणीचा नाहीं. "

" तुम्हाला तो आणीबाणीचा वाटत नाहीं. पण मला वाटतो, "

" हेंच चुकतं तुमचं. मला समजतच नाहीं तुम्ही मुलंमुली ही लग्नाची बाब इतकी आणीबाणीची कशी मानतां तें. कांकडून टाकणाऱ्या थंडीपासून निवारण करण्याकरितां आपण उबदार पांघरूण अंगावर घेतों.

त्या पांघरुणाला आंतून पातळशी चादर लावली. अशा पातळ चादरीसार लग्न हें आयुष्यातलं प्रकरण आहे. व्यवहाराच्या गारठ्यानं कर्तबगारी थंड पडूं नये म्हणून जीं अनेक संरक्षक साधनं वापरावीं लागतात, त्यांतलं लग्न हें एक साधन आहे. हें साधन वापरण्यावांचून गत्यंतर नाहीं असं आढळून आल्यावर तें निर्वेधपणं वापरतां यावं म्हणून, त्याला धर्माचं पाठबळ आणि समाजाची संमति मिळविली आहे. त्या साधनांत अंतर्भूत झालेली शक्ति प्रत्येकानं आपल्याला झेपेल इतक्या प्रमाणांत पारखून घ्यावी असा संकेत आहे. कृष्णाच्या सोळाहजार एकशेंआठ स्त्रिया किंवा द्रौपदीचे पांच पति यांच्यांत ऐतिहासिक सत्याचा भाग असो किंवा नसो पण समाजाच्या दृष्टीनं त्यांत फार तथ्य आहे हें मात्र खरं. कर्तबगारीला उपयोगी पडणारं हें साधन कृष्णानें सोळाहजार एकशेंआठपट प्रमाणांत वापरलं आणि युगान्तर घडविण्याइतका पराक्रम केला. द्रौपदीनं हें साधन पांचपट प्रमाणांत म्हणजे अगदी अलौकिक रीतीनं वापरलं आणि तिच्या काळांत जी कर्तबगारी अपूर्व ठरण्यासारखी होती ती करून दाखविली. फरक आहे तो प्रमाणाचा, प्रकाराचा नाहीं; लग्न या प्रकाराचं स्वरूप निरनिराळ्या समाजांत निरनिराळ्या काळीं बदलत गेलं असेल, पण तत्त्वतः साधन म्हणून असलेली त्याची महती विसरून चालणार नाहीं."

"ही महती आम्ही विसरून चालतों हाच तुमचा आमच्याबद्दलचा फार मोठा गैरसमज आहे. प्रत्येक पिढीचा या साधनासंबंधांत एक प्रयत्न चालला आहे आणि तो म्हणजे या साधनाला अधिकाधिक आकर्षक बनविण्याचा होय. एका विशिष्ट क्षणापुरतंच हें साधन आकर्षक न ठरतां चोवीस तास तें आकर्षक ठरावं म्हणून सारी धडपड चालली आहे."

"आणि आमची धडपड चालली आहे ती तुमच्या या कामांत तुम्हाला मदत व्हावी म्हणूनच."

"होय. आईबाप मदत करण्याचा प्रयत्न करतात. पण ती मदत रोग्याचा प्राण गेल्यावर दाराशीं येणाऱ्या डॉक्टरांप्रमाणें कित्येक वेळां अवेळीं पोहोंचते."

" ही चर्चा र... ह

विचार केलास कां ? मुंबईस

विचार करून ...ला पुन्हां पर

वि... धानं अगदं।

... माझी खात्री

केलास ... णतीही अनिष्ट ग।

वडिलांच्या या संदिग्ध बोल

नाहीं. पण त्याहीपेक्षां त्यांनीं तिच्याब

त्यानं तिचं मन थोडसं चमकल्याशिवाय

गोष्ट करणार नाहींस ' हें वडिलांचें आपल

विश्वासानें व्यक्त केलें असावें, याचा तिला

तिच्या या गोंधळलेल्या अवस्थेंतच बाबांनीं म्ह

' आणि तुझ्या आईनें मला फार फार

कीं, कसंही करून नीरेला घेऊन या. '

जी गोष्ट आड येऊं नये म्हणून नीरा एकसारखी जप

नेमकी आड आली ! तिच्या मनाला घराकडे ओढ घ्यावयास

एवढी एकच गोष्ट होती. त्या गोष्टीचा उच्चार झाल्याबरोबर तिला हुंद

आला. तिच्या जवळ जाऊन वडिलांनीं म्हटलें,

" नीरे, थोडासा तरी इतरांकरितां त्याग केल्याशिवाय या जगांत कसा निभाव लागेल ? आणि शारीरिक सुखसोयींच्या त्यागापेक्षांही मनाच्या भावनांचा त्याग हा फार अवघड असला तरी करावा लागतो. तुझ्या आईनं नाहीं कां कितीतरी भावनांचा माझ्यासाठीं आणि तुझ्यासाठीं त्याग केला. आणि तो शिरीषकुमार पहा ! आपल्या कितीतरी आवडत्या कल्पनांना तो आपल्या माईकरितां हरघडी सोडीत असेल ! माईला सोडून तो कधीं जाईल कां ? त्याच्या मनाला केवढ्यातरी चळवळी कराव्याशा वाटत असतील. पण मनाला आवर घालून तो माईला सुखी करण्याकरितां धड-

., त्व्हां मी पाहात होतों.
ांगितलं कीं देवपूजा करीत
, कितीतरी बारीक सारीक
ादाहरण तर कांहीं वाईट

.

ाणि अनपेक्षित दिशा आपल्यासमोर
कल्पना नसल्यामुळें तिच्या मनानें या
ारी केली नव्हती. त्यांतून आश्चर्याची
ा उभी राहाणारी तुलना ही नेमकी ती
ाघांच्यामधलीच होती! आईकरितां शिरीष-
आणि आपण आपल्या आईकरितां

कुंठित झाली. तिनें गहिंवरल्या गळ्यानें आपल्या
ग कांहींच समजत नाहीं मीं काय करावं तें!"

ा चाललेला कोलाहल उघड करून दाखविणें तिला
हातें, आणि बाहेरून इतरांनीं चालविलेली तिच्या मनाची
...ा मुळींच पसंत पडत नव्हती!

"तुला समजत नाहीं, असं तुझं तुलाच वाटतं आहे ना? मग माझं ऐक. माझ्याबरोबर चल पुण्याला."

"पण तसंही करावंसं वाटत नाहीं मला!"

"म्हणजे? आश्चर्य आहे अगदीं!"

"मला काय करावंसं वाटतं तें माझं मलाच समजत नाहीं, आणि सांगतांही येत नाहीं."

"तूंही कांहीं नीट सांगत नाहीस. माझंही ऐकत नाहीस. मग कसं व्हायचं?"

"मला कांहीं दिवस एकटी सोडून द्या. मग मी तुम्हाला कळवीन."

तिच्या दोन्ही खांद्यांना धरून तिला उठवीत बाबांनीं म्हटलें, " नीरे कांहीं हरकत नाहीं. तुझ्या मनांत कांहीं गोंधळ माजला असला आणि निरसन करण्यासाटीं तुला वेळ हवा असेल तर कांहीं दिवस बेलाशक थांब. पण तेवढया वेळांत खरोखरच विचार कर, विचार करण्याचं टाळूं नकोस. किती तरी तरुणांचं चुकतं आहे तें इथंच. काय व्हायचं असेल तें होईल असं म्हणत आला दिवस ढकलायचा असं करण्याची फार घातक संवय पुष्कळांना हल्लीं जडलेली दिसते. तसं करूं नकोस. आणि हें पहा. मुंबईत माईजवळ किती दिवस राहाणार तूं. निदान कोणत्या कां प्रकारानं होईना पण तिला पैशाची मदत पोचेल असं कांहीं तरी करायला नको कां ? किती पैसे लागतील ते मागायला संकोच करूं नकोस. "

" तशी पैशाची आतांच कांहीं जरूर लागणार नाहीं. "

" कां बरं ? मी तुला आजपर्यंत पैशाला कधीं नाहीं म्हटलं आहे ? "

" नाहीं. पण......मी नोकरी धरली आहे. "

" काय नोकरी ? छे. छे. काय केलंस हें. म्हणूनच ही अशी सुकून गले आहेस. तूं नोकरी करावीस असं मी तुला कधींतरी म्हटलं होतं का ? अगदीं विचित्र आहेस झालं. समजतच नाहीं मला तुझ्या मनाचं हें असं काय झालं आहे तें. तूं निघतांना जें पत्र लिहून निघालीस त्यांत दुसऱ्याच्या पैशाला पांगुळगाडा म्हटलंस तें लक्षांत आहे माझ्या. पण मला वाटलं तें नुसतं लिहिण्यापुरतं होतं ! आधीं माझा पैसा हा दुसऱ्याचा पैसा नाहीं ! आणि दुसरं म्हणजे तुला पांगळी करण्याकरितां मी तुझ्यावर पैसा खर्च केलेला नाहीं, किंवा करावा अशी माझी थोडीशी सुद्धां इच्छा नाहीं. तुला धडधाकट, बळकट आणि प्रभावशाली बनविण्याकरितां माझा पैसा आहे असं मी आजपर्यंत मनापासून मानीत आलों. "

" पैसे मिळविण्याकरितां किती कष्ट पडतात तें समजावं म्हणून मी नोकरी धरली, " आणि असें म्हणत तिनें आपल्या विशाल डोळ्यांनीं

बाबांच्या चर्येकडे पाहिलें. त्यांच्या डोळ्यांत आंसवें तरारत होतीं. तशा स्थितींतच हसतां हसतां त्यांनीं म्हटलें,

" तुम्ही स्त्रिया जात्याच चतुर असतां असं म्हणतात तें कांहीं खोटं नाहीं. कुठं नोकरी धरली आहेस ही ? "

" इथल्याच एका अनाथालयांत धरली आहे. "

" अनाथालयांतच नोकरी करायची होती तर या अनाथाल्यापेक्षां दुसरं किती तरी चांगलं अनाथालय मी तुला दाखविलं असतं ! "

" कोणतं तें ? "

" आपलं घर ! तुझ्यावांचून तुझे आईबाप त्या एवढ्या थोरल्या घरांत अनाथांसारखेच राहात नाहींत कां ? अजून पहा. त्या अनाथालयांत चल ! "

बोलतां बोलतां त्यांच्या डोळ्यांतून अश्रु ओघळले.

नीरेला वाटलें किती विचित्र प्रकारानें भेट झाली ही ! यापेक्षां आपल्या अपेक्षेप्रमाणें वडिलांनीं उग्रपणानें आणि ताठरपणानें भाषणें केलीं असतीं तर त्यांना तोंड देण्याची आपण तयारी तरी करून आलों होतों. पण आपला अपेक्षाभंग झाला. नव्हे, बाबांच्या या कोमल वृत्तीमुळें आणि आजपर्यंत त्यांनीं कधींच न दाखविलेला हा हळवेपणा एकदम आपल्यापुढें उभा केल्यामुळें आपला किती गोंधळ उडाला आहे हा ! कोणत्या जगांत आहों आपण ?

× × × ×

सरदारगृहांत जेवून जाण्याचा बाबांनीं फार आग्रह केला तरी नीरेनें ' घरीं माई वाट पाहील, ' या सबबीवर स्वतांला सोडवून घेतलें. ती लिफ्टमध्यें बसेपर्यंत बाबा तिच्याबरोबर आले होते !

× × × ×

लोकलमधून दादरला ती उतरली तेव्हां कल्याणकडची लोकलही नुकतीच आलेली होती. सबंध दिवसभर झालेल्या प्रकारांनीं ती विमनस्क असल्य.मुळें आसपास कुठें न पाहातां स्टेशनच्या बाहेर पडण्याकरितां ती प्लॅटफॉर्मकडून बाहेर जाणारी चढण चढूं लागली. आपल्याजवळून अगदीं लगटून कोण चाललें आहे असें वाटून आश्चर्यानें तिनें उजवीकडे पाहिलें. तों शिरीषकुमार आणि पलीकडे जगन्नाथ!

दोघांचेही चेहरे अगदीं गंभीर होते.

शिरीषकुमारांनीं हळूच म्हटलें, "नीरे, जगन्नाथाची आई आज दुपारीं २ वाजतां वारली! मरतांना तिनं तुझी आठवण काढली होती!"

नीरेच्या डोळ्यांना पाणीं आलें. देवकीच्या पोटीं जन्म घेतल्या-बरोबर श्रीकृष्ण एकदम आठ वर्षांचा बालक म्हणून तिच्यासमोर उभा राहिला तसा त्या म्हातारीचा आणि नीरेचा लोभ हा अगदीं अल्पावधींत एकदम अनेकवर्षांच्या दाट परिचयासारखा वाढला होता! म्हणूनच तिच्या अंत:करणाला म्हातारीच्या मृत्यूच्या वार्तेनें मनस्वी दु:ख झालें.

घराच्या रस्त्याला लागल्यावर शिरीषकुमारांनीं पुन्हां म्हटलें,

"आज सकाळीं एका शिकवणीच्या घरीं बोलाचाली होऊन ती शिकवणी सुटली!"

अगदीं स्तब्धपणानें तीं तिघेजण घरीं आलीं. माईनें दार उघडल्या-बरोबर शिरीषकुमारांनीं माईला एकदम मिठी मारली, आणि अनावर हुंदका देत म्हटलें 'माई!'

तें दृश्य पाहातांना जगन्नाथ व नीरा यांच्या डोळ्यांतून घळघळ पाणी वाहात होतें.

शिरीषकुमारांनीं कांहीं वेळानें विचारलें, " माई तुझें अंग ऊन कां लागतं आहे ? " तिनें उत्तर केलें, " बरं नाहीं वाटत मला आज. अंग कसकसतेय्. "



## प्रकरण १५ वें.

# आनुवंशिक परंपरेच्या खुणा !

——:०:——

अनाथालयांत राहाण्याकरितां जावें असें नीरेला अलीकडे कित्येकदां वाटूं लागलें होतें. आणि त्याप्रमाणें तिनें वरचेवर बोलूनही दाखविलें होतें तरी माईच्या आग्रहामुळें तिला माईला सोडून जातां आलें नाहीं. माईला रोज बारीक ताप येत होता आणि तिची प्रकृति दिवसेंदिवस क्षीण होत चालली होती. त्यामुळें माईच्या आग्रहाला न जुमानतां जाणें नीरेच्या जीवावर येत होतें. माईनें काकुळती येऊन केलेल्या आग्रहामुळें असाहाय्य बनून नीरेला रोज वस्तीकरिता माईचें घर गांठणें भाग पडूं लागलें होतें.

शिरीषकुमारांचे ठरावीक कार्यक्रम चालूच होते. सकाळ संध्याकाळ शिकवण्या कराव्या, दुपारीं कामगार आणि मजूर यांच्या वस्तींतून हिंडून यावें, त्यांना स्वच्छता, रोगराईचें निवारण इत्यादींचें महत्व पटवून द्यावें आणि या गोष्टी करण्याकरितां पदरमोड करून त्यांना शक्य तें साहाय्य करावें असें चाललें होतें. त्या अडाणी बायका आपल्या तान्ह्या मुलांना देवी काढवुन घेण्यासंबंधांत टाळाटाळ करीत त्यामुळें देवी किंवा इतर रोगांच्या सांथींचा प्रादुर्भाव त्यांच्या वस्तींत वरचेवर होत असे. त्यांचा प्रतिकार करण्याकरितां पदरचे पैसे खर्चण्याचा प्रसंग शिरीषकुमारांवर नेहमींच येत असे. असल्या साथींत किंवा रोगराईंत लहानथोर कोणीही मरण पावले तर त्या दरिद्री लोकांजवळ उत्तराक्रियेसाठीं पैसेही नसत. आणि अशावेळींही पुढें होऊन शिरीषकुमारच सारे प्रसंग पार पाडीत असत. कामगारांच्या किंवा मजुरांच्या बायकांना गरोदरपणीं स्वस्थ विश्रांति घेणें

शक्य होत नसे. घरांतलि तेवढें उत्पन्न कमी होतें आणि तें तसें होऊन भागणार नाहीं, या तीव्र जाणीवेमुळें त्यांना रजा घेतां येत नसे, आणि प्रसंगविशेषीं घेतलेल्या रजेंत पैसे न मिळाल्यामुळें त्यांच्या हलाखींत भर पडे. बाळंतीण होऊन महिना झाला नाहीं तोंच त्यांना कामधंद्याला सुरवात करावी लागे. कारण पैसा मिळविण्याकरितां दिवसभर राबलें तरी तें राबणें पुरें पडत नव्हतें. इतके कष्ट आणि सायास करूनही पोटभर अन्न आणि अंगभर वस्त्र मिळण्याची जी मारामार पडे ती कशानेंही मिटत नसे! असल्या स्त्रियांना शिरीषकुमारांनीं गुप्तदानें देऊन कितीदां तरी मदत केली होती. एका माणसानें जिवापाड श्रम करून केलेल्या असल्या मदती म्हणजे ग्रीष्माच्या तापानें ठणठणीत झालेल्या पृथ्वीला लहानशा ओंजळीं-तल्या पाण्याच्या चार शिंतोडयांनीं भिजविण्याचा प्रयत्न करण्यासारखें विचित्र आहे हेंही शिरीषकुमारांना समजत होतें. ही स्थिति सुधारण्या-करितां बाहेरचें सारें जग जागें केलें पाहिजे ही त्यांना जाणीव होती.

तरीही एकट्याला करतां येतील ते श्रम करण्याची त्यांची तयारी होती. गिरणी मालकांना वारंवार भेटून त्यांनीं कामगारांच्यासाठीं कांहीं सव-लती मिळविण्याची धडपड चालविली होती. गेली चारपांच वर्षे त्यांचा हा उद्योग नेटानें चालू होता. पण हजारो दरिद्री लोकांना माणुसकीनें जगतां यावें म्हणून ज्या द्रव्यसाधनांची जरूर होती ती हस्तगत करणें ही गोष्ट सोपी नव्हती. उलट शिरीषकुमारांसारखे कांहीं तरुण मुंबईमध्यें आले आणि त्यांनीं या चळवळी करून कामगारसंघ स्थापन केले, कामगारांना संपावर जाण्याकरितां वेळोवेळीं साहाय्य केलें आणि संपावर असतांना कामगारांना उपयोगी पडावा म्हणून द्रव्यनिधि जमविला हें सारे प्रकार पाहून धनिक गिरणी मालकांची कामगाराबद्दलची दयाबुद्धि कमी होत चालली होती. 'तुम्हीं हक्क म्हणून कांहीं मागतां कामां नये, आम्ही दयावंत होऊन तुम्हांला सवलती देऊं,' असेंच म्हणणें जवळ जवळ व्यक्त करणारें माल-कांचें वर्तन होऊं लागलें होतें. अलीकडे निरनिराळ्या मार्गांनीं कामगार-

संघाजवळ जेव्हां एक लक्ष दहा हजार रुपये जमले आणि अनेक महिने गिरण्या बंद पाडून संपावर जाण्याची कामगारांना जेव्हां शक्यता उत्पन्न झाली तेव्हां तर मालकांचा विरोध स्पष्ट होऊं लागला. बहुतेक कारखान्यांतून पगारांचे प्रमाण अतिशय कमी होतें. पुरुषाला पगार सामान्यतः तेवीस रुपये आणि बाईला सतरा रुपये मिळावयाचा! पण कामगार संघाच्या वाढत्या सामर्थ्याबरोबर मालकांनीं याही पगारांतून पैसे काटण्यास सुरवात केली. दंड करण्यास काय वाटेल तें निमित्त सांपडूं लागलें! कांहीं गिरण्यांतून संडासावर पाट्या लावण्यांत आल्या होत्या. काय तर म्हणे, 'विडी ओढणारास व निरर्थक वेळ गमावणारास कामावरून दूर केलें जाईल!' आणि असें नियम कोणाच्या डोक्यांतून निघाले, तर विजेच्या पंख्याखालीं बसून लठ्ठ चिरुटाचे झुरके घेतल्याशिवाय ज्यांचें डोकें चालत नसे अशा पगारदार व्यवस्थापकांच्या!

शिवाय कायद्याच्या कक्षेंत न येणारीं कारखान्यांच्या अंतर्भागांतील तंत्रें तर अगदींच विचित्र असत. कामगारांचीं गाऱ्हाणीं जमविण्याचा जो उद्योग शिरीषकुमारांनीं गेलीं दोन वर्षे विशेष नेटानें केला होता त्यावरून कारखान्यांचें अंतरंग थोडें फार कळून येऊं लागलें होतें. हीं गाऱ्हाणीं करतांना कामगार आक्रोश करून सांगत, कीं वीव्हिंग मास्तर व इतर कांहीं अंमलदार लोक आम्हांला नेहमीं मारहाण करतात, माल चांगला मिळत नाहीं, तारा उलट्या येतात व गांठी फार असतात, दंड फार होतात, आजारीपणाकरितां किंवा मयताकरितां रजा मिळत नाहीं, नोकरीवरून भराभर काढून टाकण्यांत येतें, गिरणीनें दिलेल्या सुट्टयांचेही बोनस कांपण्यांत येतें, आणि कामगारांच्या जेवणाचे डबे गिरणींत नेण्यास मनाई आहे! कामगाराला नोकरीला लावल्याबद्दल आणि त्याची नोकरी टिकूं दिल्याबद्दल 'नायकिणींनीं' व वीव्हिंग मास्तरांनीं 'दस्तुरी' घेण्याचें प्रकार तर सरळपणानें सर्वत्र चालूंच होते. कामगार स्त्रियांच्या बाळंतपणाच्या रजेबद्दल तर अनास्थाच

होती. मुंबईत सुमारे पंचाहत्तर गिरण्या होत्या, त्यांपैकीं अवघ्या तेरा गिरण्यांमध्यें बाळंतपणापूर्वी व नंतर रजा मिळत असे. आणि तेरापैकीं निम्यांमधूनच काय तो रजबरोबर पगार देण्यांत येत असे. अशी स्थिति असतांना इतर देशांतील कामगारांचें जग कुठल्याकुठें पुढें चाललें होतें. सुमारें वीस देशांतून बाळंतपणाची पगारी रजा व मदत देण्याची व्यवस्था कायद्यानें केली होती, पण हिंदुस्थानांत ही गोष्ट ऐकूनही माहीत झाली नव्हती. आमच्याकडे कामगारांना रोजनदारीनें मिळणारे वेतन आणेवारींत घुटमळत होतें, त्यावेळीं अमेरिकेंत विटा पाडणारांना रोजीं छत्तीस रुपये, नळ दुरुस्ती करणारांना बत्तीस रुपये, सुताराला तीस आणि गवंडयाला सत्तावीस रुपये मिळत होते. हे सारे प्रकार ध्यानांत घेऊन शिरीषकुमारांचा उद्योग चालू होता. पठाणांचें आणि कामगारांचे कर्जाबद्दलचे व्यवहारही भयंकर असत. कर्जवसुलीच्या दिवशीं दिसणारीं दृश्यें अंगावर कांटा आणतील इतकी अमानुष असत !

शिरीषकुमारांच्या प्रयत्नांनीं सुधारणा होत होती पण ती अगदीं मुंगीच्या पावलानें ! समाधानाची गोष्ट एवढीच होती कीं कामगारांना स्वत्त्वाची जाणीव होऊं लागली होती, आणि त्यांचें सारें श्रेय शिरीषकुमारांना देण्यांत ते कामगारही धन्यता मानीत. ही जाणीव होण्याकरितां शिरीषकुमारांनीं किती कष्ट केले असावेत त्याची कल्पना त्यांच्याकडे पाहिल्याबरोबर येत असे. आंवाक्याबाहेर केलेल्या कष्टांनीं येणारा शुष्कपणा शरीरावर ठाणें देऊन बसला होता. उन्हामध्यें वेळीं अवेळीं हिंडल्यामुळें चेहऱ्याचा मूळ वर्ण पार पालटला होता. त्यांचा मानेपासूनचा डोक्यापर्यंतचा काळवंडलेला भाग पाहून नीरेनें एकदां चेष्टेनें म्हटलेंसुद्धां होतें कीं, "थोडयाच दिवसांत तुम्ही शंकरासारखे नीलकंठ व्हाल !" आणि त्यावर शिरीषकुमारांनीं उत्तर दिलें होतें, "आणि एकाद्या दिवशीं त्याच्यासारखा डोक्यांत राख घालूनही बसेन !"

या सर्व खटाटोपाच्या भरीला रात्रीं आपल्या खोलींत बसल्यानंतरचा त्यांचा उद्योग मात्र अगदीं वेगळा असे ! त्यांची दिवसभराची यातायात

पाहाणाऱ्या कोणाही माणसाला रात्रींच्या या उद्योगाची कल्पना करणेंही अवघड गेलें असतें. हा उद्योग म्हटला म्हणजे समाजशास्त्र आणि भाषाशास्त्र या आवडीच्या विषयांवरील महत्वाचें ग्रंथ वाचून त्यांचीं टिपणें करण्याचा. त्या नादांत मग रात्रीं किती उशीर होईल आणि किती नाहीं याचा कांहीं नियम नाहीं. एकादी रात्र त्या विषयांतील एकादी शंका सुंदर इंग्रजी भाषेंत लिहून काढण्यांत जावयाची, आणि पहाटेच्या वेळेला ते कागद एकाद्या लांब लिफाप्यांत घालून तो परदेशीं रवाना करण्याकरितां सज्ज राखला जावयाचा! शेजारच्या खोलींत निजणाऱ्या नीरेला किंवा माईला मध्यरात्र उलटून गेल्यावर दोन चार मिनिटें अर्धवट जाग आली, तर पलीकडच्या खोलींत पुस्तकाचीं पानें उलटल्याचा आवाज ऐकूं आल्याशिवाय रहात नसे. कुणाकडून तरी मागून आणलेलीं पुस्तकें परत करण्याची नेहमीं घाई असावयाची. म्हणून शक्य तितक्या जलदीनें त्याचीं टिपणें करण्याचें काम रात्रीच्या झोपेला फाटा देऊन चालू राहावयाचें! आणि त्यामुळें सकाळीं उठायला उशीर हा बहुधा ठरलेलाच असे, पण शिकवणीला जाण्याची तडण असल्यामुळें शय्येंत पडून राहण्याचें सुखही त्यांना मनसोक्त अनुभवितां येत नसे.

असल्या ठराविक कायक्रमांत भेटायला येणाऱ्या माणसांनाही फारसा मज्जाव नसावयाचा. बहुधा भेटण्याची वेळ म्हणजे रात्रीं नऊच्या पुढें. मग भेटावयास आलेला माणूस एखाद्या वेळीं अकरा वाजेपर्यंतही बसून जात असे. उपनगरांतून स्थापन केलेल्या पोटसंघाचे चिटणीस याचवेळीं यावयाचें. वर्तमानपत्राचें बातमीदार, मासिकांचें संपादक, आणि सार्वजनिक पुढारी यांच्यापैकीं कोणी ना कोणी यावयाचें आणि त्यांनीं एकादा वादाचा विषय काढून शिरीषकुमारांना खूप बोलावयास लावावयाचें, असेंही प्रकार मधून मधून होत. 'स्त्रियांनीं रंगभूमीवर कामें करावी कीं न करावी' या साध्या विषयापासून तों 'भगवद्गीतेचा आज उपयोग कोणता' या वेदान्ती विषयापर्यंत साऱ्या गोष्टींची चर्चा व्हावयाची! माईला या साऱ्या चर्चा एकाच महत्वाच्या वाटत. किंबहुना तिचें

तिकडे फारसें लक्षही नसे. नीरेला मात्र त्या साऱ्याच ऐकाव्याशा वाटत. शिरीषकुमारांची प्रत्येक विषयाचा विचार करण्याची पद्धत अभिनिवेशाची नसून शास्त्रीयदृष्टीनें त्या त्या विषयांची चिकित्सा करण्याकडे असल्यामुळें कोणत्याही चर्चेवर नवीन प्रकाश पडे. नीरेच्या मनाला त्या चर्चा ऐकतांना कांही कांहीं वेळां धक्का बसे. त्याचें कारण शिरीषकुमारांचा अनेक रूढ कल्पनांबद्दलचा अश्रद्धपणा होय. त्या अश्रद्धपणांतूनच नवीन विचाराची परंपरा निर्माण होत असे.

कालच्या रात्रींचा प्रकार कांहींसा असाच झाला. ' सागर ' मासिकाचे दादासाहेब आनंदकर शिरीषकुमारांची गांठ घेण्याकरितां आले होते. कांहीं इकडचे तिकडचे विषय निघून बोलण्याचा ओघ शिरीषकुमारांच्या स्वतांच्याच जीवनक्रमावर येऊन ठेपला. आपले कांहीं अनुभव शिरीषकुमार बोलून दाखवीत असतां दादासाहेबांनीं त्यांना ते सारे अनुभव लेखरूपानें आपल्या मासिकाला देण्याची विनंति केली. त्यावेळीं शिरीषकुमारांनीं म्हटलें,

" तसा प्रयत्न मी एकदां करून पाहिला होता. इथल्या एका वर्तमानपत्रानं मला असंच कांहीं स्वतांबद्दल लिहून मागितलं होतं. मीही त्याप्रमाणं कांहीं लिहिण्याचा प्रयत्न केला. पण त्यांत सार्वजनिक मनोरंजनाचा असा कांहींच भाग न येतां स्वतांच्या वैयक्तिक विकासाचं एकाद्या कादंबरीत घालण्यासारखं वर्णन माझ्या हातून लिहून झालं. तें वर्णन मी पुरं लिहून काढलं, पण छापायला मात्र दिलें नाहीं. इतर अनेकांच्या आयुष्यांत छापलेल्या मुलाखतीचं फार महत्व असत. तसं म्हटलं आपण न छापलेल्या मुलाखतींचंच महत्व राखावं. "

दादासाहेबांनी ती न छापलेली मुलाखत वाचावयास मागितली. पण त्या बाबतींत त्यांना खुपणार नाहीं अशा बेतानें शिरीषकुमारांनीं नकार भरला आणि हंसण्यावारी सारा विषय घालविण्याकरितां म्हटलें, ' तसं विशेष महत्वाचं कांहींच नाहीं. मला मात्र कधीं कधीं ते कागद,

वाचीत बसण्यांत मोठी मौज वाटते आणि गमतींने मी ते वाचीत बसतोंही.'

कालच्या रात्रीचें हें भाषण नीरेनें आंतल्या खोलींत बसून ऐकलें होतें आणि त्या लिहून ठेवलेल्या मुलाखतीबद्दलची तिची जिज्ञासा तीव्रतेनें जागी झाली होती. पण शिरीषकुमारांचा एकंदर स्वभाव लक्षांत घेतां ही आपली जिज्ञासा सहजासहजी तृप्त होणार नाहीं हे मनांत येऊन ती कांहींशी खिन्न झाली होती. आज सकाळपासूनच शिरीषकुमार नेहमींप्रमाणें बाहेर पडले होते. दहा वाजतां जेवण झाल्यावर अनाथालयांत जाण्याकरितां ती निघाली होती. शिरीषकुमारांच्या खोलीतील आरशांत निघतां निघतां पाहून जाण्याचा तिचा नित्याचा क्रम असे, त्याप्रमाणें आजही ती तेथें आली, आणि तिनें सहज टेबलाकडे पाहिलें तों त्यावर घडी करून ठेवलेली एक कागदांची जुडी होती. वर सुवाच्य अक्षरांत लिहिलें होतें.—'न छापलेली मुलाखत'—तीं अक्षरें वाचल्याबरोबर तिची जिज्ञासा जागृत झाली. मनाचा सारा संकोच एकदम आवरून धरून तिनें ते कागद उचलले आणि अनाथालयाचा मार्ग धरला!

× × ×

"मी माझ्या आयुष्याकडे मागें वळून पाहातों तेव्हां त्यांत झालेलीं निरनिराळीं आकस्मिक स्थित्यंतरें डोळयांपुढें उभीं राहातात, आणि माझें मलाच राहून राहून आश्चर्य वाटूं लागतें. किंबहुना इतकीं स्थित्यंतरें माझ्या आयुष्यांत कशीं घडलीं असाही मला प्रश्न पडतो. पण तीं घडली आहेत खरीं. इतकेंच नव्हे तर तीं घडल्यानें माझ्या व्यक्तित्वाचा निरनिराळ्या बाजूंनीं विकास होत गेला आहे.

आमचें मूळ घराणें कोंकणांतच कुठें तरी असलें पाहिजे. आडनांवावरून संबंधच लावावयाचा झाला तर तो कदाचित् सरदार घराण्याशींही लागूं शकेल. माझ्याजवळ फक्त सरदार घराण्याचं नांव आहे. बाकी कांही नाहीं. कोंकणांतलें आमचें गांव कोणतें होतें कुणास ठाऊक. पण आमच्या

अलीकडच्या सहासात पिढ्या सातारा जिल्ह्यांतच गेल्या. वाईच्या आसपास शेती पैदा करून त्या क्षेत्रामध्यें आमच्या पूर्वजांनीं वस्ती केली. माझे आजोबा माझ्या पाहाण्यांत आहेत. मी त्यांच्याजवळ लहानपणीं कांहीं दिवस होतों. माझे वडीलही मला चांगले आठवतात. वांईमधील कित्येक माणसें अद्यापही आमच्या आजोबांच्या आणि वडिलांच्या गोष्टी मोठ्या रसभरितपणानें वर्णन करून सांगतात.

माझ्या आजोबांचा स्वभाव फार मनस्वी होता. पेशवाईच्या सरत्या सरत्या वैभावांतले दिवस त्यांनीं पाहिले होते. स्वराज्यनाशाच्या भयंकर निराशेचा जाच कमी करण्याकरितां लोकांना आपली मनं अष्टौप्रहर विलासांत कशीं बुडवून टाकली त्याची माहिती कांहीं ओळखीचीं उदाहरणें देऊन आजोबा सांगत, तें मी लहानपणीं ऐकल्याचें आठवतें. वाईसारख्या सनातनी ब्राह्मण वस्तीच्या गांवात त्यावेळीं कोणत्याच नवीन विचारांचे वारे पोंचणें शक्य नव्हतें. इतिहास, भूगोल इत्यादींचें लोकांचें ज्ञान अगदीं अजब असें. बाहेरच्या जगाशीं म्हणजे पुणें-मुंबईसारख्या पुढारलेल्या गांवाशीं वांईचा फारसा संबंध येत नसे. आगगाडी गांठण्याकरितां वाठार स्टेशनपर्यंत वीस मैलाचा टांग्याचा प्रवास करावा लागे. लोकांजवळ घरीं बसून खाण्याकरितां धान्य आणि भाजीपाला असे. पण प्रवासाकरितां पैसे खर्च करण्याइतकी चलनी नाणी कुणाजवळच सहसा नसत. लोकांमधील देवाणघेवाणीचे व्यवहार हे पैशापेक्षां पदार्थांनींच पुष्कळदां होत असत.

प्रत्येकाची थोडीफार शेतवाडी, राहातें घर, गोठ्यांत एकदोन गुरें इतकी जिंदगी सामान्यत: असावयाची. परसांत फळभाजी लावलेली असावयाची. ब्राह्मणानें दूध, ताक इत्यादि विकावयाचें नाहीं हा नियम सरसहा पाळला जात होता. माझे वडील आणि त्यांचे कांहीं समवयस्क इंग्रजी शिकलेले स्नेही यांनीं एक इंग्रजी शाळा चालू केली होती. ही इंग्रजी शाळा हेंच काय ते त्या गांवाचे आधुनिक पद्धतीचें वैभव होतें. गांवांत सरकारी दवाखाना असे. त्याचा उपयोग करून घेण्याचा लोक बहुतेक कंटाळाच

करीत. जुनीं पूर्वापार चालत आलेली कां " देशी औषधें गांवांतल्या वृद्ध लोकांना माहीत होतीं. त्या औषधांना पैसे पडत नसत. एकमेकांच्या उपयोगी पडावयाची लोकांची प्रवृत्ति फार असावयाची. कुठल्याही घरांतली कोणतीही गोष्ट गुप्त राखतां येणें मुश्कील होई. उपयोगीं पडण्याच्या इच्छेमुळें साऱ्या लोकांच्या ठिकाणीं एक प्रकारचा चौकसपणा बाणलेला होता. त्या चौकसपणापुढें कसलीच लपवालपवी टिकत नसे.

वांईतील घाट ही त्या काळांतील एक प्रचंड संस्था होती. कारण बहुतेक स्त्रीपुरुष स्नानाकरितां आणि धुणें धुवून नेण्याकरितां कृष्णेच्या घाटावर येत. तेथील लोक कृष्णा नदीला दक्षिण हिंदुस्थानांतील भागीरथी मानीत. त्यामुळें रोज गंगास्नान घडावें या हेतूनें सारे लोक घाटावर गोळा होत. दोन तीन तास सारे घाट माणसांनीं अगदीं फुलून जात. धुणीं धुणाऱ्या स्त्रियांचे हात जितक्या जलदीनें चालत त्यापेक्षाही अधिक जलदीनें त्यांचीं तोंडे चाललेलीं असत. प्रत्येक घराची त्या घाटावरील बोलण्यांतून झडती होऊन जावयाची. माझे आजोबा घाटावर जावयाचे ते लांबून दिसल्याबरोबर लोक त्यांना जागा करून देत. कुणाला काय बालतील त्याचा नियम नसे. लोक बोलणें ऐकून घेत त्याचें कारण त्यांच्या स्वभावांत जितका स्पष्टवक्तेपणा होता तितकाच दुसऱ्याच्या उपयोगी पडण्याचा गुण होता. त्यांचे थोडक्यांत वर्णन करावयाचें झालें तर अनेक तीव्र गुणावगुणांच्या संमिश्रणानें तयार झालेला एक आग्रही पुरुष असें करतां येईल ! मी त्यांना उत्तरकालांत पाहिलें. त्यांच्या तारुण्यांतल्या तडफदारपणाच्या अनेक गोष्टी अजूनही कांहीं वृद्ध लोक सांगतात. त्या गोष्टी एकून मला तर कित्येकवेळां असें वाटतें कीं हा तडफदारपणा खरोखर योग्य मार्गाला लागला असतां तर फार मोठें कार्य झालें असतें !

दुसऱ्या कोणीं एकादी गोष्ट अशक्य म्हटली कीं ती मुद्दाम करावयाची असा त्यांचा एक विचित्र स्वभाव होता. एकदां त्यांना कुणीतरी मथुरेकडील एक चाल सांगितली. कार्तिक महिन्यांत तिकडे कांहीं कांहीं

गांवांतुन गांवातल्या साऱ्या सुवासिनींना जाहीर समारंभानें तैलाभ्यंग स्नानें घालतात. हकिकत सांगून झाल्यावर तो गृहस्थ सहज बोलून गेला कीं 'असले स्नानाचे प्रकार आपल्याकडे नाहीं शक्य व्हावयाचे!' त्याबरोबर आजाबांच्या आग्रही स्वभावानें उचल घेतली आणि त्या माणसाला त्यांनीं तावडतोब म्हटलें, "कां? शक्य कां नाहीं! उद्यां सकाळचि पहा काय करतों तें!" आणि आपले म्हणणें त्यांनीं अक्षरशः खरें केलें. स्वतां घरोघर जाऊन त्यांनीं गांवांतलि स्त्रियांना आमंत्रणें दिलीं. आमंत्रणें स्वीकारण्यांसंबंधांत जेव्हां संकोच दिसूं लागला तेव्हां आपल्या तापट स्वभावाला अनुसरून त्यांनीं एक ठराविक वाक्य सर्वत्र उच्चारण्याचा सपाटा चालविला. "जी जातिवंत सुवासिनी असेल ती स्नानाला आल्याशिवाय राहायची नाहीं." अशी अट घालणारें वाक्य घरोघर उच्चारलें गेल्यावर दुसऱ्या दिवशीं आमच्या घराच्या पुढल्या चौकांत साऱ्या स्त्रिया लोटल्या. ठिकठिकाणी मागून आणलेले पाण्याचे हांडे चर खणून पहाटेपासूनच तापत ठेवलें होतें. रात्रभर आजोबांनीं जाग्रण केलें. अकरा वाजेपर्यंत सर्व स्त्रिया न्हाऊन गेल्या!

कृष्णेचा उत्सव करण्याची चाल वाईंत अद्यापही आहे. प्रत्येक आळींतले लोक आपापल्या घाटावर साऱ्या गांवांतल्या ब्राह्मणांना मुक्तद्वार जेवण घालतात. महिनाभर हे उत्सव चाललेले असतात. रात्रीं कीर्तनें होतात. पूर्वी एकेकाळीं या उत्सवांना फार तेज असें. आळींतर्फे उत्सवाची व्यवस्था पाहाणारे पंच असत. आपल्या तारुण्यांत माझ्या आजोबांनीं पंच म्हणून सर्वत्र आपली फार जरब बसविली होती. जेवणाकरितां कोणतें पक्वान्न करावें हें ठरविण्यापासून मंडप घालण्यापर्यंतचीं सारीं कामें आजोबा पुढाकार घेऊन पार पाडीत. कांही कारणानें एके वर्षी भांडणें झालीं, तेव्हां आजोबांनीं मोठ्या ईर्ष्येनें आपला स्वतःचा वेगळा उत्सव साजरा केला. साऱ्या आळीकरांनीं त्यांची फजीति करण्याचा घाट घातला! विशेषत. त्यांच्या उत्सवाला चांगला नामांकित कीर्तनकार मिळूं नये म्हणून खटपट

करण्यांत आली होती. इतकेंच नव्हे तर आजोबांच्या या नवीन उत्सवाच्या वेळीं त्यांचा मंडप निर्मक्षिक व्हावा म्हणून त्यावेळचे प्रसिद्ध हरदास नारायणबुवा फलटणकर यांचीं कीर्तनें गांवांत मुद्दाम ठेवण्यांत आलीं. माझ्या आजोबासारख्या तडफदार तरुणाची ती मोठी परीक्षेची वेळ होती. तसें पाहिलें तर तें त्या लहानशा गांवांतलं किती क्षुल्लक स्वरूपाचं राजकारण होतं! पण त्यावेळीं त्या साऱ्यांना तें गांवच जग होऊन राहिलं होतं. आजोबांना कथाकीर्तनें ऐकण्याचा लहानपणापासूनच भारी छंद होता. याच नारायणबुवाचीं कांहीं कांहीं आख्यानं त्यांना तोंडपाठ होतीं. पण गृहस्थ-पेशाच्या त्यावेळच्या संकुचित कल्पनांमुळें गाणं म्हणणं किंवा गाण्याची आवड दाखविणं हें त्यावेळीं गौणपणाचं ठरे. त्यामुळें त्यांच्याबद्दल लोकांना कांहींच कल्पना करतां येईना. एकदोघा समवयस्क मंडळींनीं त्यांना 'आज कीर्तन कोणाचं?' असा प्रश्न विचारला, तेव्हां त्यांनीं सांगितलं 'हरदास तुमच्यासमोर उभाच आहे.' नारायणबुवांनीं गांवांत दुसरीकडे कीर्तन करण्याचें नाकारलें. तेव्हां सर्व गांव नारायणबुवांसह आमच्या आजोबांच्या कीर्तनाला येऊन दाखल झाला. आजोबांच्या प्रत्येक भावनेचा उमाळा हा तीव्र असायचा. संताप, हट्ट, आग्रह हे जसे कडोविकडीचे तशी दया, शोक इत्यादींची आर्तताही जबरदस्त असावयाची. सभामंडपांत नारायण-बुवांना पाहून त्यांना गहिंवर आला आणि नारायणबुवांना उद्देशून त्यांनी 'आपुलिया बळें नाहीं बोलवत। सखा कृपावंत वाचा त्याची!' हा अभंग अस्सल रागदारींत आणि खड्या स्वरांत म्हटला. त्या भरदार गळ्यांत अन्तःकरणांतल्या साऱ्या तीव्र भावनांची आर्तता मिसळून गेल्यामुळें सारी सभा स्तंभित झाली. चेष्टा करण्याकरितां आलेले लोक प्रशंसा करीत घरोघर निघून गेले.

'एक कथा चांगली केली म्हणून काय झालं? नारायणबुवांनीं अशा एक लक्ष कथा केल्या आहेत,' अशी कुणीतरी हेटाळणी केल्याचें आजो-बांच्या कानावर गेलें. त्याबरोबर त्यांनीं मोठ्या आवेशानें एक लक्ष कथा

करण्याचा संकल्प सोडला. आणि हा संकल्प त्यांनीं खरा करून दाखविला. गांवोगांव कथा करीत करीत त्यांनीं काशी गांठली, आणि काशीयात्रेचें पुण्य जोडून घरचा रस्ता धरला. ठिकठिकाणीं मानसन्मान होऊन जे पैसे मिळाले होते ते त्यांनीं गांवीं आल्याबरोबर गोरगरीबांना वांटून टाकले. काशीयात्रेचें मावंदेंही त्यांनीं खूप थाटानें केलें. त्या दिवशीं सहसा अशक्य वाटणारें खव्याचें एक पक्वान्न त्यांनीं करविलें. आणि साऱ्या गांवाला जेवावयाला घातलें. त्या दिवशीं द्यावयाच्या दक्षिणेची एक मौज लोक सांगतात. कांहीं कारणानें पैसे सुटे करण्याचें राहून गेलें. मागला भात संपत आला त्यावेळीं आजोबा सोवळयानेंच धांवत धांवत बाजारपेठेंत गेले. मोड मिळायला उशीर लागला. पंक्तीवर बसलेल्या लोकांचे हात वाळून गेले. आजोबा परत आलेले पाहून कुणी तरी त्यांच्या या हलगर्जीपणाचा निषेध केला. तें त्यांना सहन झालें नाहीं. त्यांनीं एकदम म्हटलें, "दक्षिणा लवकर दिली काय नि उशिरां दिली काय? उद्यां हेच लोक आपसुख जेवावयास येतील!"

माझे आजोबा तिशाव्या वर्षीं विधुर झालें होतें. त्यावेळीं त्यांना माझे वडील व त्यांच्या पाठीवरची एक बहीण एवढीं दोनच मुलें होतीं. स्वतां आजोबांना सावत्र आईमुळें अतिशय त्रास झाला होता. त्यामुळें त्यानीं पत्नीच्या निधनानंतर विधुर राहण्याचें ठरविलें, आणि आपल्या मुलांचें स्वतांच्या प्रवृत्तीला अनुसरून मनःपूर्वक पालनपोषण केलें. त्यावेळीं सामदामदंडादि सारे प्रकार करून लोकांनीं त्यांना चतुर्भुज होण्याचा आग्रह करून पाहिला. पण तो सारा आग्रह त्यानीं व्यर्थ ठरविला. ते कडकडीत विधुर होते. पण विघ्नसंतोषी लोकांनीं त्यांच्या कडकडीतपणाला वैगुण्य आणण्याचें बरेच प्रयत्न करून पाहिलें. एकदां तर नदीकांठच्या देवळाच्या कोंपऱ्यावर एक लहान अर्भक मारून टाकलेलें होतें, तिथें खूप गर्दी जमा झाली असतांना कांहीं टवाळखोरांनीं त्या प्रकरणाचा आजोबांच्या नांवाशीं संबंध जोडण्याचा प्रयत्न केला.

त्यावेळीं त्यांनीं साऱ्या लोकांना उद्देशून म्हटलें, "हा मूर्खांनों, असं मूल मला झालं असतं, अगदीं वाईट मार्गानं जरी झालं असतं, तरी तें मीं जवळ बाळगून वाढविलं असतं. असला भ्याडपणा केला नसता.'

माझे वडील लहान असतांना शाळेंत जात. शाळेंत कांहीं तरी कारणावरून त्यांना शिक्षक रागावले आणि शिक्षकांनीं त्यांना मारही दिला. ती गोष्ट कळल्याबरोबर आजोबांनीं मनाशीं निश्चय केला कीं आपणच घरीं शाळा काढावयाची. निश्चयाप्रमाणें त्यांनीं शाळा काढली आणि फुकट शाळा असल्यामुळें त्यांच्या शाळेंत विद्यार्थ्यांची भरतीही चांगली झाली. मुलाच्या चार इयत्ता झाल्यावर शाळेचा कार्यभाग संपला म्हणून आजोबांनीं आपल्या हातानींचें शाळा बंद केली.

त्यांच्या मुलीच्या लग्नाच्या वेळचा प्रकार असाच! लग्न झाल्यावर मांडवपरतण्याचें जेवण होतें. त्या वेळेला जांवयानें रुसून कांहींतरी अवघड मागणी करावी आणि ती मागणी पुरी झाल्यावर जेवण्याकरितां उठावें असा रिवाज असे. त्याला अनुसरून प्रकार घडला. जांवईबुवा रुसले. 'सोन्याच्या खडावा पायांत घालून, दिवटी मशाली लावून माझी मिरवणूक निघाली पाहिजे' असा त्यांनीं हट्ट धरला. त्यावेळची तरी अशी होती कीं, काय वाटेल तें झालें तरी वधूपक्षानें असली, कोणतीही मागणी निमूटपणें मान्य करावयाची. पण आजोबांचा अहंकार दुखावला गेला होता. त्यांनी तिरीमिरीनें उत्तर केलें, "आपण संन्यास घ्या म्हणजे आपल्या पायांत खडावा घालतो.'' लग्नविधीचें सूप वाजण्यापूर्वीच झालेली ही संन्यासाची भाषा वरपक्षीयांना अशुभसूचक वाटली आणि त्यांनीं मुलगी टाकून देण्याची धमकी दिली. "माझी मुलगी विधवा झाली,'' असा जबाब देऊन आजोबांनीं तो 'मंगलप्रसंग' संपवून टाकला! आणि आमची आत्या खरोखरच मरेपर्यंत अहेवपणानें माहेरींच राहिली होती!

आजोबांचा मृत्यु तर त्यांच्या आग्रही स्वभावानेंच ओढवून आणला यांत शंका नाहीं. एका बखळींत एक झाड होतं. तें कीड लागून पोखरलेलं होतं. मुलामुलांनीं झाडावर चढण्याबद्दलच्या पैजा लावण्याचें बोलणें चालवलें होतें. कांहीं मुलें झाड पोखरलें असल्याचें सुचवीत होती. आजोबा तेथून सहज चालले होते. वास्तविक त्यांचें वय झालें होतें. त्यांनीं आपला नेहमींचा आग्रही स्वभाव कह्यांत ठेवायला हवा होता. पण 'स्वभावो दुरतिक्रमः !' हेंच शेवटीं खरें. त्यांनीं धोतर सावरून कांचा कसला आणि लहानपणाच्या संवयीप्रमाणें तें झाडावर चढले. पण कुठें तरी जास्त भार पडून झाड कडाडलें आणि मोडलें. आजोबा खालीं पडले ते बेशुद्ध झाले. त्या आजारांतून ते उठले नाहींत. पंधरा दिवसांत त्यांचा अंत झाला.

अशा माणसाच्या सान्निध्यांत माझ्या बाल्याचा कांहीं भाग गेलेला आहे. एकादा मानसशास्त्रविशारद कदाचित् माझ्यावर झालेले या सान्निध्याचे सूक्ष्म परिणाम अजमावूं शकेल. पण त्यानें तशी घाई करण्या-पूर्वीं मी त्याला थोपवून सांगेन कीं, 'थांब, माझ्या मनोरचनेच्या घटनेंत माझे आईबापही माझ्या आजोबांचे वांटेकरी आहेत !'



## प्रकरण १६ वें.

# माता पितरांचें ऋण !

—:०:—

माझ्या वडिलांच्यावेळीं वांईत इंग्रजी शिक्षणाची फारशी सोय नव्हती, त्यामुळें त्यांना वाई सोडावी लागली. वाई सोडण्यासंबंधांत बापलेकांत बराच मतभेद झाला. आजोबांचें म्हणणें कांहीं झालें तरी वाई सोडूं नये असें होतें. पण नवीन इंग्रजी शिक्षण मिळविण्याची माझ्या वडिलांची जबरदस्त महत्त्वाकांक्षा होती. शेवटीं वडिलांच्या इच्छाशक्तीनें मात केली आणि माझे वडील पुढील अभ्यासक्रमाकरितां पुण्यास आले. त्यावेळीं कुठल्याही कोंवळ्या विद्यार्थ्याला न्यूइंग्लिश स्कूलचें फार मोठें आकर्षण वाटे. टिळक संस्थेचा राजीनामा देऊन सार्वजनिक चळवळींत पूर्णपणें पडले होते. आगरकरांचा 'सुधारक' नुकताच निघाला होता. वादांचे स्फुलिंग वातावरणांत तेजस्वीपणानें वावरत होते. न्यूइंग्लिश स्कूलच्या अध्यापक मंडळांत प्रि. आपटे, प्रो. गोळे, प्रो. लेले प्रभृति त्याकाळचे अतिशय लोकप्रिय शिक्षक होते, आणि लांबलांबचे विद्यार्थी शाळेकडे ओढ घेत होते.

वडिलांना विशेष सहवास घडला तो आगरकरांचा. तो घडण्याला कारणेंही तशींच होतीं. लहान मुलगा ! पुण्यासारख्या मोठ्या शहरांत आलेला, गांवांत कुणाची फारशी ओळख नाहीं. अशा स्थितींत त्यांच्यापुढें एकच आदर्शमूर्ति होती आणि ती म्हणजे आगरकर. त्यांच्याबद्दलच्या साऱ्या गोष्टी ठिकठिकाणीं पसरल्या होत्या. विद्यार्थी असतांना त्यांनीं हालअपेष्टा सहन केल्या, एका सदऱ्यावर काम भागविलें, कमेटीच्या दिव्यावर

अभ्यास केला, प्रसंगविशेषीं कंपाउंडरचेंही काम केलें पण आपलें ध्येय सोडलें नाहीं. आपण आगरकरांनाच भेटावें असें वडिलांना वाटलें आणि त्यांनीं त्याप्रमाणें गांठ घतली. आगरकरांनीं त्यांना आपल्या घरीं ठेवून घेतलें. जुन्या परंपरेंत वाढलेल्या माझ्या वडिलांचें अक्षर फार सुंदर होतें. दम्यामुळें कित्येक वेळां थकवा आला असतांना आगरकर सुधारकांतले आपले लेख तोंडीं सांगून लिहून घेत. या कामीं त्यांना माझ्या वडिलांचा फार उपयोग होई.

वाई सोडल्याबद्दल माझ्या वडिलांना एकप्रकारचा आनंदच वाटला. कारण कुणीकडे त्या कुग्रामांतील घाटावरच्या उत्सवांच्या त्या वैयक्तिक चुरशी ! आणि कुणीकडे हे संमतिवयाचे, चहाग्रामण्यप्रकरणाचें आणि सामाजिक परिषदेच्या मंडपांचे सार्वजनीक वाद ! आपण अगदीं वेगळ्या जगांत येऊन पडलों असें त्यावेळीं त्यांस वाटूं लागलें असल्यास आश्चर्य नाहीं. माझ्या वडिलांचे वाईंतील कांहीं जुने स्नेही अद्यापही माझ्या वडिलांची त्यावेळचीं पुण्याहून आलेलीं पत्रें दाखवितात त्यांवरून त्यांच्या त्यावेळच्या मनोवृत्तीची चांगली कल्पना करतां येते. त्यांच्या वयाच्या मानानें या चळवळी फार मोठ्या होत्या. पण त्यांतही आगरकरांच्या प्रोत्साहनानें ते हजर राहण्यापुरता मोठ्या हौशीनें भाग घेत. एका शिमग्यांत आगरकरांची प्रेतयात्रा काढण्यांत आली, त्यावेळीं माझ्या वडिलांसारखे आगरकरांचे कांहीं आवडते विद्यार्थी एका मित्राच्या खोलींत मोठ्या खिन्न मनानें जमले. त्यांच्या कोवळ्या मनावरील रूढीचे परिणाम फार खोलवर रुजलेले होते, त्यामुळें त्या सर्व विद्यार्थ्यांना जीवंत-पणीं प्रेतयात्रा काढण्याचा प्रकार अतिशय अशुभ वाटला ! त्यांतलि कांहीं जण तर हुंदके देऊन ढसढसां रडले! शेवटीं सर्व जणांनीं आगरकरांच फोटो मध्यें ठेवला आणि त्याची शपथ घेऊन ठरविलें कीं, ‘ शिक्षणक्रम आटोपला कीं सर्वांनीं आपापल्या गांवीं जावयाचें आणि पुण्यांतलि आगरकरांच्या विचाराचे लोण तेथपर्यंत पोंचवून प्रत्यक्ष कृतीनें त्याला

साथ द्यावयाची !' या शपथेनें मन शांत झाले होतें तरी रात्रीं घरीं आगरकरांच्याबरोबर जेवावयास बसल्यावर वडिलांचा घास घशाखाली उतरेना. ज्याची सबंध दिवसभर हव्यातशा शब्दांनीं गांवांत नाचक्की होत होती आणि जीवंतपणी ज्यांची प्रेतयात्रा काढण्यांत आली, त्या पुरुषाचें सारे वर्तन धीरगंभीरपणानें चालू होतें. रोजच्यासारखाच जेवणाचा क्रम सुरु होता. उद्वेगाचा यत्किंचितही मागमूस नव्हता ! ती त्यांची वृत्ति पाहून कुणालाही गहिंवरून आलें असतें !

मुलामुलींच्या लग्नाचीं वयोमर्यादा वाढावी म्हणून आगरकरांनीं केलेलें जिवाचें रान या नवीन तरुणांनीं प्रत्यक्ष पाहिलें होतें. त्यामुळें आपली लग्नें शक्यतोंवर उशीरा करण्याचा या विद्यार्थ्यांनीं निश्चय केला होता. पण बहुतेकांच्या बाबतींत रूढिप्रिय वडिलधाऱ्या माणसांच्या कठोर फुंकरांनीं या निश्चयांच्या वातव्या झाल्या. माझ्या वडिलांचे लग्न तर बाईस आजोबांनीं परस्परच ठरविलें. आजोबांचा स्वभाव तर करीन ती पूर्व अशांतला ! त्यावेळीं मुलांनीं स्पष्टपणानें वडिलाधाऱ्या माणसांच्या मतांना विरोध करणें फार मुष्कीलीचें असे ! शेवटीं सारा मनस्ताप गुंडाळून ठेवून वडिलांना लग्न करून घ्यावें लागलें. आमचे आजोबा विधुर असल्यामुळें घर चालविण्यास कुणीतरी बाई माणूस पाहिजे म्हणून त्यांनीं मोठ्या तांतडीनें हें लग्न ठरविलें होतें. माईसारखीं देखणी आणि चतुर मुलगी बायको म्हणून मिळाल्यामुळें वडिलांना त्या दृष्टीनें तक्रारीला फारशी जागा नव्हती. तरीपण आगरकरांच्या विचारांचा पगडा मनावर दृढपणानें असल्यामुळें आपण संसार करण्यास लागावें असें माझ्या वडिलांना किती दिवस तरी वाटत नव्हते. माझ्या जन्मापूर्वी आणि जन्मानंतरही या नवीन सुधारणेच्या विचारांच्या कल्पनेनें माझे वडील सर्वसामान्य तऱ्हेचा संसार मांडण्यास तयार होईनात. राजकीय व सामाजिक सुधारणा करण्याकरिता आपणांस जरी सर्वसंगपरित्यागी होतां आलें नाहीं तरी निदान आपण पुष्कळ अंशीं वैराग्यशील आचरण राखलें पाहिजे अशी माझ्या वडिलांची वृत्ति

होती. निदान माईच्या सांगण्यावरून ते असे वैराग्यशील होते असें स्पष्ट दिसतें. मला तर वाटतें, संसारी व्हावें कीं विरागी राहावें याबद्दल त्यांच्या मनांत एकसारखें द्वंद्व माजून राहिलें असलें पाहिजे. त्या द्वंद्वाचे परिणाम त्यांच्या पत्नीला जरी बऱ्याच अंशी भोगावें लागले असले, तरी त्यांतूनच त्यांची कर्तबगारी निर्माण झाली हेंही पुष्कळ अंशीं खरें आहे.

पुण्यांत राहूनच त्यांनीं बी. ए. पर्यंतचें आपलें शिक्षण पार पाडलें. माझे वडील बी. ए. झालें, तेव्हां मी दोन तीन वर्षांचा असेन. मुलगा बी. ए. झाला, त्याला मोठ्या पगाराची नोकरी लागणार असें ओझरतें मनोराज्य आजोबांनीं त्या काळाला अनुसरून स्वतांसमोर उभें केलें असल्यास आश्चर्य नाहीं. पण या बाबतींत मुलानें त्यांचीं पूर्ण निराशा केली. माझ्या वडिलांनीं आजोबांना स्पष्ट सांगून टाकलें कीं, "माझा विचार आपल्या गांवाची सुधारणा करावी असा आहे. शाळा काढावी, वर्तमानपत्र चालवावें, मुलींना शिक्षण द्यावें, गोरगरिबांना शहाणें करावें, असल्या अनेक गोष्टी माझ्या मनांत आहेत. कुटुंबाची मी हेळसांड करीन अशांतला भाग नाहीं. पण कुटुंबांतच रमून जावें हें मला कसेसेंच वाटतें. केवळ खानेसुमारींत भर पाडण्यानेंच आपल्या जन्माचें चीज होऊं नये, आपल्या हातून कांहीं तरी नांव घेण्यासारखी कामगिरी व्हावी अशी माझी फार फार मनीषा आहे. शिक्षण संपादन करण्याकरितां मी फार कष्ट केले, ते कष्ट मला सुसह्य झालें त्याचें कारण मी असल्या-प्रकारची मनीषा बाळगीत आलों हेंच होय. आपण संतुष्ट व्हाल अशाच प्रकारची कांहीं तरी कामगिरी मी करून दाखवीन असा मला आत्मविश्वास वाटतो. माझ्याही मनःसमाधानाचा आपण थोडासा विचार करावा. आगरकरांनीं जें मोठ्या प्रमाणावर केलें तें निदान आपल्या गांवा-पुरतें तरी आपण करावें अशी माझी इच्छा आहे." वडिलांच्या या उत्तरानें आजोबांची निराशा झाली आणि त्यांना माझ्या वडिलांचा फार

रागही आला. त्याहीपेक्षां, खरें म्हणजे, आपलें म्हणणें खरें करीत राहाण्याची संवय जन्मभर अंगीं मुरल्यामुळें त्यांना या बाबतींत झालेल्या पराभवानें शल्य बोंचत राहिलें.

माझे वडील पदवीधर होऊन वाईत आले त्यावेळी आगरकर वारल्याला सहा वर्षे होत आलीं होतीं. आगरकरांच्या आकस्मिक मृत्यूच्या वेळीं माझे वडिल पुण्यांतच होते. त्यांच्या मृत्यूचें दुःख पुण्यांतल्या विद्यार्थिगणाला फार झालें. ते अतिशय विद्यार्थिप्रिय होते. 'आगरकर हे एकाद्या ऋषीसारखे वाटतात,' असें त्या वेळच्या एका पत्रांत माझ्या वडिलांनीं वर्णन केलेलें मीं वाचलें आहे. अशा ऋषितुल्य वृत्तीच्या पुरुषाचा मृत्यू लोकांना किती जाणवला असेल त्याची कल्पनाच केलेली बरी. त्या मृत्यूनंतर 'आगरकरांचें सर्व चेले,' एका रात्रीं एकत्र जमले, आणि त्यांनीं मोठ्या तळमळीनें आगरकराचें कार्य पुढें चालविण्याबद्दल शपथा घेतल्या. यावेळच्या शपथविधीचीही मी एक मोठी मौज ऐकली आहे. फोटोला साक्ष ठेवून शपथ घेण्यापेक्षां आगरकरांच्या कार्याचें एकादें प्रतीक मध्यें ठेवून शपथ घ्यावी अशी कल्पना निघाली. न्यायालयांत शपथ घेण्यापूर्वी भगवद्गीतेसारख्या एकाद्या धर्मग्रंथावर हात ठेवून शपथ घेतात. तसा कांहीं तरी श्रद्धेय वाटणारा आगरकरांचा ग्रंथ आपल्या समोर असावा असें सर्व लोकांचें मत पडलें. माझ्या वडिलांनीं मग आगरकरांच्या सुधारकाच्या फाइली तेथें आणल्या, त्या फाईलींच्या राशींची भक्तिभावानें पूजा होऊन शपथविधि झाला. त्या प्रशांत वातावरणांत सुमारें चाळीस धीरगंभीर तरुणांचे आवाज एकदम स्फुरलें आणि त्यांनीं म्हटलें, "गुरुवर्य आगरकर, आजपर्यंत आपण जें कार्य मोठ्या हिय्यानें पार पाडण्याचा अहर्निश प्रयत्न केला, त्याच्याच उन्नती. करतां सारा जन्म घालविण्याचा आम्ही आज निर्धार करीत आहों. आपलें कार्य पुढें चालविण्याकरितां आम्ही झटणार! अगदीं शपथपुरस्सर झटणार!"

या शपथविधीचें पावित्र्य माझ्या वडिलांच्या पुढल्या आचरणांत पूर्णपणें बाणलेलें होतें. वाईंत आल्यावर त्यांनीं वर्तमानपत्र काढलें. वर्तमानपत्राला नांव काय द्यावें याबद्दल त्यांच्या मित्रमंडळींत बरीच चर्चा झाली. असें सांगतात कीं, वर्तमानपत्राचें आकर्षक नांव शोधण्याकरितां या दोन चार मित्रांनीं दोन रात्रीं जागून काढल्या ! शेवटीं माझ्या वडिलांचें 'महादेव' हेंच नांव वर्तमानपत्राला द्यावें असें सर्वांनीं ठरविलें आणि त्याप्रमाणें वर्तमानपत्र निघूं लागलें. वाईंतल्या दोनतीन श्रीमंत इनामदारांनीं पैशाची मदत केली. ही मदत तत्परतेनें मिळण्याचें कारण माझ्या वडिलांच्याबद्दल गांवकऱ्यांना वाटणारी प्रीति हेंच होतें. त्या काळांत वाईसारख्या गांवांत पदवीधर लोक हाताच्या बोटावर मोजण्याइतकेच फार फार तर सांपडले असते. पण वाईंतल्या नवीन अर्धशिक्षित तरुण पिढींत, स्वतः जरी फारसें शिक्षण मिळविलें नाहीं तरी दुसऱ्या कुणीं विशेष श्रमसायास करून पदवीपरीक्षेपर्यंतची मजल गांठली तर अशा माणसाबद्दल परमावधीची आदरबुद्धि बाळगण्याची प्रवृत्ति निर्माण झालेली होती. आपल्या नवीन कार्याला सहानुभूति मिळविण्यांत माझ्या वडिलांना जें थोडेंफार यश आलें त्याचें कारण ही प्रवृत्तीच होय. शाळा काढण्याबद्दलही असेंच झालें. पुणें आणि सातारा अशा शहराच्या गांवीं मुद्दाम शिकण्याकरितां मुलांना घर सोडून जावें लागतें, याची तेथल्या समाजाला जाणीव झाली होती. त्याचप्रमाणें आतां इंग्रजी शिक्षण घेतल्याशिवाय चालणार नाहीं हेंही तेथल्या लोकांना पटूं लागलें होतें. त्यामुळें आपल्याच गांवांत एखादी शाळा नीट रीतीनें निघाली तर लोकांना हवी होती. लोकांच्या या अपेक्षेचा वडिलांच्या कार्याला शुभशकुनच झाला. वाईंत कांहीं इनामदार घराण्यांतून असे कांहीं सोज्वळ मनोवृत्तीचे लोक होते कीं त्यांना त्यांच्या मागल्या पिढींतील लोकांनीं व्यसनाधीन बनून केलेली पैशाची उधळपट्टी एकसारखी बोंचत असे. किंबहुना आपण आपल्या संपत्तीचा विनियोग कांहीं तरी सत्कार्यांत केल्याशिवाय या मागल्या पिढींच्या पापाचें परिमार्जन होणार नाहीं, असेंही

त्यांना सूक्ष्मपणें वाटत असे. सार्वजनिक देवालयांना देणग्या देणें, देवाच्या मूर्तीवर दागिने चढविणें, किंवा ब्राह्मणभोजनें घालणें, हे प्रकार जरी चालू होते तरी तेवढ्यानेंच गांवाच्या जीवनाला पूर्णता आली असें न वाटण्या-इतकी कांहीं कांहीं लोकांत तळमळ उत्पन्न झाली होती. गांवाच्या सामा-जिक जीवनांत तेज आणि जिवंतपणा आणण्याकरितां काय करावें याची मात्र त्यांना कल्पना नव्हती. पण चाललें आहे, हें हजारों वर्षे चालत आलेंच आहे, यांत नवीन कांहीं नाहीं, एवढें मानांत राहाण्यापर्यंत समा-जाचा कांहीं भाग चालू परिस्थितीबद्दल अगदीं हलके हलके अश्रद्ध होत चालला होता.

त्यामुळें माझ्या वडिलांची शाळा काढण्याची कल्पना कांहीं लोकांना ताबडतोब पटली आणि त्यांनीं लागेल ती पैशाची मदत करण्याची आपली तयारी दाखविली. माझ्या वडिलांबद्दल लोकांना विश्वास वाटण्याच्याकामीं माझ्या आजोबांची पुण्याईही कांहीं अंशीं कारण झाली होती हें विसरून चालणार नाहीं. माझे आजोबा गांवांत थोडेफार विक्षिप्त म्हणून गाजले असले तरी त्यांच्या त्यागी आणि निर्लोभ वृत्तीचा प्रखरपणा साऱ्यांना ठाऊक होता. आपल्यांच गांवांतल्या एका तरुणानें पदवीधर होऊन आपल्या गांवांत टिळक—आगरकरानीं पुण्यांत केली तसल्या प्रकारची चळ-वळ करावी याचा लोकांना फार अभिमान वाटला. त्यामुळें शाळा निघण्या संबंधांत गांवाचा जबरदस्त पाठिंबा मिळाला. शिक्षणखात्यानेंही आपली संमत्ति दाखविली आणि शाळा सुरू झाली. शाळेच्या सुरवातीचा दिवस हा साऱ्या गांवाला मोठा उत्सवाचा दिवस वाटला. या नवीन कामाला कसल्याही प्रकारचें विघ्न होऊं नये म्हणून प्रत्येकानें त्या दिवशीं अतिशय दक्षता बाळगली. शाळेच्या इमारतीकरितां एका इनामदारांनीं आपला एक मोठा वाडा फुकट देऊं केला. लागतील तितकी बाकें आणि खुर्च्या टेबलें करण्याची हमी दुसऱ्या एकानें पत्करली. कित्येकांनीं साताऱ्याकडे आणि पुण्याकडे शिकावयास गेलेल्या आपल्या मुलांना परत बोलाविलें आणि गांवांतल्या शाळेंतच त्या मुलांना मोठ्या अभिमानानें पाठविण्यांत आलें.

अशा रीतीनें वर्तमानपत्र व शाळा हीं निर्वेधपणें सुरू झालीं. या दोन्ही गोष्टी चालविण्यासंबंधांत गांवकऱ्यांशीं माझ्या वडिलांचा मतभेद होई. पण त्यांत परस्परांना सांभाळून घेण्याच्या प्रवृत्तीचाच बहुधा विजय होत असे. खरा मतभेद होऊन माझ्या वडिलांना त्रास झाला तो पुढेंच झाला! बारीकसारीक गोष्टी मात्र वेळोवेळी मिटवितां आल्या. असाच एक मतभेदाचा प्रसंग घडल्याचें सांगतात. साताऱ्याकडची एक प्रसिद्ध वेश्या आपले उतारवयाचें दिवस वाईसारख्या क्षेत्राच्या ठिकाणीं घालविण्याकरितां वाईत येऊन राहिली होती. वाईतल्या या शाळेची ही नवीन चळवळ पाहून तिला माझ्या वडिलांच्या कार्याचें मोठें कौतुक वाटलें. तिला कशी प्रेरणा झाली कुणास ठाऊक? पण तिला आपल्याजवळचे कांहीं पैसे शाळेला देणगीदाखल द्यावे असें वाटूं लागलें. आणि तिनें माझ्या वडिलांजवळ शब्दही टाकला! इतर लोकांचें या बाबतींत विरुद्ध मत पडलें. वेश्येचा पैसा शिक्षणासारख्या पवित्र कार्याकरितां आपण पतकरणें फार वाईट आहे असें बहुमत झालें. माझे वडीलच काय ते एकटे म्हणत होते कीं, 'त्या वेश्येच्याही सत्प्रवृत्तीचा आपण आदर केला पाहिजे. तो पैसा ती चांगल्या बुद्धीनें देत आहे, तो घेणें हें आपलें कर्तव्य आहे.' विरोधकांना त्यांनीं मागल्याच पिढींतल्या व्यसनाधीन पूर्वजांची आठवण करून दिली. शेवटीं तो पैसा स्वीकारावा असें ठरलें. त्या वेश्येला फार धन्यता वाटली!

लोकांमध्यें नवीन विचार हळूहळू पसरत होते, आणि अशा स्थितींत पांच वर्षें गेलीं. मग मात्र एक संकटच आलें. कॉलऱ्याचा उपद्रव गांवांत सुरू झाला. या रोगाचा प्रतिबंध कसा करावा याची कोणालाच त्यावेळीं माहिती नव्हती. नाहीं म्हणावयाला माझ्या वडिलांना पुण्याला असतांना कॉलऱ्यावरचें एक होमीओपॅथीचें औषध माहीत होतें. कॉलऱ्याचा जास्त जोर होऊं लागला तेव्हां माझ्या वडिलांनीं पुण्याहून तें औषध आणविलें आणि ज्या घरीं रोगी असेल तेथें शिरून आग्रहानें तें औषध देण्याचा क्रम आरंभिला. तरी कांहीं रोगी मात्र औषध घेण्याचें साफ नाकारीत.

त्यावेळीं त्यांच्यापुढें कसल्याही युक्तिवादाचा उपयोग होत नसे. एका घरीं तर माझ्या वडिलांचा एक आवडता विद्यार्थी आजारी होता. त्याची अगदीं घटका भरत आली असें भोंवतालच्यांना वाटूं लागलें. माझ्या वडिलांनीं औषध देण्याबद्दल फार आग्रह केला. पण अस्सल देशी औषधांनीं गुण आला नाहीं तिथें या औषधाचा काय उपयोग, आणि शिवाय आतां तीर्थ—अंगारा इत्यादि केल्यावर कोणतेंही औषध द्यावयाचें नसते, असल्या कांहीं सबबी सांगून त्या मुलाला नवीन औषध कांहीं मिळालें नाहीं. वडिलांच्या औषधानें पुष्कळ रोग्यांना गुण आला. कॉलऱ्याचें हें औषध घेऊन हिंडतांना त्यांनीं दिवस रात्र वगैरे कांहीं पाहिलें नाहीं. कित्येक लोक त्यांना उलट सांगत कीं 'तुम्हालाच एखाद्यावेळीं असला कांहीं उपद्रव होईल. जरा जपूनच लोकांकडे जात जा.' पण वडिलांनीं आपला क्रम सोडला नाहीं.

मतभेदाचा प्रसंग निर्माण झाला तो या औषधामुळेंच ! कॉलऱ्याचा उपद्रव अस्पृश्यांच्या वस्तींतही होऊं लागला. अस्पृश्यांच्या वस्तींत जाऊन औषध देण्याचें धाडस माझ्या वडिलांनीं आरंभलें. गांवांत ही गोष्ट कळल्याबरोबर सर्वत्र हाहाःकार झाला. वडिलांचे कांहीं मित्र या प्रकाराकडे सहानुभूतीनें पाहात होते ही गोष्ट खरी. पण सर्व समाजावर त्यावेळीं रूढीची जबरदस्त पकड होती. शिवाय तो गांवही विशेषतः सनातनी धर्मबुद्धीवर चालत आलेला होता. अस्पृश्यांच्या वस्तींत औषध पाणी देण्याकरितां जाण्याची कल्पना लोकांना मानवणें अवघड होतें. त्यामुळें माझ्या वडिलांना त्रास होऊं लागला. शिवाय प्रत्येक खेपेला माझे वडील स्नान करीत असेंही नाहीं. पुढें पुढें तर त्यांना घाटावर स्नानाकरितां जागा मिळेना. त्यांच्या पंक्तीला कुणी जेवावयास बसेना. आजोबांनीं कांहीं हव्यकव्य करावयास काढलें तर ब्राह्मण येईनासे झाले. कांहीं लोकांकडून तर प्रायश्चिताचेंही बोलणें होऊं लागलें. एकट्या वडिलांनाच हा त्रास होत होता असें नाहीं ! मी तर त्यावेळीं लहानच

हाता. पण बायकांच्या जगांत बिचाऱ्या माईची फार कुचंबणा होऊं लागली. तिला बायका अस्पृश्याप्रमाणें वागवूं लागल्या ! धुणेंपाणीं करण्याकरितां तिला गंगेवर जावें लागे. तेथें बायका तिला वाटेल तें बोलून घेत. ती तास तास तिष्ठत राहिली तरी तिला जागा देत नसत. शेवटीं आमचे आजोबा कडकडत घाटावर गेलें म्हणजे जागा मिळायची ! आजोबांनाही लोकांचें टोमणें ऐकावे लागत. कुणाचेंही बोलणें सहन करण्याचा त्यांचा स्वभाव नव्हता. त्यामुळें ही बोलणीं ऐकून त्यांनाही फार मनस्ताप व्हायचा. शेवटीं आजोबांनी माझ्या वडिलांना काकुळतीनेंही सांगून पाहिलें. पण बापलेकांचा स्वभाव एका तऱ्हेचा. त्यामुळें त्या सांगण्याचा कांही उपयोग झाला नाहीं ! आपल्यामुळें इतरांना त्रास व्हाययास नको, म्हणून माझ्या वडिलांनीं एकट्यानेंच निराळें राहण्याची तयारी केली. तशा रीतीनें वडिलांनी निराळें राहाण्याच्या तो प्रसंग आजोबा व माई या दोघांनाही फार कठिण गेला.

गावांत एक भुताटकीचें पडीक घर होतें तेथें वडिलांनीं वस्ती केली. आजोबांनीं त्यांना भांडीं, धान्य, इत्यादि गोष्टी मुकाट्यानें पोंचविल्या. आजोबांची शेती बऱ्यापैकीं होती, म्हणून अन्नान्न होण्याचा वडिलांना फारशी भीति नव्हती. आजोबानींच जर या गोष्टी पुरविण्याला मोडता घातला असता तर मात्र फार हाल झाले असते. पण किती झाले तरी तें बापाचें मन होतें. आणि शिवाय माझ्या आईपोरक्या वडिलांना आजोबांनीं इतका कडवा स्वभाव असूनही आईच्या वात्सल्यानें वाढविलें होतें ! एकुलता एक मुलगा. शिवाय त्याच्या कर्तबगारीबद्दल आजोबांना मनांतल्यामनांत परमावधीचा आनंद होत असे. हें ग्रामण्याचें संकट काय तात्पुरतें आहे, कांहीं दिवसांनीं विरून जाईल असें आजोबांना वाटत होते. म्हणून एरवीं अत्यंत कडवेपणानें वागणाऱ्या त्या म्हाताऱ्याचें हृदय आपल्या एकुलत्या एक मुलाकरितां तुटूं लागलें. कांहीं लोकांनीं माझ्या वडिलांच्या आयुष्यावर निखारे ठेवण्याचा

जो प्रयत्न चालविला त्याचा दाह या म्हाताऱ्याच्या हृदयांतील मायेच्या पाझरांनीं मंदावत होता! मला अजूनही एका गोष्टीचें आश्चर्य वाटतें. तें म्हणजे ज्या लोकांनी वर्तमानपत्र आणि शाळा चालविण्यास पैशाची मदत केली होती त्यांनीं कोणत्याही प्रकारचा रोष दाखविला नाहीं. किंवा ती मदत दिल्याबद्दलच्या मोबदल्यांत माझ्या वडिलांना आतांच्या स्थितींत अडवून त्यांच्याकडून, कांहीं लोकांना हवें होतें, तसले प्रायश्चित्तादि प्रकार करून घेण्याचाहि विचार या लोकांनीं कधीं मनांत आणला नाहीं. नवीन पिढींतील माझ्या वडिलांचे कांहीं स्नेही तर केवळ जाहीर रिवाजापुरतें त्यांच्याशीं तुटून वागल्यासारखें दाखवीत. एरवीं एकत्र बोलण्याबसण्याला त्यांनीं फारसा खंड पडूं दिला नाहीं. यावेळीं मीं आठनऊ वर्षांचा असेन. त्यावेळच्या बऱ्याच गोष्टी मला स्वतःला आटवतात!

कॉलऱ्याचा जोर कमी होतो न होतो तोंच प्लेग सुरू झाला. प्लेगनें तर साऱ्या गांवाला हैराण केलें. पूर्वी पुण्यांत असतांना जेव्हां भयंकर प्लेग झाला होता तेव्हांचा वडिलांचा अनुभव त्यांनीं यावेळीं वाईसारख्या गांवांत उपयोगांत आणण्याचें ठरविलें. पुण्यांत त्यावेळीं कांहीं सुशिक्षित तरुण नागरिकांनीं स्वतःचें जीवित धोक्यांत घालून गांवांत प्लेगनें लागलेल्या आणि मेलेल्या लोकांची व्यवस्था करण्याकरितां पथकें तयार केलीं होतीं. त्याची आठवण ताजी होती. वाईंत प्लेगचा प्रादुर्भाव होतो आहे असें दिसतांच कांहीं लोक भरभरां परगांवीं किंवा गांवाबाहेर झोपड्यांतून गेले. त्यावेळीं आजोबांनीं माईला आणि मला बाहेर झोंपडींत राहाण्याकरितां नेलें. आजोबांनीं वडिलांना अतिशय आग्रह केला पण वडिलांनीं तो मानला नाहीं, गांवांत कित्येक लोक तसेच राहिले. याचें कारण अद्याप प्लेगनें फारसा जोर केला नव्हता. शिवाय सारी चीजवस्त गांवांत टाकून झोंपडींत जाऊन राहिल्यानें पाठीमागें चोऱ्या होऊन सारीं घरें पार लुबाडलीं जातात, असा मागचा अनुभव असल्यामुळें लोक तांतडीनें घरें सोडण्यास तयार होईनात!

गांवांत लोक वस्तीला राहिले तरी लागण झालेल्या किंवा मृत्यु झालेल्या घरांत शिरण्यास सहसा धजावत नसत. त्यामुळें प्रेतांना प्रेतवाहक मिळण्याची फार पंचाईत पडे. जिवलग मित्र किंवा आप्तेष्ट हें सुद्धां तशावेळीं कुणी कुणाचे नव्हत असे वागत! माझे वडील व त्यांचे आठ दहा मित्र यांनीं एक पथक तयार केलें. या पथकानें त्या काळांत फार मोठी कामगिरी केली असें लोक सांगतात. आणि मौजेची गोष्ट अशी कीं जीव धोक्यांत घालून कुणाच्याही हाकेला धावत जाण्याची तत्परता दाखविण्याच्या या गुणामुळें सारे लोक माझ्या वडिलांच्याबद्दल मध्यंतरी उठलेलें वादळ पार विसरून गेले. अस्पृश्यांना औषधोपचार केल्याबद्दल ज्यांनीं त्यांचा जाच केला त्यांच्यापैकींच कांहींना माझ्या वडि-लांनीं आपल्या स्वतांच्या विटाळलेल्या खांद्यावरून परलोकाच्या शिवेवर नेऊन सोडलें! आणि कांहींच्या आप्तेष्टांच्या प्रेतांना स्पर्श करण्यास ज्या-वेळीं सगेसोयरे आणि शाळू सोबती पुढें आले नाहींत त्यावेळीं माझ्या वडिलांनींच धावून जाऊन सारी व्यवस्था केली. कित्येक वेळां मृताचा एकही नातलग श्मशानांत हजर नसावयाचा. सारें और्ध्वदेहिक या पथक्या-पैकीं कुणी तरी उरकावयाचे!

आम्ही झोंपडींत राहात होतों. वडील रोज संध्याकाळीं झोपडीकडे येऊन चौकशी करून जात. आजोबा मात्र यावेळीं वडिलांच्यावर फार रागावले होते. या रागाच्या मुळाशी आपल्या एकुलत्या एक मुलाबद्दलची प्रेमभावनाच होती. अशा रीतीनें जीव धोक्यांत घालून कांहीं भलतेंसलतें झालें तर त्या दुःखाची तीव्रता आपल्याला सहन व्हावयाची नाहीं या भीतीनेंच त्यांनीं वडिलांना बाहेर झोंपडींत येऊन राहाण्याबद्दल परोपरीनें आग्रह केला. त्यावेळच्या मर्यादेच्या कल्पनांप्रमाणें माई आपण होऊन माझ्या वडिलांशीं फारशी बोलत नसे. पण यावेळीं एकेप्रसंगीं आजोबांच्या देखत तिनें धीटपणानें वडिलांना म्हटलें होतें, " मग मला तरी तुमच्या-बरोबर गांवांत राह्यला घेऊन चला. मामंजी आणि शिरीष राहातील झोंप-

डींत !" यापेक्षां माईला जास्त बोलणें शक्य नव्हते. तिच्या या बोलण्यावर वडिलांनीं जे विषण्ग हास्य केलें, तें मात्र मला अजूनही नेहमीं डोळ्या-समोर स्पष्ट दिसतें !

आजोबांची भीति शेवटीं खरी ठरली ! एके दिवशीं कुणी तरी येऊन आम्हांला वडील आजारी असल्याची बातमी दिली. कुणाला आज सांगितलें तर खोटें वाटेल, पण ती बातमी ऐकल्याबरोबर तोंकाळपर्यंत निर्भय दृष्टीनें आणि ताठ मानेनें छाती पुढें काढून चालणाऱ्या माझ्या आजोबांची एकदम कंवर खचली ! त्या धक्क्यासरशीं तें जे एकदम वाकले ते पुढे पांच सहा वर्षे कायमचेच वांकले होतें. गांवांत पोंचल्यानंतर. पांच, सहा तासांतच माझ्या वडिलांचें प्राणोत्क्रमण झालें. केविलवाणेंपणानें माझे आजोबा वडिलांजवळ बसून राहिले होते. आपला अंतकाळ वडिलांनीं जाणला होता. त्यांनीं आजोबांना अगदीं विनंति करून म्हटलें, ' भाऊ तुम्हाला मीं फारसं सुख दिलं नाहीं. पण एक मागणं मी तुम्हाला मागणार आहे. ही माझी अन्तकाळची इच्छा तुम्ही पुरी करायला पाहिजे. ' माझ्या वडिलांच्या जवळ जाऊन त्यांना कुरवाळीत आजोबांनीं गहिवरलेल्या गळ्यानें उत्तर दिलें, ' आप्पा, देवाच्या घरी न्याय नाहीं हेंच खरं. ज्या क्रमानं या जगांत तो माणसं पाठवितो त्याच क्रमानं त्यानं ता या जगांतून नलीं तर कितीतरी दुःख नाहींसं होईल. तुझ्यासारख्या माझ्या एकुलत्याएक मुलाला.......... ' आणि बोलतां बोलतां म्हाताऱ्याचे ओंठ वाफेच्या दाबानें थडथडणाऱ्या झांकणासारखे थरथरूं लागले, डोळ्यांतून घळघळां पाणी वाहूं लागलें आणि मान कांपूं लागली. सारा उमाळा आवरून वडिलांनीं पुन्हां म्हटलें, ' माझं एकच मागणं आहे तुम्हाला. तुमच्या सुनेचं केशवपन करूं नका ! ' आणि नंतर त्या शेवटच्या क्षणाला सारा संकोच गुंडाळून ठेवून त्यांनीं माईला म्हटलें ' तुला पटायचं नाहीं. पण खरोखर जर पटलं तर पुनर्विवाह कर ! ' माई डोळ्यांतून पाणी गाळीत बसली होती. तिनं या उद्गाराबद्दलची

आपली भावना एका अनावर हुंदक्यानें व्यक्त केली ! सारा कारभार आटोपला !

वडिलांच्या मृत्यूचा परिणाम आजोबांच्यावर फार झाला. ते मुळां-तच अलीकडे कितीतरी वर्षे संन्यस्त होते. त्यांत ही भर पडली. दूध तूप, आंबा, केळीं आणि सारीं पक्वान्नें त्यांनीं वर्ज्य केलीं. वडिलांच्या सुतकांत ते जे खरखरीत घोंगडीवर निजूं लागले ते पुढें स्वताच्या मृत्यूप-र्यंत गादीला कधीं शिवले नाहींत. पुढें एके प्रसंगीं गाईची धार काढण्या-करितां ते गोठ्यांत गेले असतांना त्या आपल्या आवडत्या गाईला उद्देशून ते म्हणाले, ‘ बाई, आतां कुणाकरितां मी हें सारं करायचं ? ’ आणि असें म्हणतां म्हणतां त्यांनीं असाहाय्यपणें त्या गाईच्या मानेवर मान टाकली आणि हंबरडा फोडला ! त्या मुक्या जनावरानें त्या हंबर-ड्याला साथ दिली आणि जणूं कांहीं अश्रु गाळण्याकरितां आपले डोळे क्षणमात्र घट्ट मिटून घेऊन पुन्हां उघडले !

वडिलांच्या नंतर आजोबा पांचसहा वर्षेच जगले. त्यांचा अंत कसा झाला तें मागेंच सांगितलें आहे. आजोबांच्या मरणापर्यंत आम्ही वाईला होतों. पुढें माझं शिक्षण व्हायचं होतं. वडिलांनीं काढलेली शाळा पुढें नीट चालली नाहीं. प्लेग आणि कॉलरा यांच्या वरचेवर होणाऱ्या उपद्रवांनीं शाळेचे चालक पांगले ते पुन्हां एकत्र येऊंच शकले नाहींत. शाळेंतील विद्यार्थी परगांवीं जाऊन तेथल्या शाळेंत जात, ते परतून येण्याचा कंटाळा करीत. यामुळें शाळा आपोआपच बंद पडली. माई माझ्या वडिलांचें उदाहरण विसरली नव्हती. माझ्या शिक्षणाची आबाळ होऊं नये म्हणून तिनें वडिलांच्या कांहीं स्नेह्यांच्या साहाय्यानें आणि सल्ल्यानें पुण्याचा मार्ग धरला. आमचें घरचें शेताचें उत्पन्न होतें. त्यावर पुण्यांत आम्हांला खाण्यापिण्याची पंचाईत पडली नसती. पण माझा विद्याभ्यास व्हायचा म्हणजे हातीं पैसा हवा होता. तो कसा उभा करावयाचा हा प्रश्न होता.

मी तर काय सारा चौदा वर्षांचा ! शिकून सवरून तयार होण्याची मला जी आजची अवस्था आली आहे त्याचें सारें श्रेय मी माझ्या आईला देतों. पैसा उत्पन्न करण्याचें साधन वास्तविक तिच्याजवळ नव्हतें. लोकांच्या घरीं स्वयंपाकाला राहाण्याइतका कर्मीपणा पतकरण्यासारखी माईची स्थिति नव्हती. आणि पैसा तर हवा होता ! अशा वेळीं माईनें त्यावेळच्या रूढ कल्पनांना धक्का देण्यासारखी कामगिरी केली, तिचें मला नेहमीं कौतुक वाटतें. वाईला आजोबांच्या हाताखालीं असतांना वीसबावीस वर्षें माईनें गाईम्हशींच्या धारा काढून गोठ्यांतलें सारें काम पुष्कळ वेळां केलें होतें. तिच्या मनांत पुण्यासारख्या ठिकाणीं दोनतीन म्हशी ठेवून आपण जर पांचसात ठिकाणीं दूध घालण्याचा उद्योग केला तर सहज जरूरीपुरता पैसा उत्पन्न होईल, अशी कल्पना आली. आणि एका ओळखीच्या माणसाच्या मध्यस्थीनें तिनें दोन म्हशी विकत घेतल्या. या म्हशी विकत घेण्याकरितां माईनें आपल्या दागिन्यांपैकीं एक दागिना मोडला. माईनें स्वतः कांहीं घरंदाज बायकांना भेटून दुधाचा रतीब चालू करण्याबद्दल आर्जवानें सांगितलें. आणि थोड्याच दिवसांत माईच्या या नवीन उद्योगाचा जम चांगल्या रीतीनें बसला. माई जात्याच हुशार होती, आणि आजोबांच्या हाताखालीं ती चांगली तयार झाली होती. गांवांत आसपासच्या कांहीं लोकांनीं आरंभाला बरींच नांवें ठेवलीं. पण माईच्या स्वभावाची आणि मोठ्या काळजीपूर्वक बोलण्याचालण्याची ओळख पटल्यावर बहुतेक शेजारीपाजारी तिचे गुण गाऊं लागले. दोन वर्षांत तीन इयत्ता असे मी दोनदां केल्यामुळें मीही अभ्यासांत झपाट्यानें पुढें सरसावलों. शाळेंत असेपर्यंत माझा वर्गांतला पहिला नंबर सहसा चुकला नाहीं. पुढें कॉलेजांतही मी बहुतेक परीक्षांतून चांगल्या रीतीनें पास झालों. एम्. ए. होईपर्यंत माझ्यासाठीं माईनें फार कष्ट केले. त्यानंतर मात्र मी तिला आग्रहानें सारें काम सोडावयास लावलें. शिकवण्या करून मी पैसे मिळवूं लागलों !

मी एम्. ए. झालो आणि डिग्री घेतली नाहीं तोंच गांधींची असाह-कारितेची चळवळ सुरू झाली. त्या चळवळींत मी भाग घेतला, पण तो कांहीं म्हणण्यासारखा नाहीं. राजकारण त्यावेळी मला अगदीं नवीन होतें. घरीं बसल्याबसल्या मी बरेच ग्रंथ वाचलं होतें. पण प्रत्यक्ष राजकारणाचा खेळ मला सर्वस्वी पारखा होता. असहकारितेचें वादळ शांत झाल्यावर मीं मुंबईत आलों. गेल्या चार वर्षांत माझ्या कार्याची दिशा अगदींच अन-पेक्षितरीतीनें भलतीकडे वळली. येथील मजुरांच्या चळवळी करणाऱ्या कांहीं लोकप्रिय पुढाऱ्यांशीं निरनिराळ्या निमित्तांनीं ओळखी होण्याचे प्रसंग आले, आणि त्यांची तळमळ पाहून मलाही त्याच कार्याची स्फूर्ति झाली. असहकारितेच्या दिवसांत प्रचाराच्या निमित्तानें अनेक ठिकाणीं प्रवास केला होता. त्यावेळीं समाजांतील गरीब शतकरी व कामकरी लोकांचं दैन्य मी प्रत्यक्ष पाहिलें होतें. बिचाऱ्या माईला माझी ही धडपड मनांतून मान्य नाहीं. तिला वाटतें मी लग्न करून सुखानें संसाराला लागावें! आमच्या घरांत इतिहासाची पुनरावृत्ति झाल्याचा तिला माझ्या आयुष्य-क्रमामुळें एकसारखा भास होत असला पाहिजे असें मला वाटतें.

आणि इतकें असूनही माझ्या आवडीचा व्यवसाय वेगळाच आहे. समाजशास्त्र किंवा भाषाशास्त्र यापैकीं कशाचें तरी संशोधनकार्य करावें, आपल्या खोलींतील या विषयांवरील पुस्तकांच्या वाचनांत तल्लीन होऊन जावें, त्याच कैफात असतांना निरनिराळ्या नवीन तत्वांचा शोध घेण्याची स्फूर्ति मिळवावी, जमल्यास परदेशपर्यटन करून तिकडच्याही एखाद्या नामां-कित अध्यापकांच्या हाताखालीं दोन चार वर्षे मनमुराद अभ्यास करावा, गवयाजवळची विद्या संपादन करण्याकरितां शिष्य जसा चोवीस तास त्याच्याजवळ तन्मयतेनें राहातो, तसें आपण अव्वल दर्जाच्या विद्वानाच्या संगतींत राहावें, अशी माझी अंतःकरणाच्या खोल कोपऱ्यांत दडून राहि-लेली एक तळमळीची इच्छा आहे. मात्र मला परदेशी पदव्यांचा मोह नाहीं. परदेशांतील संशोधक विद्वत्तेचा मोह आहे!

माझ्या मनानें तर या अवधींत अगदीं विरोधक स्वरूपाच्या संक्रमणावस्था अनुभवल्या आहेत. आजोबांच्या मृत्यूपर्यंतच्या काळांत माझ्यावर सनातनी अन्धश्रद्धेचा पगडा होता. संध्या, रामरक्षा, पुरुषसूक्त, गीतेचा पंधरावा अध्याय हा तर माझा नित्य पठनाचा क्रम होता. माझ्या आजोबांनी मला शिवलीलामृतही सक्तीनें वाचावयास लावलें होतें. श्रीधरकवींची पौराणिक आख्यानें लहानपणीं माईला वाचून दाखविण्याचे प्रसंग अनेक आले. मला पौराणिक देवता त्यावेळीं खऱ्या वाटत. रावणाच्या दहा तोंडापासून कृष्णाच्या चार हातांपर्यंत साऱ्या गोष्टी मी श्रद्धेनें खऱ्या मानी. गुरुचरित्राच्या पोथीच्या प्रभावानें भूतपिशाच्चें पळतात असा अनुभव वडीलधारी माणसें त्यावेळीं सांगत. वडिलधाऱ्या माणसांनीं कांहींही सांगितलें तरी त्याबद्दल सांशंक होऊं नये अशी माझी तेव्हां प्रवृत्ति होती. पुढें पुण्यांत आल्यावर हरिभाऊ आपटे यांच्या कादंबऱ्या, आगरकरांचे निबंध, कोल्हटकरांची नाटकें इत्यादि सुधारणाविषयक पुस्तकें वाचलीं त्यामुळें विचार झपाटयानें बदलूं लागले. शाळेंतलि एका शिक्षकांचें नांव येथें लिहीत नाहीं. पण ते गृहस्थ अद्यापही मला फार अधिकारी वाटतात. त्यांनीं मला बुद्धिगामित्वाचें पहिले धडे दिले. बी. ए मध्यें तत्वज्ञान हा विषय घेतला तेव्हां साहजिकच जिज्ञासेनें भारतीय तत्वज्ञानाचा अभ्यास केला. त्यावेळीं पाश्चात्यांचा बुद्धिवाद व त्यांची शास्त्रीय दृष्टि यांच्याबद्दल तुलनेनें माझ्या मनांत फार आदर वाटला! आपला समाज सर्व दृष्टींनीं अतिशय कोता आहे, याची जाणीव याच वेळीं तीव्रतेनें झाली! वेदांची स्तुति अनेक वेळां ऐकली होती, त्याचेंही वाचन केलें. पण तो वेळ फुकट गेला असें वाटतें. असहकारितेच्या काळांत गांधींच्या आश्रमांत कांहीं दिवस मी काढले आहेत. असहकारितेंत देशांतलि प्रत्यक्ष जीवनाचा अगदी जवळून परिचय झाला. त्यामुळें मन वैतागलें यांत शंका नाहीं. अज्ञान, दारिद्र या गोष्टी कशामुळें निर्माण होतात याचें कारण तळमळीनें शोधूं लागलों. मुंबईत आल्यावर दलितांच्या चळवळी करणाऱ्या पुढाऱ्यांच्या गांठी पडल्या. दलितांच्या प्रश्नाबद्दलचें तत्वज्ञान पुस्तकांतून

गांपडेल या अपेक्षेनें पुस्तकें पाहूं लागलों. मार्क्स, लेनिन हातीं लागले, आणि एक नवीन प्रकाश दिसला. त्या प्रकाशांतच चालूं मार्ग आक्रमीत आहे. अशा रीतीनें माझ्या मागें फार मोठी आनुवंशिक आणि सामाजिक परंपरा आहे."

× × ×

ही 'न छापलेली मुलाखत' वाचण्याची जिज्ञासा आवरतां न आल्यामुळें नीरेनें त्या दिवशी आपलें टपालही पाहिलें नव्हतें. सारी मुलाखत वाचल्यावर ती कांहीं वेळ सुन्न होऊन बसली. घरीं जाण्यापूर्वी तिनें टपाल पाहिलें. त्यांत तिच्या हातीं एक निमंत्रणपत्रिका लागली. तींत लिहिलें होतें:—

"श्रीकृपें करून चि. कु. प्रमिला इचा विवाह बॅ. विजय अनंत गोखले यांच्याशीं करण्याचें योजिलें आहे..........

मनोहर सदाशिव दीक्षित."



# प्रकरण १७ वें.

# सारें मन उघडें झालें नाहीं !

प्रमिलेकडून लग्नाचें निमंत्रण करणारें खासगी पत्रही आलें होतें. त्यांत नीरेनें लग्नाला यावें असा निक्षून आग्रह केला होता, आणि प्रमिलेनें म्हटलें होतें,

"नीरे, तुला वास्तविक निमंत्रणाची आवश्यकताच नाहीं. आणि माझी खात्री आहे कीं, माझें लग्न म्हटलें कीं, तूं धांवत आल्याशिवाय राह्यची नाहींस. लहानपणच्या बालिश वृत्तीला अनुसरून आपण लग्न न करण्याचे निश्चय केले होते. ते निश्चय करतांना आपण कांहीं विशेष विचार केला होता असं नाहीं. भावनेच्या उसळींत आपण तसले निश्चय केले. पण ते निश्चय आपोआप मोडले आहेत. मोडण्याचा अपराध माझ्याकडूनच प्रथम घडतो आहे, असं नाहीं. आपल्यापैकीं वत्सलेनं पहिल्यांदा लग्न करून घेतलें. तिला पत्र लिहितांना मी तिची थोडीशी चेष्टा करून मीही तुझ्याच पावलावर पाऊल टाकून आतां पुढं सरसावतें आहे असं म्हटलं आहे. माझी इच्छा एवढीच आहे कीं, तुम्हां दोघींना माझीं पत्रं पोचून तुम्हीं वेळेवर जरूर इथं यावं.

पण तूं म्हणशील कीं या खासगी पत्रांत पुन्हां छापील मजकूरच आलटून पालटून लिहिण्यांत काय अर्थ आहे ? आणखी जास्त कांहीं सांगशील कीं नाहीं ? खरंच, माझं लग्न ज्यांच्याशीं ठरलं आहे, त्या बॅ. गोखल्यासंबंधीं पुष्कळ सांगण्यासारखं आहे. तुला आश्चर्य वाटेल, पण आमचं हें लग्न आधीं ओळख होऊन ठरलं आहे. ओळख व्हायला फार वेळ लागला नाहीं आणि ओळख झाल्यावर लग्न ठरेपर्यंतही फार दिवस

भेटले नाहीत. मी बॅ. गोखल्यांना प्रथम पाहिलें तें आमच्या ठाकुरद्वारच्या शाळेंत ते एकदां व्याख्यान द्यायला आले होते तेव्हां! व्याख्यानानंतर चहाच्यावेळीं त्यांनीं खूप गप्पा मारल्या. त्यावेळीं आपल्याकडील लग्नें ठरविण्याची तऱ्हा, मुलामुलींना शिकविण्याची पद्धत इत्यादि गोष्टीसंबंधानें फार विनोदानें चर्चा केली त्यांनीं! त्याद्विषयीं त्यांची ओळख ताजी होती. मनावर त्यांचा आलेला परिणाम, विस्तवापासून दूर नेलेल्या पदार्थांत आंच शिल्लक राहावी तसा रेंगाळत होता. त्याच भरांत मला घरीं नानांना पत्र लिहिण्याचा प्रसंग आला. त्यांत मी सहज बॅ. गोखले यांच्याविषयीं लिहून गेलें. मला वाटतं म्हाताऱ्या माणसांच्या बाकीच्या साऱ्या शक्ति क्षीण झाल्या तरी कल्पनाशक्ति ताणण्याच्या कामीं मात्र हीं म्हातारीं माणसं कधीं कणाला हार जायची नाहींत! माझ्या या पत्रांतील बॅ. गोखले यांच्याबद्दलचा मजकूर वाचल्याबरोबर नानांनीं मोठ्या चातुर्यानें आमचे भटांचे दोनतीन प्रसंग मुद्दाम घडवून आणले. आणि नानांनीं बॅ. विजय यांना आधींच संमति विचारून घेऊन मला लग्नाबद्दलचा निर्णयात्मक प्रश्न टाकला! आणि थोडक्यांत सांगायचं म्हणजे मी 'हो' म्हटलं! लग्न केव्हां व्हायचं आहे तें तुला निमंत्रण पत्रावरून समजेलच. त्याला यायला विसरूं नकोस."

'न वाचलेली मुलाखत' आणि हें पत्र यांच्यांतील मजकुरावर अन्तर्दृष्टि वरचवर फिरत असतांनाच ती घरीं गेली. आणि घरांत शिरल्यावर तिच्या कानीं शब्द पडले,

"जगन्नाथ, कुणी सांगितलं बाबा, तुला हा निखारा पदरात बांधून घ्यायला? असल्या करण्यानं काय होईल याचा तुला अंदाजही करतां आलेला नाही अशी माझी खात्री आहे. पण खरंच सांग, कुणी मदत केली तुला या कामांत?"

"ते आनंदकर तुमच्याकडे येतात, त्यांनीं!"

" आणि तूं त्यांच्या म्हणण्याला कबूल झालास ? माझ्या संगतीत आज तीनचार वर्षं काढून तुझा या मार्गावर अद्यापही विश्वास बसला ? "

" माझा विश्वास बसला नसता ! तुम्ही या मार्गाला अगदीं अयोग्य म्हणतां तेंही मला माहीत आहे. पण आई वारली, त्याच्या दुसऱ्या दिवसापासूनच माझी नोकरी गेली. माझी नोकरी जायला मी असा काय गुन्हा केला होता ? आईच्या मरणाकरितां रजा न मागतां घरीं राहिलों एवढाच माझा गुन्हां ! आणि त्या गुन्ह्याला शिक्षा कोणती, तर नोकरीवरून अजीबात दूर होण्याची ! रेल्वेच्या अधिकारीवर्गाचा राग आला मला त्यावेळीं. अजूनही नोकरी गल्याच्या नुसत्या विचारानंही माझं डोकं अगदीं भणाणून जातं ! त्याचा सूड घ्यायचा आहे मला. आणि सूड घेण्याची ही असली संधि इतक्या लवकर येईल असं मला वाटलं नव्हतं. पण तुम्ही एकदां इथं घरीं नसतांना दादासाहेब आनंदकर आले होते. त्यावेळीं मीही इथंच होतों. त्यांनीं माझी सारी चौकशी कली. माझी नोकरी गेल्याची हकिकत ऐकून त्यांनीं म्हटलं होतं, 'शेवटीं कांहीं झालं तरी दहशत बसविण्याचा मार्ग हाच खरा उपाय ! या उन्मत्त अधिकाऱ्यांना व्यवस्थित गांठून त्याना ठार मारल्याशिवाय कांहीं व्हायचं नाहीं. या असहकारितेच्या काळापासून आम्ही फार मेषपात्र बनलों आहों, आणि वाटेल तो जुलम मुकाट्यानं सहन करायला मनापासून तयार असतो असं वाटायला लागल आहे या अधिकाऱ्यांना. तें त्यांचं वाटणं नाहींसं केलं पाहिजे.' आणि अशा रीतीनं बोलतां बोलतां त्यांनीं मला हा उपाय सांगितला आणि या उपायाला जरूर असणारं साधनही त्यांनीं मिळवून ठेवलं आहे. देणार आहेत ते मला एक दोन दिवसांत ! "

" त्यांनीं मिळवून ठेवलं आहे ? आणि ते तुला दणार आहेत ? बरं झालं, शेवटीं प्रत्यक्ष गोष्ट करण्यापूर्वी तूं मला हें विचारलंस. माझ्याकरितां, तुझा माझ्यावर विश्वास असेल तर तूं असलं कांहींएक करूं नकोस आपल्या

आततायी उपायांनी कांहीं होणार नाहीं. उलट इतर मार्गांनी होणारी प्रगति एकदम खुंटल्याशिवाय राह्यची नाहीं. कुठून मिळविलं आहे त्यांनीं हे साधन?"

"ते मला माहीत नाहीं. पण ते म्हणाले कीं अलीकडं त्यांचा या मार्गावर विश्वास बसला असून त्यांनीं परदेशांतील लोकांशीं संधान बांधलं आहे, आणि त्यांच्याकडे आजउद्यां एवढ्यांत परदेशांतून पुस्तकांचं म्हणून एक पार्सल येणार आहे. त्यांत येणार आहे हा नवीन माल !"

"तें कांहीं असलं तरी तूं या फंदांत पडूं नकोस. तूं स्वतां नांवानं कुठं गुंतला नाहींस ना ? नाहीं तर अशा अत्याचारांच्या बाबतींत नेहमीं तुझ्यासारखे गरीब लोक फशीं पडतात आणि या दादासाहेबासारखे लोक मागें राहातात. जा, आतांच्या आतां जा, त्यांना भेट आणि मी काय म्हणतों तें त्यांना सांग. तुझ्या सांगण्यानं काम झालं नाहीं, किंवा होणार नाहीं असं तुला वाटत असलं तर, त्यांना आज रात्रीं मी बोलावलं आहे, म्हणून सांग. पण या संबंधांत नक्की काय तें करून रात्रींच्या रात्रीं मला कळवायला ये."

जगन्नाथ निघून गेल्यावर शिरीषकुमार स्वयंपाकघरांत आले त्यावेळीं माई चटईवर निजली होती आणि नीरा स्टोव्ह पेटवून चहा करीत होती. माईच्याजवळ बसून माईचें अंग चेपतां चेपतां शिरीषकुमारांनीं म्हटलें, "माई, फार अशक्त झालीस तूं. तुला आतां शक्तीचं कांहीं तरी औषध घ्यायला पाहिजे."

"मला कशाला हवीं आहेत औषधं आतां ! आतां लौकर डोळे मिटावेत एवढीच माझी इच्छा आहे. सकाळ संध्याकाळ देवाला माझे नवस चालले आहेत."

"तूं खूप नवस करशील, पण ते मी फळाला येऊं दिलें पाहिजेत ना ? माझी इच्छाशक्ति फार जबर आहे माई. तुला जगवायचं असा माझा निश्चय आहे. तो तुझ्या नवसांनीं कसा मोडेल ? "

" नको बाबा मला आतां उगीच खितपत पडायला. कांहीं कांहीं दुखणेकऱ्यांना शेवटीं इतक्या यातना होतात कीं आपल्याला कोणी गोळी घालून मारलं तर बरं असं त्यांना वाटायला लागतं ! "

' कोणी गोळी घालून मारलं तर बरं,' हे शब्द माई सहज बोलून गेली होती; पण शिरीषकुमारांच्या मनाला एकदम दचकल्यासारखें झालें. कांहीं वेळापूर्वी पलीकडच्या खोलींत जगन्नाथाशीं जें आपलें संदिग्ध बोलणें झालें, त्यांतून तर माईनें हा अर्थ काढला नाहीं ना अशी शंका येऊन त्यांनीं रोखून माईकडे पाहिलें !

विषय बदलण्याकरितां त्यांनीं पुन्हां म्हटलें, " उद्यां एका ठिकाणचें शिकवणीचे पैसे हातीं येणार आहेत, माझ्या मनांत फार दिवस आहे कीं तुला एखादी शाल घ्यावी म्हणून ! घ्यायची तीं तुझ्या पसंतीची घ्यायला हवी आहे. दरवर्षी थंडीच्या दिवसांत, ' शाल घेईन ' म्हणून बोलत आलों. उद्यां मात्र तुझ्या पसंतीकरितां मी शालवाल्याला शाली घेऊन घरीं पाठवून देईन. "

" खरं म्हणजे उगीच पैसे खर्चून मला शाल घ्यायची तरी आता काय गरज आहे ? तुला स्वतांलाच अजून कितीतरी गोष्टी घ्यायच्या आहेत ! तूंच स्वतांला कांहीं तरी चांगली जिन्नस घे. "

नीरेनें मध्यें आणून ठेवलेला चहा घेण्याच्या निमित्तानें तें बोलणें तितक्यावरच थांबलें. चहा घेतां घेतां नीरेला उद्देशून शिरीषकुमारांनीं म्हटलें, " आज आपण कुठं तरी फिरायला जाऊं. फार दिवसांत मी असा मोकळेपणानं फिरायला गेलों नाहीं. येशील तू ? दमलेली दिसतेस !'
' नाहीं. येईन कीं ! दमायला काय झालं ? पण माईला एकटं ठेवून जायचं म्हणजे— '

तेवढ्यांत माईनें म्हटलें, " तुम्ही जा दोघंजणं फिरायला. मी बसेन एकटी. मला आतां थोडीशी झोपच लागेलसं वाटतं आहे. आणि

हो! बरी आठवण झाली. शिरीष, तुला विचारीन विचारीन म्हणून म्हणतें आहे. पण वरचेवर विसरायला होतं. मला एकदां वांईकडं जायला हवं आतां. आपल्या घराकडं आणि शेताकडं एकदां जाऊन कांहीं तरी तजवीज करून येतें मी. पांचसहा वर्षांत आपण कुणींच तिकडे गेला नाहीं. एकदां सारी व्यवस्था नीट करायला हवी. उद्यां परवां सुद्धां माझी जायची तयारी आहे. केव्हां तरी एकदां काम करायचंच तर लवकरच तें ठरकलेलं बरं!"

शिरीषकुमारांनीं उत्तर दिलें, "आणि मला वाटतं, थोड्याशा हवा-फेरानं तुला बरंही वाटेल. कारण कांहीं झालें तरी तूं म्हणतेस त्याप्रमाणं तुझा पिंड त्या हवेंतला आहे. जाणार असलीस तर उद्यादेखील जा."

"या; तुम्ही फिरून तर या. मग ठरवूं रात्रीं, काय करायचं तें." या माईच्या बोलण्यानें तो विषय तेवढ्यावरच संपला!

× × ×

तीं दोघेंही फिरावयास जाण्याकरितां निघालीं. शिरिषकुमारांनीं दादर ट्रॅमनाक्याच्या उजव्या बाजूनें जो रस्ता काढला तो अगदीं निर्मक्षिक होता. कांहीं कांहीं ठिकाणीं हिरवळीचे उघड जमीनीचे तुकडे होते. तेथें एकाद्या झाडाखालीं बसलेली कांहीं पार्शी युवक–युवतींचीं जोडपीं क्वचित् दिसत होतीं, तेवढीच काय ती त्या बाजूला माणसांची चाहूल होती. किंचित् डाव्या बाजूला वळून कांहीं अंतर चालून गेल्यावर एक टेकडी दिसूं लागली. तिकडे बोट करून शिरीषकुमारांनीं म्हटलें,

"त्या टेकडीवर जायचं आहे आपल्याला. मला वाटतं तूं दमशील इतकं सगळं चालायचं म्हणजे!"

"त्यांत दमायला काय झालं? मला चालण्याची संवय नाहीं अशा कल्पनेनं तुम्ही बोलतां आहां हें! समजतं मला."

"पण माझी कल्पना खोटी आहे का? मी पुण्यांत होतों तेव्हां पाहिलेला आहे तुझा चालण्याचा प्रकार. शाळेंत जायचं तरी वडिलांच्या

शेजारी बसून घोड्याच्या गाडीतून जायचं! आईबरोबर पर्वतीकडे फिरायला गेलीस तरी गाडी कुठें तरी आसपास असावयाची. चार पावलं चाललं कीं, गाडींत बसायचं आणि घरीं जायचं. तशी इथं कांहीं गाडी यायची नाहीं. आणि हा रस्ता इतका बाजूचा आहे कीं, एखादं वाहन करूं म्हटलं तरी करणं शक्य व्हायचं नाहीं. कारण या बाजूला कोणतंही वाहन मिळायचं नाहीं."

"पण अलीकडे माईच्या हातचं अन्न खाऊन माझ्या हातापायांत मला फार शक्ति आल्यासारखी वाटते आहे! ज्या अन्नानं तुम्हाला तयार केलं तें अन्न आतां माझ्या पोटांत जायला लागलं आहे!"

"माईचा विषय काढलास म्हणून सांगतों. आतांशी मला तिची फार काळजी वाटायला लागली आहे. तिनं माझ्याकरितां किती कष्ट उपसले आहेत, आणि कोणते हाल सोसले आहेत याची कल्पना नाहीं यायची कुणाला!"

"पण मला आहे त्याची कल्पना. माझ्या शेजाराला तुम्ही राहात होतां, त्यावेळची मला आठवण आहे."

"त्यावेळीं तूं लहान होतीस. कांहीं गोष्टी तुला दिसल्या. पण मोठ्या माणसाला जाणतां येण्यासारख्या किती तरी गोष्टी तुझ्यापासून त्यावेळीं दडून राहिल्या असतील. त्यांतून माई पडली स्वभावानं अबोल ती आपलं दुःख सहसा कुणाजवळही कधीं बोलून दाखवायची नाहीं. तिनं आपल्या मनाच्या कितीतरी यातना माझ्यापासून दडविण्याचा आजपर्यंत यत्न केला आहे!"

तीं दोघेजण बोलत बोलत आगगाडीचा रूळ आलांडण्याकरितां एका फाटकापाशीं आलीं गाडी तेथून जाण्याची वेळ झाल्यामुळें फाटक लावलेलें होतें आणि एक पोर्टर हातांत निशाण घेऊन फाटकाशीं उभा होता.

त्या ठिकाणीं थाबत शिरीषकुमारांनीं म्हटलें, " माईच्या भावनापर्यंत मला कधीं पोचतांच आलं नाहीं. अन्तःकरणांत भावना धडधडायला लागल्या कीं तिनं या फाटकासारखी एकाद्या शद्वाची अटक माझ्यापुढें धरावी, आणि मग तिच्या भावना येथून जाणाऱ्या आगगाडीसारख्या कांहीं वेळ धडधडून पुन्हां शांत व्हाव्या असेंच नेहमीं होतं. '

" म्हणूनच मला वाटतं त्या छापलेल्या मुलाखतींत आजोबा आणि वडील यांच्याइतकं माईचं वर्णन विस्तारानं आलं नाहीं ! "

" म्हणजे ? ती मुलाखत तूं वाचलीस ? कुठं मिळाली तुला ती वाचायला ! "

" मिळाली अशीच कुठं तरी. "

आणि मग शिरीषकुमारांनीं स्तब्ध राहून खूप खूप आठवून पाहाण्याचा प्रयत्न केला. पण ती मुलाखत नीरेच्या हातीं कशी लागली त्याची त्याना कल्पना करतां येईना. आणि ही कल्पना न करतां येण्यासारखीच त्याची या मुलाखतीसंबंधांत काल स्थिति झाली होती.

काल्च्या दुपारीं माईनें अनपेक्षित रीतीनें एक नवीनच विषय शिरीषकुमाराच्या डोळ्यापुढें उभा करून दिला होता. आणि रात्रीं झोंपीं जाईपर्यंत त्याच कल्पनेचा त्यांच्या मनावर परिणाम झालेला होता.

नीरा अनाथाल्यांत गेली होती. सारें कामधाम संपवून माई आंतल्या खोलींत पडली होती, तिनें सहज शिरीषकुमाराला हाक मारली आणि विचारलें, 'फार कामांत आहेस का शिरीष ?'

त्याबरोबर 'तशा कांहीं विशेष कामांत नाहीं, असें म्हणत शिरीषकुमार माईजवळ जाऊन बसला. तिचें अंग हलकें हलकें चेपीत त्यानें म्हटलें, 'माई, आतां तूं जरा विश्रांति घ्यायला शीक. प्रत्यक काम अगदी मनाजोगतं पार पडलं पाहिजे, म्हणून जीवाचा आटापीट करण्याची संवय

आतां सोडून दे. आणि शिवाय नीरा आहेच. तिची मदत घ्यायला तुला वास्तविक संकोचण्याचं कारण नाहीं.'

'पण किती झालं तरी ती श्रीमंताची लेक. आपल्याकडं चार दिवस पाहुणी म्हणून आली. माझ्या आग्रहामुळें आपल्याकडं राहायला लागली. तिला जर काम करायला लावलं तर तिला एखादेवेळीं वाटायचं कीं, आपल्याला कामाकरितां मुद्दाम ठेवून घेतलं'

'छे, छे. पण नीरा तशी नाहीं.'

''नाहीं. ती तशी नाहीं हें खरं. पण आपल्यालाही थोडा संकोच व्हायचाच! शिरीष, नीरेबद्दलच तुझ्याशीं मला एकदां बोलायचं होतं.'

माईचे हे शब्द ऐकल्याबरोबर शिरीषकुमारांनीं तिच्याकडे रोखून पाहिलें. माई काढणार आहे तो विषय आपण निघूं द्यावा कीं नाहीं याबद्दल त्यांच्या मनाला क्षणमात्र पेंच पडला. पण माईनें बहुतेक निश्चयच केला होता.

''मी म्हातारी झालें असलें तरी तरुण माणसांचीं मनं मला समजतात शिरीष! त्यांतून मुली प्रत्यक्ष जरी बोलून दाखवीत नसल्या तरी त्यांचं मन अगदीं लहानमहान गोष्टींतूनही दिसल्याशिवाय राहात नाहीं. आतां या नीरेचंच पहा ना. तुझ्या बारीक सारीक आवडीनिवडी जपण्याकरितां ती फार तत्पर असते. बंबांतलं पाणी बेतानं तापलं असलं, आणि तुम्हा दोघांनाही स्नान करून घेण्याची घाई असली, तर ती तें ऊन पाणी तुझ्याकरितां मुद्दाम राखून ठेवते, आणि स्वतां गार पाण्यानेंच आंघोळ करते. परवां तुला पडसं झालं होतं त्यावेळीं तुला वाटलं कीं मींच तुला गवती चहा करून दिला होता! पण तो चहा नीरेनें केला होता. मी त्यावेळी नुसतं म्हणण्याचा अवकाश कीं तिनं आठवणीनं साऱ्या जिनसा आणल्या आणि त्या दिवशीं चहा केला. तुला रात्रीं नेमका बाहेरून यायला उशीर लागला. अकरा वाजून गेलें होतें त्या दिवशीं! तरी ती जागत बसली. चहा निवूं नये म्हणून तिनं शेगडी पुन्हां फुलवली

आणि त्या दिवशीं तुला चहा दिला ! तुला खरवस आवडतो असं केव्हां-तरी तुझ्या बोलण्यांत आलं. तें नेमकं लक्ष्यांत ठेवून तिनं परवांचा खरवस केला. आपल्या हातून तो बिघडूं नये म्हणून तो करतांना तिनं मला सारखं जवळ बसवून ठेवलं होतं. तिच्या मनाचा हेतु जाणून मी तिला चेष्टेनं म्हटलं, ' अग थोडंसं बिघडलं तरी हरकत नाहीं. शिरीषला कांहीं फार चवीढवी नाहींत !' हें ऐकून ती इतकी लाजली कीं बोलून सोय नाहीं ! आणि परवा तुझी खोली झाडण्याकरितां मी साऱ्या वस्तु हालविल्या त्या वेळीं माझ्या मदतीला आल्यासारखं करून तिनं तुझी सारी खोली मोठ्या दक्षतेनं स्वच्छ केली !

तुला पुस्तकांतून साऱ्या गोष्टी हातानं उतरून घेण्याचा फार त्रास होतो, असं ती म्हणाली, आणि तिनं मला पुढं सांगितलं कीं लवकरच ती तुला एक टाइपरायटर बक्षीस देणार आहे म्हणून ! हें मी तुला सांगू नये म्हणून तिनं मला बजावलं होतं !

तूं आपल्या खोलींत रात्रीं जागा राहून कांहीं लिहीत वाचीत सल असलास म्हणजे ती माझ्याजवळच्या आंथरूणावर झोपी गेल्याचं नुसतं नाटक करते. मला उजेडानं त्रास होऊं नये म्हणून मधलं दार तूं नेहमीं ओढून घेतोस. परवां मी डोळे उघडे ठेवून माझ्या गादीवर स्वस्थ पडले होते, तों कुणीतरी जवळून चालल्याचा भास झाला म्हणून मी चमकून पाहिलं, तेव्हां ती त्या दाराच्या किलकिल्या फटींतून तुझ्याकडे टक लावून पाहात होती.

आणि एकदां तूं म्हणाला होतास कीं बायकांनीं केसात फूल खोवण्याकरितां पैशाचा अपव्यय करण्याचं सोडून देऊन तो पैसा गोरगरी-बांना दिला तर सार्थकीं तरी लागेल ! हें तुझं बोलणें ऐकल्यावर आधींच आणून ठेवलेली फुलांची सुंदर वेणी तिनं तशीच सुकूं दिली पण डोक्यावर घातली नाहीं !

आणि तीन चार दिवसांपूर्वीचीच गोष्ट. रात्रीं निजण्यापूर्वी ती कांहीं तरी वाचीत होती आणि वाचतां वाचतां तिचा डोळा लागला. मी जागीच होतें. ती अर्धवट झोपेंत स्वताशींच कांहींतरी बोलत होती. मी कान देऊन ऐकूं लागलें. ती म्हणत होती, ' तीन फुलांच्या तीन तऱ्हा झाल्या. ' आणखी कांहीं ती बडबडली असती म्हणून मी तिला जागं केलं. पण जागी झाल्यावर एखादी गोष्ट सांगावी तसें तिनें मला सांगितलें, 'एका माळ्यापुढं एक ताज्या कळ्यांची रास पडली होती. त्यांतल्या तीन कळ्या एकमेकींशीं बोलत होत्या. एका कळीनें आपण देवाच्या शिरीं पडावें अशी आपली इच्छा असल्याचें सांगितलें. आपल्याला जागच्याजागींच वाळून जावेंसें वाटतें असें दुसरीनें म्हटलें. गुणग्राहकाच्या हातीं पडावें, असें तिसरीला वाटत होतें. योगायोग असा कीं, पहिल्या कळीची रवानगी वेश्येच्या घरीं झाली, दुसरी देवाच्या डोक्यावर अधिष्ठित झाली, आणि तिसरी माळ्याच्या दुकानांतील राशींतून खालीं पडून गाढवाच्या पायाखालीं चिरडून गेली.' हें ऐकून मी तिला म्हटलें, 'वेड्यासारखं काय बडबडतेस, नीरे !' त्यावर हंसत हंसत तिनें उत्तर केलें, 'वेडयासारखं नाहीं. अगदीं शहाण्यासारखं बोलतें आहे. त्या गोष्टींत सांगितलं आहे हें सुरेख तत्त्वज्ञान !''

माईनें नीरेचे मनोव्यापार उघड करून दाखविण्याकरितां सांगितलेले हे निरनिराळे प्रसंग ऐकून शिरीषकुमारांना कांहीं अननुभूत संवेदना झाल्याचा भास झाला. आणि सारे प्रसंग सांगून शेवटीं माईनें जेव्हां म्हटलें, 'तिला वेड लागलं आहे तुझं, असं मला वाटतं ! वरून ती दाखवीत नाहीं इतकंच !' तेव्हां तर त्याला विजेचा धक्का बसल्याप्रमाणें झालें.

संभ्रमानें जाग्यावरून उठतां उठतां त्यांनीं माईला इतकेंच उत्तर दिलें कीं, 'माई, मी खरंच याचा मनापासून विचार करतों आतां !' आणि बाहेरच्या खोलींत येऊन आरशांतल्या आपल्या प्रतिबिंबाकडे

पाहून त्यांनीं मनाशीं अर्धवट मोठ्यानें म्हटलें, 'I must think of it seriously.'

हल संबंध दिवसभर शिरीषकुमाराच्या मनावर माईनें सांगितलेल्या या गोष्टीचा परिणाम दृढपणानें टिकून राहिला होता. रात्रीं दादासाहेब आनंदकर आले होते, त्यांच्याशीं बोलतांना मुलाखतीचा आणि स्वतांच्याच जीवनक्रमाचा प्रश्न निघाला त्यावेळीं बोलतां बोलतां शिरीषकुमाराच्या मनांत येऊन गेलें कीं, 'ती मुलाखत आतां आज तागायत आहे असं कसं म्हणायचं. माझ्या मनावर झालेल्या अनेक वर्षांच्या संस्कारांत आज दुपारपासून एक नवीन भर पडली आहे. दरवर्षी नदीला पूर येऊन तिचें पात्र रुंदावतें आणि तीराच्या खुणा पालटतात हें खरें! पण हा बदल पाहायला मिळतो तो नदीचें पात्र पूर ओसरल्यावर जेव्हां दृष्टीस पडतें तेव्हां! नव्या महापुरानें भरलेलें सारें पात्र मागल्या पुराचें संस्कार दडवीत असतें. तसं झालं आहे माझ्या मनाचं. नीरेबद्दलच्या नव्या विचारांनीं आज माझं मन दुथडी भरून गेलं आहे त्या मनावरील मागल्या संस्कारांचे परिणाम पार धुवून चालल्यासारखे मला भासताहेत!'

दादासाहेब निघून गेल्यावर रात्रीं दिवा मालवून निजण्याकरिता शिरीषकुमारांनीं सारी तयारी केली. पण त्यांचें त्यांना काय वाटलें कुणास ठाऊक? त्यांनीं पुन्हां उठून दिवा लावला आणि आपल्या टेबलाचा खण पुढें ओढला. त्यांतून वाचण्यासाठीं कागद बाहेर काढण्याकरितां, त्यांनीं हात घातला इतक्यांत पुन्हां दिवा लावल्याची चाहूल घेऊन माई त्याच्याजवळ गेली, टेबलाच्या खणापासून त्याचा हात तिनें दूर केला, आणि त्याला म्हटलें, "आतां स्वस्थ नीज. कांहीं वाचूं नकोस. मालवलेला दिवा पुन्हां लावशील म्हणून या खणांतले सारे कागद मी माझ्या उशाशीं घेऊन निजतें." आणि माईनें बोलल्याप्रमाणें केलें. शिरीषकुमारांनीं किल्ली चालवून तो खण आधींच उघडलेला होता, म्हणून

माईच्या हातीं ते कागद लागले. दुसऱ्या दिवशीं सकाळीं लगबगीनें शिरीष-कुमार आपल्या शिकवणीकरितां निघून गेले. त्यांचे कागद त्याच्या खणांत ठेवावेत म्हणून माई त्या खणाजवळ गेली तऱ्हां तो खण उघडाच होता. त्या अरुंद खणांत कागदाच्या घड्या काळजीपूर्वक ठेवून देतांना दाराशीं कुणीतरी फेरीवाला आला म्हणून माई तें काम अर्धवट ठेवून तशीच गेली. ती पुन्हां विसरते म्हणीं टेबलाकडे गेलीच नाहीं. नीरेच्या हातीं ' न छापलेली मुलाखत ' लागली त्याचा इतिहास हा असा होता !

त्यामुळें आतां आठवण्याचा प्रयत्न करूनही नीरेच्या हातीं ही ' न छापलेली मुलाखत ' कशी लागली त्याचा उलगडा करतां येणें अशक्य झालें. स्वत:ला कांहीं आठवत नाहीं, तर तो प्रयत्न सोडून द्यावा म्हणून पुन्हां बोलणें चालू करीत त्यांनीं म्हटलें, " ती मुलाखत तूं वाचलीस तर एकूण ! छापण्याकरिता लिहिलेला मजकूर न छापण्याची जशी मी गंमत केली तशी न छापलेला मजकूर वाचून काढण्याचीही मौज तूं केलेली दिसतेस ! कुठं मिळाली ती वाचायला तुला ? "

" मला तुम्ही एक आश्वासन देणार असाल तर ती मी कुठं मिळ-विली तें सांगतें. मी जें काय मागणार आहें, तें मागण्यापूर्वीच त्याच्या-बद्दलचा होकार तुम्ही आधीं दिला पाहिजे, तर सारं कांहीं सांगतें. "

" कोणतं आश्वासन पाहिजे माझ्याकडून तुला ? अगदीं नाटकं-कादंबऱ्यांतून वर्णन केलेल्या नायक-नायिकांच्या प्रवेशासारखा तूं हा प्रवेश चालू केलेला दिसतोयस ! "

" करायलाच पाहिजे तसं. कारण ज्या माणसाशीं बोलायचं त्याचं आयुष्य जर कथाकादंबऱ्यांतून वर्णन केल्याप्रमाणें मनोरंजक असलं तर कादंबरींत घालण्यासारखेच संवाद त्या माणसाशीं करायला पाहिजेत ! त्या मुलाखतीचं, 'कादंबरींत घालण्याजोगा मजकूर' म्हणून तुम्हीच जर वर्णन केलं आहे, तर मला तिच्याबद्दलचं भाषण असंच एखाद्या कल्पित कथेतल्या नायिकेसारखं केलं पाहिजे. "

" तुला एखाद्या कल्पित कथेतल्या नायिकेसारखं मुद्दाम कशाला वागायला पाहिजे ? तुझं गेल्या सहा महिन्यातलं आयुष्य कुणीही नुसतं ओझरतं जरी पाहिलं तरी त्याला तें कल्पित कथेसारखंच मनोरंजक वाटेल. वाटेल तेवढा पैसा खर्चून शिक्षण करणाऱ्या बापानं एका चांगल्या माणसाशीं लग्न ठरवलं तर मुलगी घरांतून पळूनच गेली. सौभद्र नाटक पौराणिक म्हणून त्यांतील सुभद्रेनं नाहींसं होण्याचे प्रकार मला आजपर्यंत नेहमीं अद्भुत वाटत आले आहेत. पण आतां जर मला कुणी विचारलं तर मात्र या आधुनिक सुभद्रेकडे मी ताबडतोब बोट दाखवीन. "

नीरेच्या मनांत आलें कीं, या बोलण्यावर आपण चटकन् उत्तर द्यावें, " सौभद्रांत अर्जुन छद्मवेषानें सुभद्रेच्या घरांत येऊन राहिला. तर ही सुभद्रा कोणतंही वेषांतर न करतां अर्जुनाच्या घरांत येऊन राहिली आहे. "

आणि तिच्या कल्पनाशक्तीची मौज अशी कीं, असल्या प्रकारच्या विचारांनीं तिला एकदां चालना मिळाल्याबरोबर एखाद्या दिवास्वप्राप्रमाणें तिच्यापुढें सौभद्र नाटकांतील प्रसंगांच्या अनुरोधानें आताच्या घटनेंतही साम्यदर्शक प्रसंग उभे राहिले ! तिला वाटलें, समोर दिसते आहे ही मुंबईच्या उपनगरांतील टेकडी म्हणजे रैवतक पर्वत आहे, त्या टेकडीच्या पलीकडच्या बाजूला पसरलेल्या खाडीच्या कांठीं मिठागरांत काम करणारीं माणसं हीं समुद्रस्नान करण्याकरितां सज्ज झालेल्या यादव स्त्रीपुरुषांसारखीं आहेत. आपल्या कथेंतील रैवतक पर्वतावर गुहा नाहीं, त्या गुहेंत अर्जुनानं ठेवलेलं स्वतःच्या कपड्यांचं गाठोडं नाहीं ! मात्र त्या पर्वताचं पाषाणहृदय म्हणून ज्याचं वर्णन करतां येईल असली गुहा जरी इथं नसली तरी या ठिकाणीं शिरीषकुमारांचं मृदु हृदय हें त्या गुहेसारखंच चमत्कारांनीं भरलेलं एक गूढ आहे, आणि त्या हृदयकुहरांत शोधतां शोधतां आपल्याबद्दलच्या स्निग्ध भावना दडून राहिल्याचें आपल्याला आढळून येतें आहे, आणि—

पण शिरीषकुमारांच्या उद्गारांनीं तिचें हें सुखमग्न जागृतिस्वप्न भंग पावलें. किंचित थांबून, आपल्या बोलण्याचा समरोप करतांना त्यांनीं

म्हटलें होतें, "आणि मी मात्र घटोत्कचासारखा ऐन मीलनाच्यावेळीं अकस्मात् प्रकट होईन !"

"पण घटोत्कच मायावी होता !" नीरेनें आपण भानावर आहों असें दाखविण्याकरितां चटकन् उत्तर दिलें.

"हो, आणि त्या मायाजालांत गुरफटून घेण्याचा जर कुणी प्रयत्न केला तर त्याला चांगली अद्दल घडल्याशिवाय राह्यची नाहीं !"

"म्हणजे ?" रोखून पाहात नीरेनें प्रश्न केला.

"कां ? आश्चर्य कसलं वाटतं तुला त्यांत ? ती मुलाखत वाचून तुला नाहीं असं वाटलं कीं, माझ्या मनाचं मायाजाल हं मोठं चमत्कारिक आहे म्हणून ! त्या मायाजालाशीं खेळणाऱ्या माणसाला विजेच्या पंख्याशीं खेळल्यासारखं वाटेल ! पंख्याचा वारा लांबून ठीक वाटतो. त्या पंख्याचा डौलदार आकार, त्याची गतिमान् अवस्थेतील आकर्षकता, आणि अनावर आवेगाच्या भरांत मनाच्या भावनांनीं जसें एकमेकींत झपाट्यानें मिसळून जावें तसें त्याच्या पाकळ्यांचें वाढत्या गतीबरोबर होणारें अभिन्न मिश्रण इत्यादि गोष्टी लांबून ठीक असतात ! पण त्या पंख्याला त्याच्या ऐन गतीच्या वेळीं वेडावांकडा स्पर्श करण्याचा जर कुणीं बालिश प्रयत्न केला, तर त्या माणसाला असह्य इजा झाल्या-शिवाय राहात नाहीं. मला वाटतं, माझ्या मनाशीं किंवा थोडसं कादंबरीतल्या सारखं बोलतो—माझ्या हृदयाशीं कुणी खेळण्याचा प्रयत्न केला तर त्या माणसाला कदाचित् यातना होण्याचा संभव आहे."

नीरेची दृष्टि शिरीषकुमारांच्या चर्येवर खिळली होती. त्या चर्ये-वरचे सारे ल्हानमोठे भावतरंग आपल्या तीव्र दृष्टीनें ती अजमावण्याचा प्रयत्न करीत होती. पण पाण्याचा बुडबुडा धरण्याकरितां धांवणाऱ्या ल्हान मुलासारखी तिची निराशा झाली ! मोठ्या अपेक्षेनें ती न्याहाळून पाहात होती. तिला वाटलें होतें कीं, त्या चर्येवर अन्तःकरणांतल्या अनेक

परस्परविरोधी विकारांचें तांडव पाहावयास मिळेल, बोलून न दाखविता येणाऱ्या प्रणयाच्या वेदना त्या ठिकाणीं दिसतील, परिस्थितीच्या आंचेनें होरपळून गेलेल्या मनाचे उद्वेग अजमावयाला सांपडतील ! आणि आपल्या अपेक्षेप्रमाणें या साऱ्या गोष्टी दिसल्या कीं मोठ्या तत्परतेनें आपण पुढें होऊं आणि आपल्या स्निग्ध स्पर्शानें हा सारा दुःखभार हलका करण्याचा प्रयत्न करूं; आणि—

पण यावेळीं शिरीषकुमाराच्या मुद्रेवर कसल्याच प्रकाराचा भाव प्रकट झाला नाहीं, आणि म्हणूनच तिचें मन विलक्षण गोंधळून गेलें. विजेच्या दिव्याचें बटन दाबावें पण दिवा लागूं नये, मधाच्या मोहोळावर खडा मारावा पण तिथल्या माशा उठू नयेत, सुंदर चंद्रप्रकाशांत नौका-विहाराचें सुख अनुभवावें म्हणून होडींत बसून वल्हीं चालवावीत पण होडी जागची हालूं नये, खुणेचा वृक्ष शोधण्याकरितां मोहातुर पक्षिणीनें पंखांचा फडफडाट करीत भ्रमण करावें पण तो वृक्ष सांपडू नये, तसें तिचें झालें !

टेकडीवर पोहोंचल्यावर चांगलीशी जागा पाहून तीं दोघेंही बसलीं. मुंबईच्या नेहमीच्या धावपळीपासून माणसाच्या मनाला दूर नेणारी ती जागा होती ! त्या ठिकाणीं वाहनांचे निरनिराळे संमिश्र आवाज, फेरीवाल्यांच्या आरोळ्या, गिरण्यांचे भोंगे, ऐकूं येत नव्हते. कित्येकवेळां कुठें जावयाचें तें माहीत नसतांनाही विलक्षण धावपळ करीत गडबडीनें फिरणारीं माणसें, धावत्या वाहनांत गर्दीनें चढणारे तरुण लोक, आणि गिरण्यांचे धूर यापैकीं एकही गोष्ट त्याठिकाणीं दिसत नव्हती ! पाठीमागें फक्त मिठागरांच्या पांढऱ्या चौकटी होत्या. शुभ्र गणवेश केलेली बालकें ओळीनें उभीं राहावींत, तशा त्या चौकटी दिसत होत्या ! हार्बरलाईनची लोकलगाडी लांबून सरपटत जात होती. नुकत्याच दिलेल्या गाडीच्या गडद लाल रंगामुळें ती गाडी एखादी रक्ताची धार ओघळून जावी तशी वाटत होती !

तो मौंवतालचा शांत देखावा पाहात शिरीषकुमारांनी म्हटलं,
" किती शांत आहे नाहीं इथं ? आपल्या स्वतांच्याच भगभगीकडं आपण दुरून पाहिल्यासारखं वाटतं आपल्याला ! ज्या जागेत आपण एकसारखं काम करीत असतों, तिथून खूप दूर जाऊन त्या जागेकडे तटस्थपणानें पाहिलं म्हणजे आपलं मन न कळत आपली स्वतांची स्थापना त्या दूर दिसणाऱ्या देखाव्यांत केल्याशिवाय राहात नाहीं. एकावेळीं अनेक ठिकाणीं प्रकट झाल्याच्या देवादिकांच्या गोष्टी आपण ऐकतों. मला वाटतं हे प्रकट होण्याचे सारे खेळ मनाचे आहेत. मनासमोर उभ्या असलेल्या प्रत्येक प्रसंगांत आपण स्वताला मूर्तिमंत उभं करतों आणि म्हणून एकाच क्षणाला एक व्यक्ति मनानं दोन, तीन किंवा चार ठिकाणीं जाऊं शकते. "

" आज तुम्हाला सारखीं देवादिकांच्या गोष्टी सांगणारीं पुराणंच दिसताहेत वाटतं ? मला वाटलं होतं, त्या मुलाखतींत तुम्ही लिहिल्याप्रमाणं अगदीं लहानपणीं झालेले हे पौराणिक संस्कार आतां पुसून गेले असतील म्हणून ! म्हणजे एकूण त्या मुलाखतीतही तुमचं सारं मन व्यक्त झालं नाहीं तर ! "

" माझ्या मनाचं एक असूं दे. पण आपल्या बोलण्याच्या ओघांत आपण तुझं मघांचं मुलाखतीबद्दलचं बोलणं अर्धवटच सोडलं. कसलं आश्वासन हवं होतं तुला माझ्याकडून ? "

'ती मुलाखत माझ्याजवळ नेहमीं राहावी अशी माझी इच्छा होती.'

" तुझ्याजवळ यायला माझी कांहीं हरकत नाहीं. पण त्यांतील ' न छापलेली ' हे शब्द अक्षरशः खरे मानले पाहिजेत. आणि छापणं म्हणजे फक्त कागदावर छापणं असंच केवळ नाहीं. त्यातील गोष्टींची तोंडानं जरी नुसती वाच्यता केली तरीही त्यांचा छाप दुसऱ्याच्या मनावर उठतो म्हणून त्यांतलं एक अक्षरही कुठं बोलून दाखवायचं नाहीं. खरो-खरच माझ्या स्वताच्या समाधानाकरितां मीं तें लिहिलं आहे. आणि

पुढं मार्ग असंच लिहीत राहावं, अगदीं प्राजलपणानं जें काय वाटतं तें लिहीत राहावं, असं मला वाटतं."

नीरेनें उत्तर केलें, "तुम्ही म्हणतां त्या अर्थानंसुद्धां मी त्या मुलाखतीचा छाप उठविणार नाहीं।"

आणि हें उत्तर देतांना आपल्या मनांत उठणारा भावनांचा कोलाहल स्वतांलाच ऐकूं येऊं नये म्हणून तिनें समोरच्या एका टेकडीच्या उतरणीवर असलेल्या लहानशा बंगलीकडे बोट दाखवीत विचारलें,

"किती सुबक आहे नाही ती छोटी इमारत? इथं राहावं आणि इथून सारं काम करीत राहावं असं वाटतं कधी कधी, असली एकान्ताची जागा पाहिली म्हणजे!"

"पण या जागेंत राह्यचं म्हणजे इथं जी मोकळी हवा वावरते आहे, तिची जबर किंमत द्यावी लागेल हे कुठं आहे माहीत तुला? मुंबई-सारख्या हवेंत दरेक फुटाच्या उंचीला जागेची किंमत वाढत जाते. ही जागा कुणाकरिता आहे सांगू?"

"हं."

"आपली गडगंज संपत्ति खर्चून टाकण्याकरितां ज्याला चालू जगांतले सारे विलास अपुरे पडले आहेत, आणि त्या त्याच्या विलासांच्या पायीं ज्याची बायको, दुर्धर रोगानीं पछाडली आहे अशा माणसाच्या हवा फेराकरितां ही जागा आहे. तेंच दुर्धर रोग आमच्यासारख्या गरिबांना झाले तर मात्र आम्हीं हवाफेराच्या गोष्टी फक्त तोंडानं बोलायच्या, असल्या इमारतींच्याकडे केवळ लांबूनच पाह्यचं आणि स्वस्थ बसायचं।"

"पण आतां तर त्या इमारतीला कुलूप दिसतं आहे।"

"हो. तें कुलुप स्टेशनवरच्या प्लॅटफॉर्म तिकिटाच्या यंत्रासारखं आहे. त्या यंत्रांत आणेली टाकल्याशिवाय जसें तिकिट येत नाहीं, तसें या कुलुपांत पैसे ओतल्याशिवाय तें उघडायचं नाहीं।"

" खरंच, असली इमारत थोडक्या पैशांत मिळाली तर—"

" ती इमारत दुसऱ्याला मिळण्याचं राहू दे. पण ज्यानं बांधली त्याला तरी तिचा उपभोग घेण्याची बुद्धि कुठं सुचते आहे? आमच्या लोकांना आधीं स्वतांच सुखरूपपणानं आणि आयुष्यांतील प्रत्येक क्षण व प्रत्येक बाब उपयुक्त मानून राह्यला शिकविलं पाहिजे. ही इमारत ज्यानं बांधली तो या मुंबईंतच एकाद्या दाटीच्या वस्तींत किंवा एकाद्या खेडेगांवांतील खुराड्यांत बसून राहिला असेल. त्यानं तेथून बाहेर येऊन आपल्या हक्काची ही जागा उपभोगायला शिकलं पाहिजे. नाहींतर कुलूप लावून ठेवलेली असली जागा माझ्यासारख्याला, माझ्या माईकरतां—"

बोलतांबोलतां किंचित् थांबून शिरीषकुमारांनीं पुन्हां म्हटलें, 'उत्तररामचरित्रांतल्या रामासारखं झालं आहे माझं. सीतात्याग केल्यानंतर सीतेच्या विरहाकरितां त्याला रडायचं हातं; पण रडण्याकरितां त्याला चौदा वर्षं थांबावं लागलं! तसं माझ्या दुःखांसाठीं मी रडायचं म्हटलं तर मला खरोखरच महिनचे महिने थांबावं लागतं! माईचा आजार तर दिवसेंदिवस वाढतो आहे. औषध न घेण्याचा तिचा हट्ट आणि ती सुधारावी म्हणून माझ्या मनाचा आग्रह, या दोहोंच्या झगड्यांत शेवटीं काय होणार आहे कुणास ठाऊक? माईला घेऊन कुठं तरी जावं, चांगलं कोरड्या हवेच्या ठिकाणीं राहावं असं मनांत यतं. पण मुंबईतून एक दिवस जरी शिकवण्या सोडून बाहेर गेलों तरी हातीं पैसा राहाणार नाहीं. माझ्यांत आणि रोजन्दारीनं काम करणाऱ्या मजुरांत तसं पाहिलं तर कोणतं अंतर आहे? महिन्याकांठीं मिळणारे पैसे त्याच महिन्याला पार संपून जातात. साध्या गरजा भागवितां भागवितां मी मेटाकुटीला येतों आहें माझं काम करणं सुकर होईल अशा प्रकारची एकही सोयीची वस्तू मला आजपर्यंत मनांत आल्याबरोबर पैदा करतां आलेली नाहीं. किती वर्षं मी म्हणतों आहें कीं, एक टाईपरायटर घेईन, पण तें आजपर्यंत शक्य झालेलें नाहीं. पुस्तकं आणण्यानेण्याकरितां एक लहानशी कातडी पेटी घ्यावी म्हणून मी कितीदां

तरी मनांत म्हटलं असेन! आरामखुर्चीत बसल्याबसल्याच लिहिण्याची सोय असलेली एक खुर्ची घ्यावी असं कितीदां तरी मला वाटलेलं आहे! प्रत्येक थंडीच्या मोसमांत मी मनाशीं कितीदां तरी बेत केले असतील कीं, माईला एक उबदार शाल घ्यावी आणि स्वतःकरितां एक गरम कोट करावा! पण निकामी घोड्यानं केलेल्या शर्यत जिंकण्याच्या मनोरथांप्रमाणें माझे हे बेत ज्या मनांत उद्भवले, त्याच मनांत आजपर्यंत पार विरून गेले आहेत! हें असंच आणखी कांहीं दिवस चाललं तर मला वाटतं मीही अशा निकामी घोड्याप्रमाणें जागच्याजागींच खूर आपटीत कुठं तरी जगाच्या कोंपऱ्यांत पडून राहाणार!'

शिरीषकुमारांचा दुःखावेग ओसरून जावा म्हणून नीरेनें मुद्दामच म्हटलें, 'मा म्हटलं तें कांहीं खोटं नाहीं. ती मुलाखत अपुरी आहे आणि तिच्यांत सारं मन व्यक्त झालं नाहीं!'

'कशाला मागायच्या आपल्या या भगभगां लोकांना! ज्याचं त्याला काय थोडं झालेलं आहे? गंमत अशी कीं, ज्याला आपल्या दुःखाबद्दल जिव्हाळा वाटतो तो जातिवंत निर्धन असल्यामुळें शाब्दिक सहानुभूतीपुढं त्याला कांहीं करतां येत नाहीं. आणि ज्यांना कांहीं करतां येणं शक्य आहे, त्यांच्याठिकाणीं जिव्हाळाच निर्माण होत नाहीं. मोठी मजदार मनोवृत्ति असते या श्रीमंतांची. आपण काय करतो किंवा काय बोलतों याचा त्यांना अर्थच कळत नाहीं! गेल्यावर्षी शिवलालची मुलगी हंसा वार्षिक परीक्षेत पास झाली, त्यावेळेला शिवलालनीं मला एक दिवस घरीं जेवावयला बोलाचलं होतं. त्यावेळचा प्रसंग माझ्या डोळ्यापुढं राहून राहून उभा राहातो. बिचारी हंसा मात्र मोठी लाघवी मुलगी आहे. तिला नवीन जगाची जाणीव अल्पशा प्रमाणांत कां होईना पण झालेली आहे माझ्यासारख्या शिक्षकांपुढें तिचा निर्बुद्ध लक्षाधीश बाप हा कांहीं प्रमाणांत टाकाऊ आहे याची तिला मधून मधून सूक्ष्म जाणीव झाल्याचं दिसतं. तिला माझ्याबद्दल खरोखरच फार कौतुक वाटतं. पण ती काय करणार? त्या दिवशीं मी जेवायला

गेलों असतांना त्यांचं एक गुजराथी उंची पक्वान्न त्यांनीं केलं होतं. इतरही अनेक जिन्नस केले होते. चांदीच्या ताटाबाहेर पांचसहा वाटयांतून निरनिराळे पदार्थ वाढलेले होते. पानावर बसल्यावर शिवलालनीं मला म्हटलें, ' मास्तर ती पहिली वाटी आहे ना तींत केशराचं पाणी आहे, बरं कां? मागं एकदां एका माणसानं त्या पाण्याचा भुरका मारला होता. त्या पाण्याचा भुरका मारायचा नसतो ! एका पदार्थाचा हात दुसऱ्या पदार्थाला लागू नये म्हणून हात धुण्याची ती सोय केलेली असते! ' आणि या बोलण्यानंतर त्यांनीं जे विचित्र हास्य केलं त्यांत निदान मला तरी हेटाळणीचा उग्र दर्प आला. आणि जेवणानंतर याहीपेक्षां असह्य प्रकार घडला. हंसाच्या आग्रहावरून मला वाटतें शिवलालनीं मला त्यांच्या गुजराथी पद्धतीप्रमाणें कांहीं तरी आहेर देण्याचा बेत केला होता. तो स्वीकारण्यासंबंधांत माझी वृत्ति कशी आहे हें अजमावण्याकरितां कांहीं तांत्रिक बोलणें झालें, आणि हंसाच्या आग्रहावरून मी त्या आहेराचा स्वीकार करीन असें पाहिल्याबरोबर शिवलालनीं आपल्या गड्याला ' आहेर ' बाहेर आणण्यास सांगितलें. माझ्या हातीं एक गरम कापडाची घडी टेंकीत शिवलालनीं म्हटलें, 'मागच्या थंडीत तुम्ही कुडकुडत यायचें तें पाहून हंसा नेहमीं म्हणायची कीं बिचारे मास्तर थंडीनें अगदीं काकडून जातात!' बापाची ही प्रस्तावनेची पहिली सलामी ऐकल्याबरोबर हंसा गोरीमोरी झाली आणि तिनें तत्परतेनें म्हटलें, 'छे छे. मी असं कधीं म्हटलं दादा!' त्यावर शिवलालनीं तिच्याकडे पाहिलें न पाहिलेंसे केलें, आणि पुन्हां म्हटलें, ' बरोबर आहे मास्तर तें सारं! तुम्ही तरी उबदार कपडे कसे वापरणार? मीं तरी कांहीं हे फारसं उंची कापड दिलं नाहीं. म्हटलं तुम्हांला शोभेल असंच द्यावं' त्यावेळीं शिवलालच्या बोलण्याचा मला राग आला. पण आज मला वाटतं कीं आपलं बोलणं दुसऱ्याच्या मनाला किती दुखविणारें आहे, हें त्याचं त्यालाच समजलं नसावं ! मी मात्र त्यावेळीं तें गरम कापड घेतलं खरं, पण पुढें कुणाला तरी देऊन टाकलं! तेव्हां परवांच्या थंडीच्या दिवसांत माझ्या अंगांत गरम कोट नाहीं असं पाहून शिवलालनीं मला

एकदां सहज विचारलं, 'मास्तर, त्या कापडाचा कोट शिवला नाहीं वाटतं तुम्ही ?' मी त्यावर उत्तर केलें, 'देऊन टाकलं मी तें एका गरिबाला !' शिवलाल हंसत हंसत म्हणाले. 'फारच बुवा उदार तुम्ही ! इतका उदारपणा करून कसं निभायचं ?' असले प्रसंग आठवले म्हणजे मला कित्येक वेळां वैताग येतो. पण तो वैताग गिळण्याशिवाय गत्यंतर नसतं. काय करायचं ? पैसे मिळविण्याचं दुसरं सोईस्कर साधन सांपडेपर्यंत मला याच श्रीमंतांची मनधरणी केली पाहिजे. अलीकडे केव्हां केव्हां अशी भीति वाटते कीं माझ्या मनोवृत्तीचा केव्हां तरी स्फोट होणार आणि साऱ्या शिकवण्या सोडून मला कांहीं दिवस तरी आततायीपणानं वागावं लागणार, माईच्या पाशामुळं—'

शिरीषकुमारांची ही तळमळ पाहून नीरेनें क्षणमात्रच विचार केला, आणि चटकन् आपल्या गळ्यांतील सोन्याची सांखळी, फांस सोडवून घेऊन तिनें काढली आणि तळहातावर ती गोळा करून तिनें ती शिरीषकुमारासमोर धरीत म्हटलें, 'फूल नाहीं फुलाची पाकळी म्हणून हें घ्या. माझ्याजवळ तुम्हांला देण्यासारखं दुसरं काय आहे ? नाहीं म्हणूं नका.' साखळी असलेला नीरेचा हात आपल्या दोन्ही हातांनीं दाबून धरीत शिरीषकुमारांनीं नीरेकडे टक लावून पाहिलें आणि म्हटलें, 'नीरे, माझ्या बद्दलचा तुझा जिव्हाळा असाच कायम टिकेल कां ?'

'शिरीष, तुम्ही जें काम करतां आहां तें पाहिलं म्हणजे माझ्यासारख्या दुबळ्या मुलीचा जिव्हाळा त्या मानानं किती थोडा आहे, त्याची जाणीव होऊन माझा मलाच संकोच वाटतो.'

'नीरे, तुझा जिव्हाळा मला हवा आहे. पण तूं देऊ केलेली मदत मला नको आहे. कारण तूं कितीही मदत केलीस तरी, माझ्या दुखावलेल्या मनानें संकल्पिलेले मनोरथ प्रत्यक्षांत आणायला ती मदत पुरी पडणार नाहीं. डोळे उघडून पाहाशील, तर तुला आढळून येईल कीं, माझ्यासारखें हजारों लोक आहेत. आणि माझ्यापेक्षांही शतपटींनीं दुर्दैवी

असे लोक तर लाखों आहेत. यांना तूं एकटी किती मदत करणार. म्हणून म्हणतों, तुझा निर्लोभ जिव्हाळा माझ्या वांट्याला यावा एवढीच माझी मनःपूर्वक इच्छा आहे.'

तीं दोघेंही त्या स्थितींत निस्तब्धपणानें कांहीं वेळ तशींच बसून राहिलीं!

रस्त्यानें परत येत असतां 'कोबीची भाजी' म्हणून ओरडत चाललेल्या भाजीवाल्याकडून नीरेनें पांढरे भरदार कोबीचे गड्डे विकत घेतले! भाजी विकत घेण्याची तिची ती आस्था पाहून शिरीषकुमारांनीं नीरेला म्हटलें, 'तुला कुणी तरी सांगितलेलं दिसतेय् कीं मला ही भाजी फार आवडते म्हणून!'

नीरेनें नुसतेंच स्मित केलें.

ट्रॅमनाक्यापाशीं आल्यावर एक सुवासिक वेणी विकत घेऊन ती शिरीषकुमारांनीं नीरेच्या हातीं दिली.

नीरेनें हातानें नको अशी खूण करीत विचारलें, 'आवडत नाहीं ना तुम्हाला असला उगीच खर्च केलेला?'

शिरीषकुमारांनीं आग्रहपूर्वक तिच्या हातीं ती वेणी दिल्यासारखें करून म्हटलें, 'कधीं कधीं आवडतो!'

---

## प्रकरण १८ वें.

# संसार ! संसारच म्हणतात कां याला ?

——:०:——

पण घरीं आल्याबरोबर तिला अनाथालयांतलें बोलावणें आल्याचा निरोप माईनें कळविला. वास्तविक ती रात्र पडल्यानंतरची वेळ अनाथालयांतलें बोलावणें येण्याची नव्हती. त्यामुळें साहजिकच निरोप कळल्याबरोबर नीरेनें आश्चर्यानें विचारलें, ' म्हणज ? '

त्यावर माईनें सांगितलें, ' आलेल्या माणसानं चिठ्ठी आणली होती, ती ठेवली आहे तिकडे टेबलावर ! '

नीरेनें चिठ्ठी हातीं घेतली आणि वाचली. तींत लिहिलें होतें,

—' आपल्या अनाथालयांतील एका कामगार बाईला एका पठाणानें अनाथालयाच्या बाहेर नेऊन तिच्यावर सुऱ्यानें हल्ला केला आहे. जखमी बाईला जे. जे. हॉस्पिटलमध्यें पोंचविलें असून पठाणाबद्दल पोलिसांत वर्दी दिली आहे — '

चिठ्ठींतील या तांत्रिक मजकुरानें फारसा खुलासेवार बोध होत नव्हता, तरी झाला प्रकार फार भीषण असावा अशी खात्री पटत होती.

चिठ्ठींतील तो मजकूर पाहून शिरीषकुमारांनीं आपण होऊनच म्हटलें; ' चल, मी येतों तुझ्याबरोबर. '

आणि एक व्हिक्टोरिया करून तीं दोघेंही अनाथालयाशीं पोहोंचलीं. अनाथालयाच्या दाराशीं लोकांची गर्दी झाली होती. त्या गर्दींतून मार्ग काढीत ती आंत गेली अनाथालयाचे चालक आधींच त्या ठिकाणीं येऊन बसले होते. शिरीषकुमारांना पाहून त्यांनीं म्हटलें, ' मि. पटवर्धन,

पहा हें कसं नवीनच संकट उपस्थित झालं तें ! तरी आम्हीं आमच्याकडून फार जपणूक करीत असता. ठराविक वेळेशिवाय तुणाला भेटायचं नाहीं, आणि भेटायला येणाऱ्या माणसासंबधीं चांगली खात्री करून घेऊन मग त्याला भेटायला परवानगी द्यावी असा आमचा कडक नियम आहे. पण या नियमालाही धाब्यावर बसवून त्या गरीब बाईला पठाणानं ती कुठं इथून थोडांशी बाहेर पडण्याचा अवकाश कीं गांठलं आणि तिच्यावर सुऱ्याचा वार केला आहे. थोडक्यांत वांचलं. नाहींतर बाई मरायचीच ! आसपासच्या तिऱ्हाईत माणसांनी फार लवकर साऱ्या परिस्थितीला आवर घातला. बाईला दंडावर एकच जखम झाली आहे. तशी कांहीं तिच्या जीविताची धास्ती नाहीं. पण आतां प्रश्न आहे तो या अनाथालयांतल्या इतर बायकांना या ठिकाणी राहाण्याची फार भीती वाटायला लागली आहे, ती आंवरण्याचा, आणि आठपंधरा दिवस इथल्या बायकांना दुसरीकडे कुठें हलवून न्याव्या कीं काय याचा विचार करण्याचा ! '

त्या गृहस्थाचें हें बोलणें ऐकून सर्व गोष्टींचा साधारण उलगडा झाला होता. ज्या कामगार स्त्रीवर हल्ला झाला होता, ती नीरेला मागें भेट-लेली स्त्रीच होती. अनाथालयांत प्रवेश मिळविण्याकरितां नीरेला भेटून जिनें आपली कहाणी सांगितली तीच ही स्त्री होती !

शेवटीं बराच विचारविनिमय होऊन असें ठरलें कीं, अनाथा-लयांतल्या ज्या बायकांना कुणा चांगल्या ओळखीच्या ठिकाणीं जातां येणें शक्य असेल त्यांनीं मुंबईतील त्या त्या ठिकाणचे पत्ते सांगावेत, आणि योग्य ती खात्री करून घेऊन त्यांची त्या ठिकाणीं पोचविण्याची व्यवस्था करावी. अनाथालयांत त्या बायकांनीं पंधरा दिवसांनीं परत यावें.

हें ठरल्यावर नीरेच्या मनांत एक कल्पना चमकून गेली ! दोन दोन स्त्रियांना खोलींत बोलावून घेऊन त्यांची अशी दुसरीकडे जाण्याची सोय आहे कीं काय हें विचारण्यांत येत होतें. त्यांत नर्मदाबाई आनंदकर आल्याबरोबर नीरेनं आपण होऊनच म्हटलें, " यांची सोय मी माझ्याकडे

करतें." नीरेच्या या उद्गारांचे नर्मदाबाईला फार आश्चर्य वाटलें. त्यापेक्षांही शिरीषकुमाराला तर आश्चर्यानें क्षणभर स्तंभितच केलें. नर्मदाबाई आनंदकर ही व्यक्ति शिरीषकुमारांनीं यापूर्वी कधीं ओझरतीही पाहिली नव्हती. त्यामुळें नीरेनें याच बाईची सोय करण्याचें इतक्या तत्परतेनें कां कबूल केलें असावें, त्याचा त्याला उलगडा होईना. त्यांचा हा मनाचा गोंधळ ध्यानांत येऊन नीरेनें म्हटलें, "मग मी सांगेन तुम्हांला सारं कांहीं. पण या बाईंना आज आपल्याबरोबर घेऊन जाणं फार जरूर आहे असं मला वाटतं"

सारें काम संपल्यावर चालकांचा निरोप घेऊन शिरीषकुमार, नीरा आणि नर्मदाबाई अशीं तिघेंही घरीं आलीं. माईचा स्वयंपाक तयार होत आला होता. नर्मदाबाईची माईशीं ओळख करून देऊन नीरेनें नर्मदाबाईला कोणत्याही प्रकारचा संकोच वाटणार नाहीं अशी व्यवस्था केली. नर्मदाबाईनें स्वयंपाकांत मदत करणें माईला चाललें नसतें, म्हणून ती बाजूलाच बसून माईशीं बोलत होती. अनाथालयांत झालेल्या अचानक अपघाताचें वर्णन ऐकावयाला मिळावें अशी माईलाही जिज्ञासा होती. माईनें नर्मदाबाईला कांहीं प्रश्न विचारून ती हकिकत सांगावयास लावलें. आणि नर्मदाबाईनेंही सारा ऐकलेला प्रकार शक्य तितक्या विस्तारानें माईला वर्णन करून सांगितला.

नीरा आणि शिरीषकुमार, शिरीषकुमारांच्या अभ्यासाच्या खोलींत बसलीं होतीं. शिरीषकुमारांना सारी हकिकत सांगून झाल्यावर नीरेनें विचारलें, 'जगन्नाथ कायसा त्यांना बोलावण्याकरितां गेला आहे ना ! संध्याकाळीं तुमचं ओझरतं बोलणं मीं ऐकलं.'

त्यावर शिरीषकुमारांनीं उत्तर केलें, 'नीरे, असल्या गोष्टींत घाई करून चालयचं नाहीं. वास्तविक या गोष्टीला दोन बाजू आहेत हें स्पष्ट दिसतं आहे. आपल्याला कळली आहे ही फक्त नर्मदाबाईची बाजू कळली आहे. त्या दादासाहेबाला या संबंधात काय म्हणायचं आहे तें नीट

कळल्याशिवाय तूं म्हणतेस अशा प्रकारची योजना घडवून आणण्याकरितां आपण कांहीं खटपट केली तर तिचा परिणाम विपरीत झाल्याशिवाय राह्यचा नाहीं. कारण माझ्या कल्पनेप्रमाणं हा दादासाहेबही कांहीं अगदीं वाईट गृहस्थ नाहीं. गेल्या तीन महिन्यांत त्याच्या माझ्या निरनिराळ्या ठिकाणीं बऱ्याच वेळां गांठीभेटी झाल्या आहेत. त्याच्याशीं निरनिराळ्या विषयांवर माझें संभाषण झालें आहे. त्या त्या वेळीं मला तो चांगला विचार करून बोलणारा असा गृहस्थ वाटला. अर्थात् आतां असंही म्हणतां येईल कीं, एखाद्या विषयावर मुद्दाम बोलण्याचा प्रसंग आला म्हणजे मनुष्य आपल्या खऱ्या भावनांची बेमालूम रीतीनें झाकपाक करतो. '

'मी त्या माणसाला सारा दोनदांच पाहिला आहे. '

' म्हणजे माझ्याच म्हणण्याला बळकटी येते आहे. नीरे, दोनदांच पाहून एखादा मनुष्य कसा आहे, याचा निर्णय करणं थोडसं धाडसीपणाचं नाहीं कां ? आज मी आणि माई किती वर्षं एकत्र राहात आलों आहों पण आमचीं मनं एकमेकांना कळली आहेत असं आम्हां दोघांनाही म्हणत येणं फार अवघड आहे, अशी माझी खात्री आहे. फार कशाला ? तूं मला किती वर्षं पाहात आली आहेस ! गेले कांहीं महिने तर तूं प्रत्यक्ष माझ्या घरांत अगदीं माझ्या निकट सहवासांत राहिली आहेस. पण तुला असं खात्रीनं म्हणतां येईल कां कीं, 'या शिरीषकुमाराच्या मनाचे सारे धागेदोरे मी अगदीं बरोबर उलगडले आहेत? ' म्हणून म्हणतो कीं, असल्या गोष्टींचा सर्व बाजूंनीं विचार करण्याची आपण आपल्या मनाला संवय लावली पाहिजे. परवांच त्यांचं माझं बोलणं चाललं असतांना इथल्या एका 'समाजसुधारणामंडळा' विषयीं गोष्ट निघाली. या मंडळाच्या प्रचारकांनीं छापील विनंतिपत्र काढून कायदेकौंसिलांत 'एकपत्नीव्रताचा' ठराव यावा म्हणून अनेक स्त्रीपुरुषांच्या सह्या मिळविण्याचा उद्योग आरंभला आहे. 'तुम्ही सही दिली कां' ?-म्हणून आनंदकरांनीं मला विचारलें तेव्हां मी विनोदानं उत्तर दिलं कीं, 'मी अविवाहित असल्यामुळें

त्या शब्दांतील एक किंवा पत्नी किंवा व्रत यांतल्या कोणत्याच घटकांशीं माझा अर्थाअर्थी संबंध पोहोंचत नाहीं ! पण हें विनोदाचं बोलणं झाल्यावर या विषयासंबंधानं आम्ही मनापासून चर्चा केली तेव्हां मला आनंदकरांनीं आपण स्वतां सही दिल्याचं सांगितलं ! अशा प्रकारच्या बिलाला माझा मात्र तात्त्विक विरोध आहे. समाजांत स्त्रीपुरुषांचं एकत्र शिक्षण, एकत्र येण्याचे प्रसंग आणि आमची सनातन विवाहपद्धति यांचा नीट समन्वय करण्याचा प्रयत्न न करतां नुसतीं असलीं बिलं पास करण्यांत कांहीं अर्थ आहे असं मला वाटत नाहीं. शापाला जसा उःशाप ठरलेला असतो तसं व्रतालाही उद्यापन असतं. हें व्रत कांहीं विशिष्ट परिस्थितींत सोडण्याशिवाय गत्यंतर उरत नाहीं, असे आजपर्यंतचे अनुभव आहेत ! त्या आनंदकरांनींही 'सागर' मासिकांत याच विषयाचा उहापोह करणारी एक गोष्ट लिहिली आहे. त्यानीं मला परवांच तो अंक दिला. त्यांत ' कुमार ' या लेखकानं लिहिलेली ती गोष्ट तूं अवश्य वाच. मी अजून ती वाचली नाहीं. पण हा विषय आनंदकरांच्या आयुष्याशीं निगडित आहे अशी माझी कल्पना नव्हती. नाहीं तर मी ती गोष्ट तेव्हांच वाचली असती. पण आतां जेवण झाल्यावर ती गोष्ट तूं अवश्य वाच, म्हणजे मला वाटतं कीं, कदाचित् या प्रकरणावर आपोआप प्रकाश पडायला मदत होईल.'

'पण मघां तुम्ही म्हटल्याप्रमाणं गोष्ट लिहितांनाही मनुष्य आपल्या खऱ्या भावना लपविल्याशिवाय राहील कां ? गोष्टी लिहिणं म्हणजे काय ? चटकदार भाषेनं सामान्य वाचकांना तात्पुरती भुरळ पाडून खऱ्या नसलेल्या गोष्टी खऱ्या मानण्याकरिता तयार करणं होय, असं मी कुठं तरी वाचल्याचं मला आठवतं ! या गोष्टीसंबंधांतही नेमकं तेंच म्हणणं खरं ठरण्याचा संभव आहे. मला त्या गोष्टीला विरोधक अशी बाजू बहुतेक पूर्ण कळली आहे असं मला नक्की वाटतं. मी गोष्ट वाचते.

त्याला माझी कांहीं हरकत नाहीं. पण त्यांत प्रामाणिकपणा किती असेल त्याची मला शंका आहे.'

'प्रथम कोणतीही गोष्ट प्रामाणिक आहे असं म्हणूनच आपण काम चालू करावं. अप्रामाणिकपणाचा उलगडा आपल्याला करतां येणार नाहीं असें नाहीं!

इतक्यांत माईनें 'पानें वाढलीं,' म्हणून म्हटल्याचें ऐकूं आलें आणि तीं दोघेही जेवणाकरितां उठलीं.

× × ×

## त्याचा संसार.

( लेखक—कुमार )

अगदीं चारचौघासारखाच तो एक माणूस होता. पण त्याचा आयुष्यक्रम मात्र चारचौघासारखा नव्हता. लोकांमध्यें त्याच्याबद्दल अनेक गैरसमज होते. कुणी त्याला चंगीभंगी म्हणत; कुणी त्याची कींव करीत आणि कुणी त्याला मूर्ख म्हणत. त्याला स्वतांलाही आपण आपल्याला काय म्हणून घ्यावें तें समजत नव्हतें! कुणी त्याला प्रयत्नवादी म्हणत; कुणी त्याला सुखवादी म्हणत; कुणी त्याला तो कांहींतरीच आहे म्हणून म्हणत, आणि कुणी त्याला कांहींच म्हणत नसत. आपला दैनंदिन जीवनक्रम पाहून त्याला स्वतःलाही मोठा पेंच पडे. आयुष्यांत घडलेल्या कित्येक गोष्टींना तो आवरूं शकला नाहीं. आरशांतल्या प्रतिबिंबाशीं झोंबी घेणाऱ्या पक्ष्याला तो आभास आहे हें उमजूनही त्याची पंखाचा फडफडाट करण्याची प्रवृत्ति थांबत नाहीं. तसें आपलें आयुष्य हें अनेक आभासांचें एक चक्रव्यूह आहे याची जाणीव होऊनही तो त्या चक्रव्यूहांतच घोटाळत होता.

त्याचें लग्न झालें होतें. 'झालें होतें,' हाच शब्दप्रयोग अगदीं योग्य आहे. कारण त्यांत क्रिया करणारापेक्षां मूळ क्रियेचाच प्रभाव अधिक असतो. लग्न होऊन तरी आपल्या हातीं आयुष्यांतला कांहीं सुखरूपपणा

लागतो की काय हें पहावें, असा त्याचा विचार होता. त्या विचारांत तो घुटमळत असतांनाच त्याचें लग्न झालें होतें. मनाला शांति मिळविण्याकरितां त्यानें लग्न होईपर्यंतच्या काळात अनेक धडपडी केल्या होत्या. पण त्यांतली प्रत्येक धडपड ही दारूबाज माणसानें, दुःख तात्पुरतें विसरण्याकरितां स्वताला आणलेल्या कैफासारखी, तात्कालिक ठरली. तो गरिबींत जन्मला होता. अनेक सर्वसामान्य सुखसोयींना तो पारखा झालेला होता. एखादी तरी सुखसोय आपल्या हातीं लागावी म्हणून तो केविलपणानें धावपळ करीत असे. गरीबींतच अनेक लोक जन्मले, पण ते फार मोठे झाले. इंग्लंडचे अमुक अमुक प्रधान आरंभी मजूर होते, अमेरिकेंतील अमुक डॉक्टर प्रारंभी कंपाउंडर होण्याच्याही लायकीचे नव्हते पण त्यांनीं प्रयत्न केले, फ्रान्समधला एक संशोधक लहानपणीं विसराळू वेडा होता, अशा अनेक गोष्टी त्याला लोकांनीं सांगितल्या होत्या. त्याला वाटलें, आपणही एके दिवशीं मोठे होणार. आपण गरिबी विसरायला शिकलें पाहिजे. आणि गरिबी विसरण्याचा एक सोपा उपाय त्याच्या हाती लागला. ग्रंथालयें! ग्रंथालयांत जाऊन तो तिथली पुस्तकें वाचूं लागला. पुस्तकांतील छापील मजकूर भराभर वाचून काढण्यात त्याची अधाशी दृष्टि पटाईत होत चालली. शाळेंत इंग्रजी सहावी सातवींत असतांनाच विद्वान् म्हणून समाजांत खपला जाईल, इतका तो मोठा वाचक झाला. त्याला पुस्तकाचें वेड लागलें. त्याचे ओळखीचे लोक चेष्टेनें म्हणूं लागले, " त्याचा पत्ता-रानडे ग्रंथालय !" पण आपण फार मोठे वाचक आहों, हाच त्याला कैफ चढत होता. रानड्यांनीं विद्यार्थिदशेंत वाचून वाचून एक डोळा अधू करून घेतला, प्रो. जिनसीवाले बोलायला उभे राहिले म्हणजे कोणत्या पुस्तकांचा उल्लेख होईल त्याचा कांहीं नियम नसे, इत्यादि गोष्टी त्याच्या कानावर येत गल्याने तो जास्त जास्त वाचूं लागला. लोक त्याला कधीं कधीं 'रानडे' 'जिनसीवाले' अशा अर्धवट चेष्टेनें हाका मारूं लागले. त्याला स्वतांच्या वाङ्मयविषयक कर्तृगारांची धन्यता वाटूं लागली.

त्याचा कॉलेजचा जीवनक्रम सुरू झाला. मोठ्या माणसांचीं उदाहरणें डोळ्यांसमोर ठेवून तो चालला होता. त्यानें एकच कोट अनेक वर्षे वापरला, एकच सदरा रात्रींच्यारात्रीं धुवून दिवसां वापरीत रहाण्याचा प्रकार केला, श्रीमंत लोकांच्या येथें वारानें राहून त्यांची मोलमजुरीचीं कामें मोठया हुशारीनें पार पाडलीं, कॉलेजांतल्या प्रोफेसरांच्या घरीं राहूनही त्यानें वारकरी संप्रदाय चालविला. त्यावेळींही सारे लोक त्याची स्तुति करीत. जुने ओळखीचे लोक भेटले कीं म्हणत, 'आहे! या माणसांत कांहीं तरी दम आहे, हा पुढें नांव काढणार!' आणि आसपासच्या लोकांनीं असें म्हटल्यावर तो अधिकाधिक 'वारकरी' बनत चालला. लोक त्याला साधा म्हणत आणि तो जास्तजास्त गबाळ होऊं लागला. कॉलेजांत आपण 'नादार' आहों ही तो अभिमानाची बाब समजूं लागला. किंबहुना 'नादार,' नसलेलीं मुलें त्याला उपहासयोग्य वाटूं लागलीं.

पण एके दिवशीं कॉलेजमध्यें एक व्याख्यान झालें, मोठा समारंभ होता तो! एक बॅरिस्टर मुख्य पाहुणे म्हणून आले होते. ते या कॉलेजचे माजी विद्यार्थी होते. त्यांनीं अस्सल विलायती पद्धतीचा पोशाख केला होता. त्यांनीं फार चांगलें भाषण केलें. भावनाप्रधान लोक त्या भाषणानें मोहित झाले. ते म्हणाले होते, "तुम्हांला सुख हवें आहे ना?" भाषणाच्या ओघांत त्यांनीं हा प्रश्न विचारला होता. त्याचें उत्तर तेच देणार होते. आमच्या कथानायकानें कान टवकारले. त्याचें मन त्याला म्हणत होतें, "अरे, इतके दिवस धडपड केलीस, हा पहा सुखाचा शोध लागला!" तो लक्ष देऊन ऐकूं लागला. भाषण चालू होतें. बॅरिस्टर म्हणत होते, "मी पूर्वी एक गरीब विद्यार्थीच होतों. आपण सुखी नाहीं असं मला वाटायचं. आपलं चाललं आहे हें आयुष्य कांहीं ठीक नाहीं, असं मी मनाशीं एकसारखं म्हणायचा. त्यामुळें मी दुःखीकष्टी असायचा. पुढें मला एक सुखाची गुरुकिल्ली सांपडली. ज्या ठिकाणीं जाऊं त्याठिकाणीं स्वतांला पुरेपूर रमवून घेण्यांत मौज आहे, असं मला आढळून आलं. आणि

मी तोच क्रम आरंभला. आला दिवस सारी शक्ति एकवटून उपभोगा-वयाचा, त्यांतला आनंद लुटावयाचा असा मी निश्चय केला. असा निश्चय केला कीं माणसाला मार्ग सांपडतात. तुम्ही दुःखीकष्टी चेहरे करून बसूं नका. हसतमुख व्हा, आणि प्रत्येक क्षणांत रमून जा."

व्याख्यान संपलें. त्यानें निश्चय केला कीं, हा मार्ग आजपर्यंत आपण जो उगीच टाळला त्याचा आतां जोराचा अवलंब करावयाचा. तो फॅशनेबल बनूं लागला, गांवांतल्या सभा संमेलनाची चिटणीशी फार हौसेनें करूं लागला, लोकांपुढें उभें राहून भाषणें करूं लागला, गणेशोत्सवांत मेळे हिंडवूं लागला. जो जो उत्सव असेल त्यांत मनापासून सामील होऊं लागला. इतका कीं, त्या उत्सवावांचूनचें जग त्याच्या खिसगणतींत येईनासें झालें!

त्याचा अभ्यासक्रमही चालूच होता. मोठ्या लोकांना एकसारखा भेटून तो मोठा होण्याचा प्रयत्न करूं लागला. कॉलेजमध्ये जिकडे तिकडे त्याचा उल्लेख होऊं लागला. त्यानें एक मंत्र डोळ्यापुढें ठेवला होता, 'ज्या ठिकाणीं जायचं त्या ठिकाणीं तन्मयतेनें रमून जायचं!' त्यानें सारखा प्रयत्न चालविला होता. क्रिकेट, हॉकी खेळण्याचेंही त्यानें मनावर घेतलें. तन्मयतेनें रमून जाण्याचे हेही मार्ग होते! पण त्या खेळांत जरूर तें कौशल्य प्रकट न करतां आल्यामुळें त्यानें ते खेळ अर्धवटच सोडून दिले. तो नाटकें पाहूं लागला. त्यांतही रमून जाऊं लागला. सभा-संमेलनांचा चिटणीस म्हणून त्याला फुकट आमंत्रणें मिळूं लागलीं! त्याला वाटलें, 'आपण चिकाटीनें चालविलेल्या उद्योगाला फळें येताहेत. असाच आणखी नेट धरला पाहिजे!'

पण अलीकडे अलीकडे याही गोष्टी करून त्याच्या मनाचें समाधान होईनासें झालें. तो बी. ए. झाला. एका ऑफिसात त्याला बऱ्यापैकी एक नोकरी मिळाली. सहासात तास ऑफीसांत मानेवर खडा ठेवून काम

करायचं, दुपार संध्याकाळ खाणावळींत जेवायचं, उरलेल्या वेळांत एखादं साधन हातीं धरून त्याच्या मध्यस्थीनं आयुष्यांत रमून जाण्याचा प्रयत्न करायचा! त्याचें वाचन चालू होतें, नाटकें पहाणें चालू होतें, सभा-संमेलनें यांनाही खंड पडला नव्हता! सारें कांहीं चाललें होतें, पण विशेष कांहीं चाललें नाहीं, असें मानण्याकडे त्याच्या मनाची हळूहळू प्रवृत्ति होऊं लागली. त्याच्या मनांत हळूहळू येऊं लागलें कीं, 'एक सुखाचा भाग आपल्याला अद्याप अज्ञात आहे.' स्त्रीजीवन! समाजांतल्या स्त्रीजीवनाशीं त्याला अद्याप समरस होतां आलें नव्हतें. कॉलेजांत त्यानें 'स्त्री' हा पदार्थ पाहिला होता. पण तिकडे कधीं कधीं पाहाण्यापलीकडे त्याची मजल गेली नाहीं. 'दृष्टिक्षेपच आजला, स्मित उद्यां गालीं जरा चंचल!' या कल्पुतीचा त्याला अनुभव येईना. आजपर्यंत आला नव्हता! स्त्रियांशीं आपल्या ओळखी व्हाव्या असें त्याला वाटूं लागलें. पण हें वाटणें अनैतिक आहे असें मन त्याला आतून सांगू लागलें. पण त्या मनाला तो शिकवूं लागला, 'बाबा रे, आयुष्याचा अर्थ समजावून घ्यायचा आहे आपल्याला! कच न खातां अनुभव जमविले पाहिजेत!'

सभासंमेलनाचा चिटणीस म्हणून तो कांहीं विदुषी स्त्रियांकडे जाऊं येऊं लागला. धर्माचें आणि व्यवहाराचें शास्त्र बदलून घ्यावयास पाहिजे म्हणून व्यासपीठावरून सांगणारी स्त्री त्यानें जवळून पाहिली. तिच्या खासगी जीवनात त्याला डोकावून पाहाण्यासही मिळालें. दुसरी एक विदुषी फ्रॉईडच्या कामशास्त्राचा शास्त्रीयदृष्टीनें अभ्यास करणारी होती. तिच्याही आसपास वावरण्याचे त्याला कांहीं प्रसंग आले. आमच्या पुढील म्हणजे भावी पिढीच्या माता या खऱ्याखुऱ्या स्त्रिया बनाव्यात म्हणून संस्था चालविणाऱ्या विदुषींशींही त्याचा परिचय घडला. आरंभीं आरंभीं या सर्वजणींच्या सान्निध्यांत जातांना तो मोठ्या हुरूपानें जाई. 'जगांतली एक नवी बाजू आपल्यापुढें स्पष्ट होत आहे.' असें त्याला मनातल्या मनात वाटूं लागलें. या वाटण्यावरच कांहीं दिवस तो खूष होता.

कारण प्रत्येक नवीन अनुभवांत रमून जाण्यांत गंमत आहे! या क्रिया पाहून त्याला वाटूं लागलें कीं, 'सारं स्त्रीजीवन म्हणजे 'एक मोठी आकर्षक आरास आहे. पूर्वज उगीच नाहीं म्हणत आले कीं, " यत्र नार्यस्तु पूज्यन्ते रमन्ते तत्र देवताः।' या देवता आहेत.' आणि ती फ्रॉईडचा अभ्यास करणारी स्त्री व्यासपीठावरून जेव्हां बोले कीं, ' स्त्री ही देवताही आहे आणि अप्सराही आहे. देवतेला अप्सरेसारखी वागायला शिकवा आणि अप्सरेला देवतेचा दर्जा द्या, ' तेव्हां लोक टाळ्या वाजवीत. याचेही हात टाळ्या पिटण्याकरितां जवळजवळ येत. पण त्या वाक्याचा नीट अर्थ त्याला कळला नाहीं. मात्र ' स्त्री हें एक कोडें आहे ! ' असें कां म्हणतात तें मात्र त्याला त्या वाक्यावरून थोडेंथोडें पटूं लागलें. ती स्त्री आणखीही बोलत असे. " मोठमोठ्या ऋषींचाही तपोभंग झाला. याचें कारण त्यांनीं आपल्या आयुष्यांतली स्त्रीची जागा नीट ओळखली नाहीं ! "

आणि अशीं व्याख्यानें चालू असतांनाच समाजांत जशा निरनिराळ्या विचारांच्या वावटळी येतात आणि जातात, तशीच नव्या विचारांची एक वावटळ येऊन जात होती. सारे तरुण स्त्रीपुरुष जोरजोरानें म्हणूं लागले होते कीं, " आम्हांला लग्न करायचं नाहीं ! " याच्या कानांवरून हें वाक्य वरचेवर जाऊं लागलें. याला वाटलें, ' आपणही तरुण आहों. तरुण स्त्रीपुरुष जें बोलतात, आणि जें करतात, तें आपण बोललों नाहीं किंवा केलें नाहीं म्हणजे आपण मागें पडणार ! आणि आपल्याला जो आनंद हवा आहे तो पुढेंच असला तर ! आणि मग मागें पडून कसें चालेल!' म्हणून त्यानेंही निश्चय केला कीं, आपणही हेंच वाक्य ठिकठिकाणीं म्हणत राहिलें पाहिजे. सभासंमेलनाच्या निमित्तानें अनेक कुमारी त्याच्या प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष परिचयाच्या झाल्या होत्या. साऱ्यांचें म्हणणें एकच ! 'आम्हाला लग्नें करायचीं नाहींत ! ' त्याला वाटलें 'कोणतीही उपाधि पाठीमागें नको ! आपला उद्योग आणि आपण ! आपल्या आवडीचे व्यवसाय आणि आपण ! बस्स. कशाची म्हणजे लग्नाची देखील त्यांत आडकाठी नाहीं. आनंदी होणार आतां सारे स्त्रीपुरुष !'

साऱ्या शिकलेल्या अविवाहित स्त्री पुरुषांनीं हें नवें व्रत स्वीकारलें! आणि त्या व्रतात तोही सामील झाला. पण इकडे दैनंदिन आयुष्याचा त्याला कंटाळा येऊं लागला होता. ऑफीसांत काम करावयाचें, खानावळींत जेवायचें, उपाहारगृहांत चहा घ्यावयाचा आणि उरलेल्या वेळांत, चालू चळवळींतून आनंद हुडकावयाचा! असा आनंद हुडकून तो परत आला आणि आपल्या खोलींत एकट्याशींच विचार करीत बसला म्हणजे त्याला उगीचच वाटे कीं, 'हें असं एकटं बसणं चांगलं नाहीं.' (डोकें दुखेपर्यंत तो वाचीत असे, पाय तुटेपर्यंत तो हिंडत असे, आणि जीभ गळून पडेपर्यंत तो बोलत असे) एका दिवसात हे सारे कार्यक्रम करूनही त्याचा वेळ मोकळा पडूं लागला. आणि त्या मोकळया वेळांत त्याचें मन तळमळूं लागे. एकदां असेंच वाचन चालूं असतांना गटेचें चरित्र त्याच्या हातीं लागलें. त्या चरित्रांतील एक भाग वाचून त्याला विलक्षण आनंद झाला. गटची मोल-करीण कॅरोलिना! अठरा वर्षें ती गटेजवळ त्याच्या सानिध्यात राहिली. गटेची सारी कामें ती करीत असे! तिची तन्मयता आणि भक्ति पाहून गटेला त्या अठरावर्षांनंतर ती आपली सहचारिणी असावी असें वाटलें. त्यानें तिच्याशीं लग्न केलें. तिच्याविषयीं गटेनें म्हटलें आहे, "मला सहचारिणी हवी! जीं नित्यनैमित्तिक कामें पार पाडण्याचा मला कंटाळा येतो, किंवा ज्यांच्या संबंधांत माझें शरीर अकारण दुबळेपणा पतकरण्यास तयार होतें त्या कामांचा ताबा घेऊन तीं बिनबोभाट पार पाडणारी एक सामान्य बुद्धिम-त्तेची पण खऱ्याखुऱ्या अंत:करणाची स्त्री मला पाहिजे.' आणि गटेला कॅरो-लिनानें पूर्ण सुखी केलें! त्याला वाटलें आपल्यालासुद्धां हें असेंच कांहीं तरी वाटत असावें. दैनंदिन गोष्टींचा आपल्याला कंटाळा येतो, त्याचें कारण आपले शरीर अकारण दुबळेपणा पतकरतें असा तर नाहीं ना? कुणी तरी जिव्हाळयानें या बारीक सारीक गोष्टी करण्याकरितां हवें आहे!

पण समाजांतल्या शिक्षित स्त्रीपुरुषांत तर अविवाहित राहण्याची घोषणा अधिकाधिक लोकप्रिय होत चालली होती. म्हणजे, ती जास्तीत

जास्त मोठ्या आवाजांत बोलून दाखविणें हीच बाब लोकप्रिय होत चालली होती! त्याला मोठा पेंच पडला, 'आपल्याला तर सहचारिणी असावी असें वाटतें आहे, आणि ही घोषणा तर या वाटण्याशीं विरोधक आहे!' पण ही घोषणा फक्त बोलण्यांत लोकप्रिय होती. आणि साक्षर अशा व्यवहारदक्ष लोकांत तर तिचा मागमूसही नव्हता. असल्याच एका व्यवहारदक्ष माणसाशीं त्याची गांठ पडली. त्या माणसानें अगदीं सरळ 'व्यवहार' म्हणून त्याला लग्नाचा प्रश्न टाकला. आपल्या उपवर मुलीचें वर्णन केलें. दिसण्यांत साधारण बरी! गृहकृत्यांत तरबेज! प्रकृतीनें निकोप! त्या गृहस्थानें आपल्या कन्येचें केलेलें हें वर्णन ऐकून आमच्या कथानायकाला वाटलें, 'बस्स. आपल्याला पाहिजे तसली ही सहचारिणी होईल. अगदीं गटेची कॅरोलिना!' त्यानें होकार दिला आणि त्याचें लग्न झालें. तिच्या बापानें केलेलें तिचें वर्णन अगदीं अवास्तव नव्हतें. आकर्षक शृंगार करण्यांत कांहीं ती फारशी कुशल नव्हती' पण दिसावयाला बरीच चांगली होती. गृहकृत्यांचा प्रांत हा तर तिचाच होता. आरंभींचा संसार ठीक चालला. त्याला वाटलें नित्यनैमित्तिक गोष्टींची आतां वांटणी व्हावयाला हरकत नाहीं. प्रपंच सारा गृहिणीकडे आणि बुद्धीची क्रीडा फक्त आपल्याकडे, असा श्रमविभाग त्यानें मनाशीं मुक्रर ही केला. आणि असा श्रमविभाग करूनही 'संसार' कांहीं दिवस छान चालला.

पण त्याची पत्नी! तिनें पतीभोंवतालचें बौद्धिक वातावरण पाहिलें. राजकारण, समाजकारण, वाङ्मय इत्यादींच्या चर्चेचा नुसता धडाका तिला दिसत होता. पतीच्या टेबलावर लठ्ठलठ्ठ पुस्तकें सदा पडलेलीं असावयाचीं! वर्तमानपत्रें, मासिकें यांजकडून पतीला लेखनाबद्दल सदोदित प्रोत्साहन मिळावयाचें. व्यासपीठावर भाषण गाजवून तो परत आला नाहीं, असा एकही आठवडा सुना जात नसे! नाटकांना आग्रहाची आमंत्रणें यावयाचीं. लोक त्याला म्हणावयाचे, 'कोणतेही

'फंक्शन, तुमच्याशिवाय व्हायचं नाही. हॅम्लेटच्या नाटकांत डेनमार्कचा राजपुत्र आणि फंक्शनमध्यें तुम्ही ! असं आमच्या मनानें अगदीं कायमचें ठरवून टाकलें आहे!' आणि हें बोलणें ऐकून त्याला खरोखरच वाटत असें कीं, 'सार्वजनिक आयुष्यक्रमांत आपल्याला फार मोठें स्थान आहे. अव्यभिचारी भक्तांनें हें स्थान आपण अढळ राखलें पाहिजे.' आणि इकडे संसार चाललाच होता. समेहून तो उशीरां परत येई तव्हां बायको दारांत त्याची वाट पाहात उभी असलेली त्याला दिसावयाची. रात्रीं नाटकाहून दोन वाजतां तो परत घराकडे येऊं लागला म्हणजे त्याला लांबूनच आपल्या घरांत दिवा जळत असल्याचें आढळून येत असे.

ती आपलें कोणतेंही मत सांगत नसे; आपली कोणतीही इच्छा बोलून दाखवीत नसे. कित्येक वेळां तिच्या गप्प बसण्याचें त्याला फार आश्चर्य वाटे. तिचीही करमणूक व्हावी असें त्याला अलीकडे मधून मधून वाटूं लागलें. मराठी कादंबऱ्या व नाटकें तो तिला वाचण्याकरितां आग्रहानें देऊं लागला. तिच्यावर ' नागर संस्कार ' व्हावत हा त्याचा हेतु होता. शेजारीच बायकांचा एक क्लब होता. तिथें त्यानें स्वतः जाऊन आपल्या पत्नीचें नांव घातलें. तिला ' जग ' समजावें हा त्याचा उद्देश होता ! गुडघाभर पाण्यांतही ज्यानें कधीं पाय टाकला नाहीं त्याला समुद्रांत एकदम लोटून द्यावें तशांतलाच हा प्रकार होता. तिच्यावर नागर संस्कार झाले ते अगदीं विपरीत ! तिनें जो आपल्या भोंवतालच्या जगाचा अर्थ केला तो अगदीं अनपेक्षित होता. याचे परिणाम संसारांत हळूहळू दिसू लागले. तो नाटक पाहून आला कीं नाटकाला जाण्यचा ती हट्ट करूं लागली. त्यानें संमेलनांत वेळ काढला कीं, आपणही कुठें तरी वेळ घालविला पाहिजे असें तिला वाटूं लागलें! नाटकें–कादंबऱ्यांतून आणि बायकांच्या क्लबमध्यें तिनें समान हक्काची बोलणी ऐकली होतीं. त्यामुळें जी जी शारीरिक हालचाल आणि हौसमौज आपल्या पतीनें केली असें तिला भासे, ती ती करण्याकरितां आपण कंबर

कसून तत्पर असलें पाहिजे, असें तिच्या मनानें घेतलें. त्यामुळें परटाकडून कपडे धुवून आणण्यापासून तों प्रवासाला जाण्याचे प्रकार करीपर्यंत प्रत्येक गोष्टींत आपण समान हक्काच्या आधारावर पतीच्या बरोबरीनें पैशाचा आणि वेळेचा खर्च केला पाहिजे असें तिचें प्रामाणिक मत बनलें. आणि पुढें पुढें तर पतीनें पड घेऊन समजुतीच्या गोष्टी सांगण्याचा आणि तिला गृहकृत्यांत जास्त लक्ष घालण्याचा उपदेश केला तर तिचें मन तिला आंतून स्पष्टपणानें सांगू लागलें, 'आजपर्यंत बायकांना चूलमूल करीत पुरुषांनीं घरांत डांबून ठेवलें आणि फसविलें. त्यांतलाच हाही उपदेशाचा प्रकार आहे. आजच्या पिढीच्या स्त्रीनें असल्या उपदेशाला कसून विरोध करायला पाहिजे, असें नाटककार, कादंबरीकार आणि स्त्रियांचे कैवारी वक्ते वेळोवेळीं सांगत आले आहेत त्यांचें म्हणणें आपण प्रत्यक्ष कृतींत उतरविलें पाहिजे. कृती करायला स्वतांच्या घरासारखें दुसरें क्षेत्र नाहीं. सामना द्यायला योग्य असा स्वतांच्यापतीसारखा दुसरा पुरुष नाहीं!' आणि म्हणूनच ती पतीचें कोणतेंही म्हणणें आतांशा मानेनाशी झाली. उलट या स्वार्थी पतीला अद्दल घडविली पाहिजे म्हणून ती अधिकाधिक घराबाहेरच्या जगांत तन्मय होऊं लागली. 'गटेची कॅरोलिना' वामन मल्हार जोशी यांची उत्तरा होण्याचा प्रयत्न करूं लागली! लेखणी ही तलवारीपेक्षांही अधिक इजा करूं शकते.

वाङ्मय हें एक प्रचंड शस्त्रागार आहे. अजागळ वाचकाला त्यातले एखादें हत्यार वापरून पाहाण्याची बुद्धि झाली म्हणजे मग संसाराच्या नंदनवनातील कल्पतरूवरही धाड यावयाला पंचाईत पडत नाहीं! सुबुद्ध सुशिक्षित आणि सुसंस्कृत वाचक कोणतेंही ललितवाङ्मय तटस्थपणानें वाचतो. तटस्थपणा किती राखावा याचें त्याला तारतम्य असतें. पण बुद्धि, शिक्षण आणि संस्कृति या तिन्ही बाबतींत अर्धवट असलेल्या माणसाला हा तटस्थपणा राखता येत नाहीं. पशुपक्ष्यांची पाळींव पिलें आरशातल्या प्रतिबिंबावर झेप घेतात, व त्या आभासाला खरें मानून त्याच्याशी झोंबू पाहातात, तसेंच या अर्धवट वाचकांचें होतें. संसाराच्या प्रतिबिंबाला खरें मानून, त्या

प्रतिबिंबानें आरशाच्या गुणधर्मानुसार धारण केलली विकृति आपण अनुकरणाच्या मार्गानें अवश्य पतकरली पाहिजे, असें समजत राहण्याचा एक विचित्र कैफ या अर्धवट वाचकांना येत राहतो. असला अनैसर्गिक क्रम पतकरणारे वाचक वाङ्मयाचा संसारावर भलताच परिणाम करून बसतात! वाचललें वाङ्मय आणि त्यांच्या अडाणी, असंस्कृत आणि आवेशसुलभ भावना यांचें एक विलक्षण विषारी रसायनिक मिश्रण बनतें आणि तें समाजाच्या प्रगतीचा जबरदस्त संहार करतें! वाङ्मय वाचण्यापूर्वी प्रत्येकानें लायकीचा परवाना मिळविला पाहिजे. कोणतेंही यंत्र चालविण्याकरितां किंवा बाँब आणि विषारी वायु ठेवलेल्या लष्करी आवारात जाण्याकरितां परवानें मिळवावे लागतात. वाङ्मयाच्या प्रांतांत कोणत्याही वाचकानें अनिरुद्ध संचार करण्यापूर्वी असे परवानें मिळविले पाहिजेत.

बायकोवर होणारा वाङ्मयाचा परिणाम पाहून त्याच्या मनांत अलीकडे असले विचार यावयाला लागले होते. तिच्या प्रत्येक बारीकसारीक हालचालींतही पैजेचा विडा उचलल्यासारखी अभिनिवेशाची वृत्ति दिसूं लागली. गृहकृत्यें ती करीत असे. पण आपल्या पतीवर आपण उपकारांचें असह्य ओझें घालीत आहों या उन्मादक भावनेनें ती प्रत्येक कामाला हात घाली. अनाथ आणि दुबळ्या मानवजातीला वांचविण्याकरितां आपला जन्म आहे असें मानीत राहाणाऱ्या धर्मसंस्थापकाची ऐट तिच्या वर्तनांत क्षणोक्षणीं स्पष्ट होऊं लागली! त्याच्या लहानसहान सुखसोयींत व्यत्यय येऊन तो वैतागला म्हणजे 'पुरुष जातीची आपण कशी खाशी खोड मोडली,' असला विजयसूचक विचार ती आपल्या मनाला सूक्ष्मपणानें जाणवून घेऊं लागली. त्याचा संसार म्हणजे एक देवाणघेवाणीची खाणावळ बनत चालली. तहान लागली कीं, पाणी प्यावें, हा नैसर्गिक क्रम बदलून कार्यक्रमपत्रिकेंत छापल्याप्रमाणें पाणी मिळण्याची वेळ झाली म्हणून पाणी प्यालेंच पाहिजे, असला रुग्णालयछापाचा संसार त्याच्या घरांत सुरू झाला.

आणि तो ! प्रत्येक गोष्टींतून जास्तींत जास्त सुख आणि जास्तींत जास्त आनंद पिळून काढणारा तो एक गोपाल होता. हरप्रयत्नानें संसाराचे आंचळ पिळण्याची तो धडपड करीत होता, पण त्या आंचळांतील स्निग्धपणा दिवसेंदिवस कमी होत चालला होता. आणि अलीकडे तर त्याला असा भास होऊं लागला कीं, 'संसारधनूच्या आंचळाला आपण हात लावला कीं ती नाठाळपणानें पाय झाडते, आपल्याला लाथा मारते!' त्याची दोहनाबद्दलची आसक्ति दिवसेंदिवस कमी होत चालली. घराबाहेरचे सारे कार्यक्रम पार पाडून घराकडे वळण्याची वेळ झाली कीं त्याच्या अंगावर कांटा येऊं लागला. मनाला संध्याकाळच्यावेळीं घराची ओढ वाटूं लागली कीं, टांगेवाले घोड्यासारख्या मुक्या जनावरालाही चाबकाचे फटकारे लगवीत असतांना तो पहात असे. मोटारगाड्यांचे कर्णधार घरची ओढ लागली कीं त्या निर्जीव यंत्रालाही भर वेगांत कामगिरी करायला लावीत असत, तेही त्याच्या दृष्टीस पडे. गुरावासरांनीं घराकडील ओढ घ्यावी, पक्ष्यांनीं किलबिलाट करीत वृक्षांकडील रोख धरावा आणि बरोबरीच्या कारकुनांनीं व इतर श्रमजीवि लोकांनीं मुद्दाम आठवणीनें आपल्या पत्नीचा आवडता जिन्नस मोठ्या हौसेनें पैदा करून घरीं जाण्याची लगबग करावी, आणि त्याला मात्र कांहींच वाटूं नये ! जिकडे तिकडे त्याला ओढ दिसत होती आणि तो मात्र स्थिर होता !

पत्नीबद्दलची त्याची नावड त्याच्या वागण्यांत दृग्गोचर होऊं लागली अधुनमधून तो घरीं येण्याची टाळाटाळ करूं लागला. त्यानें बाहेर जे मित्र जोडले होते, ते त्याला जास्त जास्त जवळचे वाटूं लागले. आतां तो वेळीं अवेळीं घरीं येऊं लागला तरी त्याची पत्नी आतुरतेनें वाट पाहात असल्याचें त्याला आढळून येत नसे. बरीच रात्र होऊन तो घराकडे वळे तेव्हां त्याला पूर्वीसारखा आपल्या घरांत दिवा जळत असल्याचें आढळून येईनासें झालें. आणि कधींकधी तर घराला कुलूप लावलेलें असे ! कुलपांत चिठ्ठी अडकवलेली असावयाची आणि तींत आपण कुणा तरी मैत्रिणीकडे गेल्याचा उल्लेख असावयाचा! असल्या चिठ्ठयांबद्दल त्याला कधींही संशय

येत नसे. त्याला पक्की खात्री होती कीं, आपली पत्नी आततायी आहे पण पापभीरूही आहे. आणि म्हणूनच तिच्या यातनांची त्याला थोडीफार कल्पना करतां येत असे. तिला त्रास कमी व्हावा म्हणून त्यानें तिची मनधरणी करण्यांत कमीपणा मानला नाहीं. पण तिला वाटे, ' ही मनधरणी म्हणजे पातकी मनाची पश्चात्तापाची भावना आहे. ' अजूनही उपचार म्हणून कां होईना पण तो तिला बाहेर जातांना सांगून जात असे. आपला कोणताही कार्यक्रम तो तिच्यापासून दडवीत नसे. मात्र आपल्या पाठीमागें जास्तजास्त कार्यक्रम तो लावून घेत असे. हेतु हा कीं, आपल्याला कोणत्याही प्रकारचा वैताग न करतां घराबाहेर राहातां यावें ! तिला मात्र या प्रत्येक वागण्यांत उपेक्षेचा असह्य दर्प येऊं लागला.

होतां होतां आजपर्यंत कधीं होत नव्हते, असले भांडणाचे आणि बोलाचालीचे प्रसंग त्या दोघांमध्यें घडूं लागले. तिनें त्याच्यावर केलेले आरोप उघड उघड निराधार असत ! तिची त्याला इतकी कींव यई कीं, तिला तोडून उत्तर देण्याइतका रागही त्याला आपल्या मनांत जमवितां येत नसे. तिची दिवसरात्र धुमफूस चालू असावयाची. पड घेऊन यानें तिला चहा घ्यायला लावावें, मुद्दाम जेवावयास बसवावें, तिचा राग जाईल अशी विनोदाची, शृंगाराचीं भाषणें करावीं ! पण कांहींतरी उणेंदुणें बोलून ती त्या शृंगाराचा आणि विनोदाचा पार विरस करून टाकी. तिनें उदासीन व्हावें, जळफळावें, टाकून बोलावें, त्रागा करावा, आणि ओक्साबोक्शीं रडावें, या मतभेदाच्या नित्याच्या चढत्या पायऱ्या ठरून गेल्या होत्या.

आणि एके दिवशीं ती घरांतून नाहींशी झाली. तिनें चिठ्ठी ठेवली होती. ' आतां मी पुन्हां परत येणार नाही. तुमचा संसार हा माझा नाहीं. मी माहेरीं जाऊन राहीन.' इ. इ. पत्रांत नुसता वैताग होता. त्यानें चिठ्ठी वाचली, कुलूप उघडलें. कॉटवर अंग टाकतां टाकतां त्यानें मनाशीं मोठ्यानें म्हटलें, ' संसार! संसारच म्हणतात कां याला ? poor girl !

forgive her my Lord! She knows not what she does!

× × × ×

रात्रीं निजण्यापूर्वी नीरेनें ही गोष्ट वाचून ठेवली. रात्रीं हंथरुणावर पडल्यावर किती वेळ तरी त्या गोष्टीचाच ती मनाशीं विचार करीत होती. शेजारींच नर्मदाबाई निजली होती. तिला शांत झोप लागली होती! तिच्याकडे नीरा वरचेवर वळून पाहात होती. आणि असे वळून पाहिल्यावर प्रत्येक खेपेला तिच्या मनांत एकच प्रश्न उभा राहात असे! ती मनाला विचारी, "काय या साऱ्याचा अर्थ?" आणि हा प्रश्न विचारल्यावर तिच्या तोंडांतून आपोआपच उद्गार निघत, 'गटेची कॅरोलिना!'

आणि मग तिच्या मनांत येई, 'बिचारी तारुण्यसुलभ आवेशाच्या भरांत कांहीं तरी अनावर गोष्ट करून गेली असल! पण ज्या ठिकाणाहून ती निघाली त्या ठिकाणी तिला पोंचविणें हें आपलें कर्तव्य आहे.'

मनाशीं असा निश्चय झाल्यावर तिला झोंप लागली. पहाटे स्वयंपाकघरांत भांड्यांचा आवाज होऊं लागला तेव्हां ती जागी झाली. नर्मदाबाई, माई, शिरीषकुमार सारींजण आधींच उठलीं होतीं. तीं स्वयंपाकघरांत गेली तेव्हां चहा तयार होता.

आपल्या मनांतला विषय काढायला अनुकूल संधि मिळाली असें वाटून ती त्या तयारीनें तोंड धुवून आली.

इतक्यांत दाराशीं जगन्नाथ आला. थेट स्वयंपाकघरांत येऊन त्यानें सांगितलें, 'दादासाहेब कालच्या रात्रींच कुठेतरी नाहींसे झाले. त्यानीं परदेशांतून मागविलेल्या बेकायदेशीर गोष्टींचा सरकारला सुगावा लागून आपल्या मागावर गुप्त पोलीस आहेत, असे आढळून आल्यामुळें कुणाला कांहींही न कळवितां ते निघून गेले! निघून गेले म्हणजे नाहींसे

झाले. मी त्यांच्या नेहमीच्या गुप्त ठिकाणी जाऊन चौकशी केली, पण कुणालाही त्यांचा पत्ता नाहीं.'

या बातमीनें त्या जागेंत स्तब्धता पसरली. कांहींवेळ कुणीच कांहीं बोललें नाहीं, नंतर शांतपणानें शिरीषकुमार म्हणाले, "जगन्नाथ, बैस, चहा घे. रात्रभर जागरण केलेले दिसतंयस! पण खरं सांग, आतां या प्रकरणाशीं तुझा कांहीं संबंध नाहीं ना? मात्र खरं खरं सांग!"

जगन्नाथानें तितक्याच शांतपणानें उत्तर दिलें, "माझा या प्रकरणाशीं कोणताच संबंध नाहीं."

शिरीषकुमार चहा घेऊन आपल्या उद्योगासाठीं घराबाहेर पडले, आणि त्यांच्याबरोबर जगन्नाथही निघून गेला.

सर्वत्र शांतता होती. रेल्वेजंक्शनवर एकाच वेळेला अनेक ठिकाणच्या गाड्या याव्यात, त्यांची दंगल माजून राहावी, आणि थोड्याच वेळांत त्या निघून गल्यावर सर्वत्र निर्मक्षिक व्हावें, तसें नीरेच्या मनाचें झालें होतें.

नर्मदाबाईला काय वाटलें कुणास ठाऊक? तिनें आपण होऊनच म्हटलें, "मी जातें. अनाथालयांत राहिलेल्या बायकांना जशी भीति नाहीं, तशी मलाही भीति नाहीं. आणि इथं राहून मला करमायचंही नाहीं."

नीरेनें तिच्या जाण्याला संमति दिली.

ती गेल्यावर नीरेच्या डोळयांपुढें मागल्या साऱ्या पाहिलेल्या व ऐकलेल्या गोष्टींचा चित्रपट उभा राहिला. तिच्या मनांत आलें, 'काल शिरीषकुमारांनीं म्हटलें तेंच खरें. माणसाच्या मनाची धडधड ही आगगाडीच्या धडधडीसारखी आहे, ती धडधड ऐकूं येते, पण तिच्यापर्यंत जाऊन पोंहोंचतां येत नाहीं. कारण जंगी अडसर लावलेलीं लोखंडी फाटकें वाटेंत येऊन माणसाला एकसारखीं थोपवीत असतात!'

---

# प्रकरण १९ वें.

# उल्कापात !

शिवलालांच्याकडील शिकवणी आज झाली होती, तरी त्यांच्याकडील बोलावणें पुन्हां आलें होतें. त्या बोलावण्यानें शिरीषकुमाराना फार आश्चर्य वाटलें. शिवलालांनीं परस्पर गिरणीकडे बोलाविलें याबद्दल त्याना आश्चर्य वाटलें नाहीं. पण आज तशी कांहींच बातमी कानावर नसतांना असें एकाएकीं कोणतें कारण उद्भवलें होतें, त्याचा त्याना कांहीं तर्क करतां येईना आणि म्हणूनच त्याना आश्चर्य वाटत होतें. अलीकडे गिरण्यांतील संप कमी झाले होते. कामगारांच्या गाऱ्हाण्यांचा आणि संघटित चळवळींचा थोडथोडा उपयोग होऊं लागला होता. भरीला गेल्या वर्षाच्या जमाखर्चावरून मुंबईच्या गिरण्यांना एकंदर एक कोटी सहासष्ट लक्ष रुपये नफा झाला होता. त्यामुळें कामगारांच्या साऱ्या शारीरिक शक्तींचा आपण आपल्या फायद्याकडे उपयोग करून घेतला आहे अशा सुखमय जाणिवेनें बऱ्याच गिरण्यांच्या मालकांना घेरलें होतें. शिवलालांच्या गिरणीला तर दोन लक्ष चौऱ्याण्णव हजार रुपये नफा झाला होता. एक फाझलभाई गिरणी सोडली तर क्रेसेंट, प्रीमीयर इत्यादि चांगल्या फायदेशीर चाललेल्या गिरण्यांपेक्षां शिवलालच्या गिरणीला फार मोठा नफा झाला होता. हें फायद्याचें प्रमाण शिरीषकुमाराला माहीत होतें. आणि त्यामुळें निदान चालू वर्षी तरी गिरणी मालकांकडून कामगारांची कांहीं कागाळी होण्याची फारशी भीति नव्हती, याचाही त्याला भरंवसा होता. या साऱ्या कारण परंपरेमुळें शिवलालांच्याकडून परस्पर गिरणीत आलेल्या बोलावण्यानें तो किंचित् गोंधळून गेला.

नीरेलम सांगून तो घराबाहेर पडला; आणि त्यानें शिवलालांची गिरणी गांठली. गिरणीच्या बाहेर अनेक कामगार स्त्रीपुरुषांची अस्ताव्यस्त गर्दी झाली होती. त्या गर्दीतून आंत जाऊन शिरीषकुमारांनी मॅनेजरचें ऑफीस गांठलें. ऑफीसमध्यें शिवलाल स्वतां येऊन बसले होते. ती बाहेरची गर्दी, स्वतां शिवलालांनी गिरणीच्या ऑफीसांत स्वतां येऊन हजर होणें, आणि आसपास सर्वत्र गांभीर्य पसरून राहिलेलें असणें इत्यादि गोष्टी मन गोंधळवून टाकणाऱ्याच होत्या. तेथें घडलेला प्रकार निःसंशय खेदजनक होता. ऑफीसमध्यें जाऊन बसल्यावर शिरीषकुमारांनीं शांतपणानें चौकशी केली, तेव्हां त्यांना हा खेदजनक प्रकार कळून आला. शिवलालाच्या गिरणींतील व्यवस्थापक मि. शापूरजी जोशी यांची आणि कांहीं कामगार स्त्रियांची सकाळपासून बरीच धुसफूस चालू होती, त्या धुसफुशीचें पर्यवसान भयंकर मारामारींत झालें. मि. जोशी यांची व्यवस्थापक म्हणून शिवलालांच्या गिरणींत तीनचार महिन्यापूर्वीच नेमणूक करण्यांत आली होती. या अवधींत गिरणींतील व्यवस्था आस्थेनें पाहून त्यानीं आपल्या चालकांचें प्रेम संपादन केलें होतें. या गिरणीच्या रहाटखा-खात्यांतील दोनशें बायका नीट काम करीत नाहींत, या सबबीवर त्यांना नोकरीवरून काढून टाकण्याचें मि. जोशी यांनीं ठरविलें. व त्याप्रमाणें गेल्या मंगळवारीं दुपारीं दुसऱ्या दोनशें नवीन बायका गिरणीमध्यें त्यांनीं हजर ठेवल्या होत्या. या नवीन बायका येतांक्षणींच जुन्या बायकांच्या 'नायकिणी'ला मि. जोशी यांनीं बोलावून घेतलें, व तिला सांगितलें कीं, 'तुला व तुझ्या हाताखालीं काम करणाऱ्या बायकांना नोकरीवरून काढून टाकण्यांत आलें असून तुम्ही सर्वजणी आताच्या आतां काम सोडून निघून जा.' नायकिणीनें आपल्या खात्यांत जाऊन तेथील बायकांना हा हुकूम तावडतोब सांगितला. हा तडकाफडकीचा हुकूम ऐकून सर्व बायका रागानें लाल झाल्या. त्यांच्यापैकीं कांहींनीं त्या गिरणीमध्यें दहा दहा वर्षांपेक्षां अधिक वर्षे काम केलें असल्यानें त्यांना व्यवस्थापकाच्या

हुकूम ऐकून राग आला. इतक्यांत त्यांच्या खात्यामध्यें गिरणीचे कांहीं शिपाई गेले व त्यांनीं त्या बायकांना एकदम निघून जाण्यास सांगितलें. त्यांना बाहेर हाकलण्यासही सुरवात करण्यांत आली. लवकरच सर्व बायका रहाट खात्यांतून निघून व्यवस्थापकाच्या ऑफिसच्या समोर येऊन उभ्या राहिल्या, व त्यांच्या नायकिणीनें नोकरीवरून काढल्याचीं तिकिटें मागितलीं. व्यवस्थापकानें तीं त्यांना ताबडतोब न देतां त्यानें नायकिणीलाच शिव्या दिल्या. बायकांना तें सहन न होऊन त्यांनीं व्यवस्थापकाला उलट शिव्या देण्यास सुरवात केली. व्यवस्थापक यामुळें फारच संतापले व त्यांनीं 'नायकिणी'ला मारहाण केली. गिरणीच्या रामोशानेंही धन्याचा कित्ता गिरविला, व नायकिणीवर हात उगारला. उभयपक्षांत मारामारीला सुरवात झाली. रामोशाबरोबर आणखी कांहीं शिपायांनींही बायकांवर दगड टाकले, व त्यांच्यापैकीं कांहींना जखमी केलें. बायकांनींही व्यवस्थापकावर व शिपायांवर दगड फेंकले. व्यवस्थापक मधूनच आपल्या ऑफीसांत निघून गेले व त्यांनीं या बायकांना हाकून देण्याचा हुकूम सोडला. यावेळीं शिपायांनीं काठ्यांचा उपयोग केला, व कांहीं बायकांना त्यामुळें जखमा झाल्या. बायकांचा आरडाओरडा ऐकून इतर खात्यांतील पुरुष मंडळी धावत आली, व मारामारी जोरात सुरू झाली. व्यवस्थापक आपल्या ऑफिसांत खुर्चीखालीं बेशुद्ध पडले. व इकडे बरेच कामगारही जखमी झाले.

बहुतेक लोकांमध्यें बोलली जाणारी हकिकत अशी वरीलप्रमाणें होती. तरी पोलीसखात्याकडून प्रसिद्ध होण्याकरितां तयार झालेली आणि गिरणीच्या मालकांनीं संमत ठरविलेली अधिकृत बातमी जरा वेगळी होती. झाल्या प्रकाराला ज्या ज्या बाबतींत कायद्याचीं बंधनें लागण्याचा संभव होता, त्या बाबींचाच विशेषेंकरून योग्य तो खुलासा या दुसऱ्या हकिकतींत करण्यांत आला होता. पोलिसांच्या हकिकतीचा सारांशही शिरीषकुमारांनीं मुद्दाम मिळविला. तो सारांश असा होता—

" मंगळवारीं दुपारीं पावणेचार वाजतां मि. जोशी यांच्याकडून पोलीसांना असें पत्र आलें कीं, 'आमच्या गिरणींतील दोनशें बायकांना मी आज कामावरून काढून टाकून नवीन बायका कामावर ठेवणार आहे. यावेळीं कदाचित् दंगा होण्याचा संभव आहे, तरी पोलीसांची मदत पाठवावी.' या पत्राप्रमाणें कांहीं अंमलदार व पोलीस गिरणीकडे जावयास निघणार, इतक्यांत टेलीफोन आला कीं, 'गिरणींत मारामारीस सुरवात झाली आहे.' ताबडतोब पोलीस तेथें गेले, व पाहातात तों त्यांना बायका एके ठिकाणीं तांडा करून उभ्या आहेत, व मॅनेजर बेशुद्ध स्थितींत पडले आहेत, असें आढळून आलें. मॅनेजरना लगेच इस्पितळांत नेण्यांत आलें. गिरणीच्या आवारांत सर्व ठिकाणीं दगड पडल्याचेंही त्यांना दिसून आलें.

बायकांना काढून टाकतांच त्यांनीं एक महिन्याच्या नोटीशीचा पगार मागितला; पण मॅनेजरनीं तो देण्याचें नाकारलें. नव्या बायका मॅनेजरनें आपल्या ऑफीसच्या पाठीमागें आणून उभ्या केल्या होत्या. जुन्या बायकांचें असें म्हणणें आहे कीं, 'आम्हांला मॅनेजरनें वाटेल त्या शिव्या दिल्या, व मॅनेजरच्या सांगण्यावरून शिपायांनीं मारहाण करून, आम्हाला बाहेर घालविण्याचा प्रयत्न केला, कांहीं कारण नसतां एकदम नोकरी-वरून काढून टाकणें, नोटिशीचा पगार न देणें, व मारहाण करणें, या सर्व कारणांमुळें चिडून जाऊन, बायकांनीं मॅनेजरवर दगड फेंकलें! बायकांनीं हांकून देण्याचा हुकूम सोडण्यापूर्वीं मॅनेजरनें पोलिस येण्याची वाट पाहिली असती, तर बरें झालें असतें. पोलीस येईतोंपर्यंत लोक आपापल्या खात्यांतून निघून गेलें. त्यामुळें खरे गुन्हेगार कोण, याचा तपास करणें त्यांना कठिण जात आहे—"

याच विषयावर शिवलाल व शिरीषकुमार यांच्यामध्यें थोडें बोलणें झालें, त्यावेळीं शिरीषकुमारांनीं म्हटलें,

"मी असल्या मारामारीला आजपर्यंत हरकत करीत आलों आहें ?" शिवलालनीं किंचित् चिडकेपणानें विचारलें,

"मग कसल्या मारामारीला तुम्ही अनुकूल आहां ?"

"कसल्याच नाहीं !" शिवलालच्या प्रश्नाची खोंच ध्यानांत येऊनही शिरीषकुमारांनीं शांतपणानें उत्तर दिलें, आणि पुढें म्हटलें, "झाल्या प्रकाराला अनुकूल कोण किंवा प्रतिकूल कोण या गोष्टींचीच नुसती चर्चा करून या प्रकरणाचा शेवट लागेल असें नाहीं. या मारामारीचा निषेध करणाऱ्या लोकांनींही कांहीं महत्त्वाच्या गोष्टींचा खोल विचार करणें जरूर आहे. पहिली गोष्ट अशी कीं, रहाटखात्यांतील बायका ज्या इतक्या संतापल्या त्याचें कारण काय हें पाहिलें पाहिजे. गिरण्यांतून काम करणाऱ्या बायका अत्यंत लाजाळू व भित्र्या असतात, हें आपणां सर्वांसच माहीत आहे. त्या आपलें खातें सोडून सहसा बाहेर पडत नाहींत. त्यांच्या कांहीं तक्रारी असल्यारा त्या बोलून न दाखवितां, त्या तशाच सोशीत राहातात. गेलीं दोन वर्षे अशा तक्रारी जमविण्याचा मी प्रयत्न करतों आहें. कित्येक तक्रारींची बरोबर माहिती घेण्यासाठीं मला बायकांच्या घरीं जावें लागलें आहे. त्या स्वतः होऊन धीटपणानें माझ्यापुढें आल्या आणि त्यांनीं आपल्या तक्रारी धडाधड बोलून दाखविल्या असें सहसा घडल्याचें माझ्या पाहाण्यांत नाहीं. त्या परकी पुरुषाशीं बोलण्यारा धजत नाहींत, मग व्यवस्थापकापुढें जाऊन बोलावयाचें तर लांबच राहिलें. अशी परिस्थिति असतांना या बायका व्यवस्थापकाच्या ऑफिसांत जाऊन त्याला मारतात, याचा अर्थ काय ? लाजाळू व भित्र्या बायका ज्याअर्थी व्यवस्थापकासारख्या अंमलदारावर हात टाकतात, त्याअर्थी त्यांचें दुःख अनावर झालें असलें पाहिजे, आणि त्यांच्यावर झालेला अन्याय त्यांना चीड येण्याइतका प्रखर झाला असला पाहिजे. हा अन्याय कशा प्रकारानें होत आहे याची चौकशी वास्तविक सरकारनें केली पाहिजे. दुसरी गोष्ट म्हणजे पुरुषांनीं कामगार बायकांना मारण्याची पद्धत! पुष्कळ गिरण्यांतील अंमलदार बायकांना

बारीकसारीक अपराधाबद्दल मारीत असतात. माझ्याकडे अशा मारामारीच्या प्रकारांची एक यादी आहे. ही दुष्ट चाल नाहींशी व्हावयास पाहिजे. कामगारांना मारहाण केल्यास मारणारावर खटला करतां येतो हें मला माहीत आहे. पण असल्या मारामाऱ्यांना साक्षीपुरावा भरपूरसा मिळत नाहीं. कामगार लोक साक्षी देण्यास भितात. ही मारहाणीची पद्धत बंद करण्यास एखाद्या कायद्याची जरूर आहे. ज्या बायका परपुरुषांपुढें येऊन बोलण्यास भितात, त्यांच्यावर पुरुषांनीं हात टाकल्यास त्यांना संताप येणें साहजिक आहे. रहाटखात्यांतिल या दोनशें बायका वाईट काम करणाऱ्या होत्या असें व्यवस्थापकांना सिद्ध करतां येणें शक्य आहे काय? तसें जर असतें तर त्या दहा दहा वर्षें गिरणीमध्यें कशा टिकल्या असत्या? एकदम दोनशें बायका नोकरीवरून काढतांना त्यांच्या पोटापाण्याचें काय होईल याचा विचार व्यवस्थापकांनीं करावयास हवा होता. त्यांचा अपराध काय होता तेंही त्यांना नीट सांगण्यांत आलें नाहीं. नोटिशीशिवाय कामगारांना कामावरून काढून टाकतां कामा नये असाही कायदा झाला पाहिजे! आणखी एक गोष्ट अलीकडे स्पष्टपणें दिसून यावयास लागली आहे. ती ही कीं, भाव ठरविण्याच्या किंवा ते कमी जास्त करण्याच्यावेळीं लोकांना मुळींच माहिती देण्यांत येत नाहीं. नवी जात सुरू करतांना आपल्याला वाटेल तो भाव ठरवावयाचा, व तो जास्त आहे असें दिसतांच एकदम कमी करावयाचा, लोकांना त्यासंबंधी कांहींही कळवावयाचें नाहीं, ही गोष्ट खरोखर चीड आणण्यासारखी आहे. मालकाच्या हातून चूक झाली तर ती सुधारतांना सारा प्रकार कामगारांच्या कानावर घालावयास नको कां? जो पगार मिळेल तो घेऊन कामगारांनीं स्वस्थ बसावें, अशी मालकांची इच्छा आहे काय? संपामुळें जसा कामगारांचा तसा मालकांचाही तोटा होतो. आतां या तुमच्याच गिरणींतील कामगारांची गाऱ्हाणीं मी तुम्हांला सांगितली तर आश्चर्य वाटेल तुम्हाला!"

"कामगारांचा कैवार घेण्याची ही तुमची पद्धत नेहमीचीच आहे. त्यांत तुम्ही कांहीं नवीन सांगितलं असें नाहीं. थोडंसं जें नवीन आहे तें म्हणजे

तुमचं या कामगार बायकांबद्दलचं तत्वज्ञान! काय तर म्हणे त्या परपुरुषांकडे नुसत्या पाह्यलाही भितात! या साऱ्याचं उत्तर माझ्याजागीं एकादा माथे-फिरू मालक असतो तर त्यानं फार विलक्षण तऱ्हेनं दिलं असतं! असल्या काजाळूच्या झाडांनीं या गिरणीच्या हवेंत उगवूं नये. ज्यांना साधं बोललेलं किंवा शिस्त लावलेली खपत नाहीं, त्यांनीं स्वतंत्र उद्योग करावा. ऐपत मढबुंजाची आणि मिजास बादशहाची असा प्रकार करायचा असला तर त्याला गिरणी ही जागा नव्हे, असलं कांहीं तरी उत्तर त्या माणसानं दिलं असतं. मला असला आततायिपणा करायचा नाहीं. पण इतकं आततायी उत्तर मीं द्यावं असा हा सारा प्रकार आहे. त्यांतून तुमची ही संपादणी तर अगदीं चीड आणणारी आहे."

'शेटजी, यांतल्या ज्या ज्या बाईला मारहाण झाली, ती ती बाई तुमची हंसा आहे अशी क्षणभर कल्पना करा, आणि मग या साऱ्या प्रकरणाचा विचार करा, असं माझं आपल्याला आग्रहाचं सांगणं आहे.'

'कल्पनेनं कोणतीही खोटी गोष्ट खरी मानायला मी बिलकुल तयार नाहीं, हंसाचं नांव कशाला घेता? हंसा श्रीमंताची लेक आहे. तिचा बाप धनंतर आहे!'

'होय! तिचा बाप धनंतर आहे. पण त्याला धनंतर केलं कुणी?'

"असल्याच तुमच्या प्रश्नांनीं अलीकडे या कामगारांची माथीं भडकत चाललीं आहेत. मास्तर, माझ्या मनगटाच्या जोरावर मी इतका मोठा झालों. लहानपणीं त्या जगजीवनशेटच्या पेढीवर महिना सात रुपयाची नोकरी धरली पहिल्यानें मीं! दुकानाच्या फळीवर बसून राह्यचं, दुकानाच्या पुढं सडा घालायचा, आणि पडेल तें काम करण्याकरितां धावपळ करायची असे माझे दिवस गेले आहेत. माझ्या प्रामाणिकपणानं मी जगजीवनांची मर्जी संपादली आणि मग त्यांनीं मला आधार दिला. त्या आधारावर मला इतकं मोठं होता आलं!"

'मी तेंच म्हणतों आहे. तुम्हाला जसा जगजीवनांनीं आधार दिला तसा तुम्ही तुमच्या कामगाराना आधार द्या. तुम्ही जसे प्रामाणिक होतां, तसेच हेही प्रामाणिक आहेत. शिवाय त्यांचं मागणंही फार नाहीं. माणसासारखं त्यांना खाऊन पिऊन निश्चिंतपणें आणि सुखानं जगतां यावं, एवढंच त्यांचं मागणं आहे. तुम्हाला जगजीवनांचा आधार मिळाल्याबरोबर तुम्हीं किती वेगळे बनलांत !'

'मास्तर, मी तुम्हाला बोलवलं, तें फक्त तुमचे कामगार तुम्हाला आवरतो आलें तर पहा हें सांगण्याकरितां बोलावलं! तुम्हाला माझी शिकवणी करावयाला मी नाहीं बोलावलं! तुम्हाला शिकवणी आहे ती हंसाची आहे, माझी नाहीं. आणि आतांशा मला तुमची एक वेगळीच भीति वाटायला लागली आहे. माझ्याशीं जसं तुम्ही बोलतां तसंच त्या पोरटीशीं बोलून तिला एखादेवेळीं बिघडवून टाकाल. ती लहान आहे. तिला हें बाहरचें जग कांहीं माहीत नाहीं. तुमच्या असल्या बोलण्यानं तिच्या मनावर परिणाम व्हायला वेळ लागायचा नाहीं.'

"पण मी असं तिच्याशीं बोलतों कीं नाहीं हें पाहाण्याकरितां तुमचे लपूनछपून माझ्यावर पाहारे चालू असतातच ना?" शिरीषकुमारांनीं चिडून उत्तर दिलें.

त्यावर अतिशय उपरोधानें हंसत शिवलालनीं म्हटलें, 'अहो, किती झालं तरी मला माझ्या मुलीची काळजी घ्यायला पाहिजे.'

पाण्याच्या एका प्रचंड लाटेंत शेंकडो तरंग उठतात, तसें या उद्गारांचे झाले. या उद्गारांतून वाटेल ते गर्भीत अर्थ निघत होते, आणि शिरीषकुमाराच्या अंतःकरणाला तीक्ष्ण शस्त्राच्या धारेप्रमाणं चाटून जात होते! संताप येऊन शिरीषकुमारांनीं उत्तर दिलें, "शेटजी, आजपासून माझी तुमच्याकडची शिकवणी बंद झाली असं समजा. मला तीं पुढें चालविणें शक्य नाहीं."

आणि मग त्या ठिकाणीं क्षणभरही न थांबतां शिरीषकुमार झपा-झ्यानें जें बाहेर पडले ते थेट घरीं आले.

× × ×

माई आज दुपारीच पुण्याकडे गेली होती. नाराही कुठें तरी बाहेर गेली होती. घरांत कोणीही नव्हतें. शिरीषकुमारांनीं आपल्या खोलीतल्या वस्तूंच्याकडे सूक्ष्मपणानें पाहिलें. मॅक्झिम गॉर्कीचा वृद्धपणीं वांकलेला देह समोरच्या टेबलाच्या वरच्या अंगाला फोटोमध्यें दिसत होता. त्याच्याकडे आर्द्र दृष्टीनें पाहात शिरीषकुमारांनीं मनाशीं म्हटलें, 'केवढीं मोठीं आयुष्यें हीं! असले हे प्रचंड तेजोगोल सृष्टि दिपवून जातात. त्या तेजोगोलांतला एकादा तरी कण माझ्या बांट्याला येईल का?' प्रो. ब्रुगमन् व आगरकर आणि स्वतःचे वडील यांच्या फोटोंकडे स्तब्धपणानें पाहात त्यांनीं एक सुस्कारा टाकला आणि म्हटलें, "या साऱ्यांच्याकडून मला नवी स्फूर्ति घेतली पाहिजे. माझ्यावर ओढवणाऱ्या आपत्तींना तोंड देतांना, या लोकांनीं आपापल्या जीविताच्या कक्षेंत जो अनिरुद्धपणा केला, तो मलाही केला पाहिजे."

त्या तीनच खोल्या होत्या. पण सारें घर कसें उदास आणि खिन्न वाटत होतें. त्या ठिकाणची असह्य स्तब्धता शिरीषकुमारांच्या मनाला जाचक होत होती. कांहीं अंतरावरच्या रेल्वे लाईनवरून आगगाडयांची वाहतूक चालू होती. तो संमिश्र खडखडाट दुरून ऐकूं येत होता. अन्तःकरणांतल्या कोलाहलाशीं जणूं तो आवाज स्पर्धा करीत होता. सारें कांहीं स्तब्ध, शांत, मुकें आणि अचल भासत होतें. या फोटोंतल्या व्यक्ति एकदम चालत्या-बोलत्या व्हाव्या, हाताचा स्पर्श न होतांच या कापडी गवसणींत दडून बसलेल्या दिलरुब्याच्या तारांचा जोरदार झंकार सुरू व्हावा, टेबलावरच्या पुस्तकांतलि छापील शब्द मानवीं वाणीनें आक्रोश करूं लागावेत, आणि सर्वत्र चेतना यावी, अचल वस्तू चल व्हाव्या, हालचाल—अगदीं जबर-दस्त हालचाल सर्वत्र माजून राहावी आणि आपल्या मनाचा कोलाहल त्या

आवाजांत बुडून जावा असा कांहींसा विचित्र विचार त्यांच्या मनांत येऊन गेला.

त्यांनीं दिलरुबा काढला आणि संथपणानें वाजविण्यास सुरवात केली. तारांची कंपनें होत होतीं. मंद्रमध्यम सप्तकांतून ध्वनिसागर उचंबळत होता. तें वाद्य नव्हतें, तर अंत:करण होतें. समाजांतल्या कुरूपतेची चीड आलेल्या अंत:करणानें दिलरुब्याचा मोहक आकार धारण केला होता. तीं तारांची कंपनें नव्हतीं; ते भावनांचे झंकार होते! लक्षावधि स्वरलहरी एकमेकींच्या आलिंगनांत जणूं तल्लीन झाल्या होत्या. सृष्टींतले सारे मोहक सूर एकमेकांचे हात धरून नाचत बागडत असल्याचा भास होत होता. आणि अंत:करणातले अनेक स्थूलसूक्ष्म विकारही तसलेंच तरल तांडव करीत होते! अंगीकृत कार्याच्या नशेनें बेभावून जाणारे महापुरुष जें तन्मयतेचें सुख अनुभवतात, तसलें, अस्तित्व विसरावयास लावणारें असह्य सुख त्या टीचभर वाद्यांतून बाहेर ओसंडत होतें! साऱ्या संसाराशीं तें वाद्य जणूं चुरशीनें सांथ करीत होतें. मॅक्झिम गॉर्की, प्रो. ब्रुगमन्, आगरकर! साऱ्यांच्या अन्त:करणतत्वांशीं त्या वाद्याची सांथ चालली होती!

शिरीषकुमारांच्या या समाधीचा भंग न करतांच नीरेनें वरांत पाऊल टेवलें. ती पलीकडच्या खोलींत बसून त्या स्वरसंमेलनांत तल्लीन होत होती. एकदम उकाड्यांतून, मुद्दाम गार हवा खेळविलेल्या जागेंत प्रवेश करावा तसें तिचे झालें. तिच्या मनानें अनेक मधुर भावनांशीं उन्मादक क्रीडा मांडली. माणसाची प्रत्येक हालचाल ही त्याच्या मनाच्या प्रकटीकरणासाठीं घडत असते असें तिनें कुठेसें वाचलें होतें, त्याचा तिला यावेळीं प्रत्यय येऊं लागला. तिनें मनालाच विचारलें, ' या वाद्याच्या ठिकाणीं ही इतकी तीव्र आर्तता आज कशासाठीं भरून राहिली आहे? कुणाचं मन ही असली प्रकटीकरणाची विलक्षण धडपड करतें आहे? या असंख्य स्वरलहरींच्या नादांतून मानवी मनाचे हे अप्रकट नि:श्वास, भावनांचे हे अनिरुद्ध कोलाहल, दडपून ठेवलेल्या आशा-आकांक्षांचें हें

अस्फुट स्पंदन, उदात्त होण्यासाठीं धडपडणाऱ्या [illegible]सनांचा प्रमत्त खळबळाट, आणि ऋणानुबंधी व्यक्तींच्या जीविताशीं [illegible] होण्यासाठीं आतुर झालेल्या जिव्हाळ्यांच्या आर्त आरोळ्या को[illegible]कल्याणप्रद कार्याच्या पूर्ततेसाठीं निर्माण होत आहेत ? '

त्या स्वरविलासानें तिला खेचून घेतलें. ओढ घेणाऱ्या पाण्यांत उभ्या राहिलेल्या माणसाचे पाय प्रवाहांत अधांतरी राहून त्याचें शरीर प्रवाहाच्या उताराकडे खेचलें जावें, तसें या स्वरसमुद्राच्या लाटांनीं तिच्या शरीरावर स्वामित्व मिळविलें ! ती शिरीषकुमारांच्या खोलीच्या दाराशीं आली. समाधिसुखाचीं नुसतीं वर्णनेंच तिनें आजपर्यंत ऐकलीं होतीं. पण तीं वर्णनें आज आपण प्रत्यक्ष अनुभवीत आहों, असा तिला भास झाला. शिरीषकुमारांनीं डोळे मिटून घेतले होते. ओठावर ओठ दाबून धरले होते, हातांचें फक्त चलनवलन चाललें होतें. डोळ्यांच्या कडांशीं अश्रु जमल्यासारखें भासत होतें. ती कितीवेळ तरी तेथें उभी राहिली. काळाला गति नसती तर किती छान झालें असतें, असें तिला वाटलें. किंबहुना आपल्यासारखाच काळही जर चोरपावलांनीं या ठिकाणीं येऊन उभा राहिला असता, तर येथून काढता पाय घेणें त्याच्या जिवावर आलें असतें, असली अघटित कल्पनाही तिच्या मनांत येऊन गेली !

वाद्यवादन बंद झालें. शिरीषकुमारांनीं दिलरुबा खालीं ठेवला, आणि डोळे उघडले. डोळ्यांत अश्रु तरळत होते, म्हणून वाऱ्यानें हालणाऱ्या कापडावरील चित्रासारख्या, समोरच्या सर्व वस्तु त्यांच्या दृष्टीला थरथरल्यासारख्या वाटल्या. त्यांनीं पुन्हां डोळे घट्ट मिटून घेतलें. डोळ्यांत तरळणारे पाणी निखळून टाकण्याकरितां मान हालविली, आणि पुन्हां डोळे उघडले. समोर नीरा उभी होती. अगदीं तटस्थपणानें उभी होती! तिच्याजवळ जाऊन शिरीषकुमारांनी तिचा हात घट्ट धरला आणि तो आपल्या दोन्ही हातांनी दाबून धरीत त्यांनी आपल्या डोळ्याजवळ नेला. त्यांच्या हृदयाची आर्तता अद्यापही ओसरली नव्हती. त्या आर्ततेच्या भरांतच त्यांनीं मृदुपणानें हांक मारली, 'नीरे !'

तिनें [illegible] केलें, ' शिरीष, माझं मन शांत झालं. चित्तवृत्ती प्रसन्न झाल्या ! [illegible]माझं मलाच कळत नाहीं, कीं असलं विलक्षण समाधान मला एकाए[illegible]कां वाटूं लागलं तें ! आजपर्यंतच्या आयुष्यांत आनंदित करणारे अनेक प्रसंग मी अनुभवले आहेत. पण यावेळेचा हा आनंद त्या साऱ्या आनंदाहून अगदीं वेगळा आहे !'

'वाद्यांचे मंजुळ स्वर ऐकून पशूही देहभान विसरतात, असं आपण ऐकतों. खरं आहे तें अगदीं. पशु देहभान विसरतात ! पशु आपलं पशुत्व विसरतो ! माणसालाही आपलं पशुत्व विसरायला लावण्याचं सामर्थ्य संगीताच्या स्वरलहरींत आहे. देहाची जाणीव नाहींशी करायची, स्वत्वाचा विसर पाडायचा, ही संगीताची पराकाष्ठा आहे. आपण माणसं फार कृत्रिमपणानं जगायला शिकलों आहों. पण पशुपक्ष्यांच्या कोणत्याही स्निग्ध जोडीकडे पाहिलं तर असं आढळून येतं कीं, आपापल्यापरी संगीत आळवून नर मादीला वश करीत असतो. मोराच्या पिसाऱ्याइतकीच लांडोरीला केकारवाची आसक्ति वाटत असली पाहिजे. किंबहुना पिसाऱ्यानें ती मोहित होत असेल तर केकारवानें ती स्वतांला विसरून आपल्या जोडीदाराशीं एकदम तन्मय होत असेल!'

हें बोलणें नीरेला अगदीं अनपेक्षित होतें. त्या बोलण्यांतील शृंगाराच्या सूचनेनें ती बावरून गेली. तिचा हात शिरीषकुमारांच्या हातीं होता. शिरीषकुमारांच्या भाषणाच्या अनुरोधानें त्याचे हात कोणत्या प्रकारची भावना व्यक्त करतात हें ती मुद्दाम पाहाण्याचा यत्न करीत होती. पण त्यांच्या हातांत अद्यापही मघांच्या वाद्यवादनाच्या वेळची आर्तता भरून राहिली होती. ज्या हळुवारपणानें त्यांनीं त्या वाद्याला स्पर्श केला होता, त्याच हळुवारपणानें तें आपल्याही हाताला स्पर्श करीत आहेत असा तिला भास झाला. संगीताची समाधि अद्यापही पूर्णपणें ओसरली नव्हती आवाज, भाषण आणि स्पर्श करण्याची तऱ्हा या सर्वांमधून अर्धवट संगीतसमाधीचा अंश व्यक्त होत होता !

नीरेनें म्हटलें, " मी त्या स्वरांनीं मोहित झालें. स्वर वाजविणाऱ्या व्यक्तीचा मोह मला नाहीं ! "

" नीरे, आतां मी पशूंचा दाखला दिला तो एवढ्याचसाठीं कीं त्यांच्यांत फक्त शरीर अंकित करून घेण्यांतच संगीताचा उपयोग करतात हें सांगावं म्हणून. माणसाची पद्धत त्याहून फार वेगळी आहे. शरीरं अंकित करणं किंवा मोहित करणं या गोष्टी मनुष्यकोटीलाही फार सुसाध्य आहेत. विशिष्ट वयोमान, अनुकूल वातावरण इत्यादींच्या परिणामानें आधींच ठिसूळ बनलेल्या शरीराला अंकित करायला मुळींच वेळ लागत नाहीं. पशुपक्ष्यांच्या सृष्टींत आढळून येणारं नैसर्गिक सौंदर्य माणसाजवळ नसलं तरी त्याची उणीव भरून काढण्याची किमया माणसाला साधली आहे. ती किमया कोणची म्हणशील तर पैसा ! पैसा हा मानवी मोरांचा पिसारा आहे ! नाण्यांचा आवाज हाच माणसानं निर्माण केलेला अतिशय आकर्षक असा केकारव आहे ! विचार केला तर किती अनैसर्गिक वाटतें हें साधन ! स्वाभाविकांतलं स्वाभाविक जें प्रेम, नैसर्गिकांतली नैसर्गिक जी आसक्ति आणि साहजिकांतलं साहजिक जें आकर्षण तें सारं या पैशाच्या तालावर घडावं हें किती निसर्गविरोधक आहे ? पण असलं निसर्गविरोधक आचरण प्रत्येक क्षणाला आपल्या हातून घडत असतं. बाजारांत मिळणाऱ्या वस्तूच पैशानं हातीं येतात असं नाहीं, तर चालतें बोलतें देहही आपल्या मनाला वाटतील तसें वांकवण्याची जबर दस्त शक्ति या पैशानं साध्य होते! सर्वत्र एकच गोष्ट भरून राहिली आहे. पैसा ! सगळ्या जगाचा मध्यबिंदु पैसा आहे, आणि त्या मध्यबिंदूशीं जास्त कमी अंतर राखीत सारे लोक एकसारखे गिरक्या घे[illegible] आहेत. या मध्यबिंदूचं गुरुत्वाकर्षण इतकं भयंकर असतं कीं त्यामुळें [illegible] हजारो उल्कापात घडतात ! "

आणि बोलतां बोलतां शिरीषकुमार स्तब्ध झाले. संध्याकाळ[illegible]ीण होत चालली होती. सारी सृष्टि एखाद्या राक्षसी सांवलीसारखी काळव-

ढेली दिसत होती ! त्या खोलींत दिवा लागलेला नव्हता. ती दोघेंही जवळ जवळ बसलेली होती. तीं सर्व खोली संगीताच्या मधुर पडसादांनीं धुंद होऊन गेली होती. त्या खोलींतील प्रत्येक वस्तु स्वरलहरीच्या माधुर्यानें मोहित होऊन जागच्या जागीं थबकल्यासारखी दिसत होती.

नीरेचा हात सोडून देऊन शिरीषकुमारांनीं खोलींत येरझारा घालण्यास आरंभ केला. त्यांची दृष्टि खोलींतल्या साऱ्या वस्तूंवरून फिरत होती. टेबलावरील ग्रंथ, फोटोमधील व्यक्ति इत्यादींना रोखून पाहाणारी ती तीव्र दृष्टि जणूं विचारीत होती, " हें माझं कोडं तुम्ही कुणी उकलून सांगाल कां? माझ्या आयुष्यांत घडणाऱ्या नैसर्गिक नि स्वाभाविक प्रवृत्तींनाही माझ्या दारिद्र्यानें मुरड घालावी ? कां घालावी ? मला आकृष्ट करणाऱ्या वस्तूंकडे मी ओढ घेतों आहे, पण पायबंदांनीं जखडल्यासारखं मला होत आहे. कसल्या तरी अदृश्य तणाव्यानं मला जागच हालतां येत नाहीं ! कोणता तणावा आहे हा ? "

गोंधळून गेलेल्या दृष्टीनें त्यांनीं नीरेकडे पाहिलें. ती स्तब्ध होती, शांत होती, प्रसन्न होती. तिच्या अंगोपांगांत एक विलक्षण कांति भरून राहिल्याचा भास होत होता !

झटकन् तिच्याजवळ जाऊन अगदीं मृदुपणानें त्यांनीं तिला म्हटलें, " नीरे, तुझा निर्लोभ जिव्हाळा हवा आहे मला. खवळलेल्या महासागरातनं चाललेल्या जहाजासारखं माझं आयुष्य आहे. त्यांत जलक्रीडेचा उन्मादक आनंद नाहीं, लाटांच्या तालावर आंदोलन घेत राहून संथ नौकाविहार करण्याचं सुखही त्यांत नाहीं ! एखाद्या खडकावर आपटण्याची त्याला भीति आहे. त्याच्या ठिकाणीं आनंद आहे तो सामर्थ्याचा आहे ! सुख आहे महत्त्वाकांक्षेचं आहे! त्या जहाजाचा कर्णधार मी! मला धीर देणारा ध्रुवाचा तारा पाहिजे ! तो ध्रुवाचा तारा दूर असतो, तटस्थ असतो, पण मार्ग दाखवीत असतो. कर्णधाराला अधिकाधिक महत्त्वाकांक्षी बनवीत असतो ! नीरे, तूं तटस्थ राहा, पण..."

नीरेनें आपलें तोंड दोन्ही हातांनीं झांकून घेतलें, आणि एक अनावर हुंदका दिला! तो अनावर शोकावेग अट्टाहासानें आवरून धरीत तिनें म्हटलें, 'शिरीष, मी वेडी आहे, मी दुबळी आहे. माझी मलाच भीति वाटते! मी ध्रुवाचा तारा होईन कीं जहाजाचा अतिदुष्टपणानें भंग करणारी एकादी हिमशिला होईन हें माझं मलाच सांगता येत नाहीं. नुसत्या कल्पनेनंच मला असह्य दुबळेपणा येतो! अलीकडं माझ्या मनाचा फार गोंधळ उडून गेला आहे. महासागरांतल्या बर्फराशीसारख माझं मन झालं आहे. त्या राशीचा फक्त वरचा भागच पाण्याच्यावरून दिसत असतो. बाकीचा सारा भाग पाण्यांत बुडून गेलेला असतो. माझ्या मनाची मला होणारी जाणीव ही त्या वरवर दिसणाऱ्या बर्फराशीच्या भागासारखी आहे. मला स्वतांलाच न दिसणारा माझ्या मनाचा भाग फार मोठा आहे. अल्पांशानं समजलेल्या माझ्या मनाचा आधार हा अज्ञात भागच आहे. तो काय करील....'

तिला पुन्हां हुंदका आला आणि ती स्तब्ध झाली. तिच्याजवळ बसून शिरीषकुमारांनीं तिचे दोन्ही हात आपल्या हातीं घेतले, आणि म्हटलें, 'वेडी रे वेडी! एकाद्या लहान मुलासारखी काय रडते आहेस? ध्रुवाचा ताराच जर असा क्षीण व्हायला लागला, तर सारीं जहाजं जागच्याजागीं थबकून नाहीशी होतील, आणि...'

डोळयांत अश्रुपूर असतांनाच नीरेनें नकारार्थी किंवा कदाचित् निषेधार्थी मान हलविली, ओठ दाबून धरलें, आणि एक दीर्घ सुस्कारा टाकला!

'अग तूं स्वतांच म्हणालीस ना कीं मी वेडी आहे म्हणून? तूं वेडी आहेस, आणि म्हणूनच इतरांना वेडं करशील!'

'पण मी दुबळीही आहे, माझ्यामुळं दुसरं कोणी दुबळं झालेलं पाहाणं माझ्या जीवावर येईल!'

'दुसरं कोणी म्हणजे कोण ?'

आजवर सांठवीत आणलेला सारा स्निग्धपणा दृष्टींत एकवटून शिरीषकुमारांनीं नीरेला हा मुग्धमधुर प्रश्न विचारला ! तिनें मान वेळावली. तिचे ओठ अलग झाले. ऊनपावसाचा रमणीय संगम तिच्या मुखमंडलावर प्रतिबिंबित झाला ! तिच्या डोळयांत अश्रु होते. ओठावर स्मित होतें. डोळयांत अश्रु तरळत असतांनाच ती डोळेभरून शिरीष-कुमारांकडे पाहात होती. गळयापासून डोक्यापर्यंत काळवंडलेला शिरीष-कुमारांच्या चेहऱ्याचा भाग तिला अगदीं जवळून दिसत होता.

इतक्यांत दरवाजावर थाप वाजली !

शिरीषकुमारांनीं जाऊन दार उघडलें. शिवलालची मुलगी हंसा आली होती. बसतां बसतां तिनें म्हटलें,

'मास्तर, तुम्ही येणार नाहीं शिकवायला, असं सांगितलंत होय बाबांना ? '

'हो. मला आतां दुसरी कामं आहेत. तेव्हां शिकवणी करायला वेळ होईल असं दिसेना. मग काय करणार मी ?'

'आजपासूनच नेमकी तुमचीं कामं वाढली होय ?'

'खरंच! आजपासून नेमकीं माझीं कामं फार वाढलीं आहेत ! '

'मास्तर, पांच वर्षं झालीं, तुम्ही मला शिकवायला येतां. माझ्या-कडून एकदां तरी तुमची कांहीं आगळीक झाली कां ? तुमच्याबद्दल मला वाटणाऱ्या आदरांत कधीं खंड पडल्याचं तुम्ही पाहिलें आहे कां ?'

'तुझा त्याच्याशीं कांहीं संबंध नाहीं. माझ्या मनालाच शिकवणी करणं आतां बरं वाटत नाहीं. खरं म्हणजे शिकवणी सोडायला कांहीं कारण घडलं अशांतला भाग नाहीं. पण आपलं माझ्या मनालाच वाटलं कीं आतां शिकवणी सोडावी ! '

" खरं सांगू मास्तर ! बाबांनीं तुमचा कांहीं तरी अपमान केलेला आहे. त्यांची मुलगी मी. तो मला कसा सांगावा ? म्हणून तुम्ही कारण न सांगतां उडवाउडवी करतां आहा ना ही ? आमच्या बाबांना माणसाची किंमत नाहीं हेंच खरं. मघांचीच गोष्ट पहा ना. गिरणींत कांहीं मारामारी झाली वाटतं. बाबा तिकडून घरीं आले. कुणाशी तरी बोलतां बोलतां म्हणाले, 'अहो, तो मॅनेजर मेला तरी त्याचं दुःख नाहीं हो. पण कारखान्यांत सगळीकडं बंड पेटतं तें वाईट आहे.' पण मास्तर, मी तुम्हाला विचारतें, तुमच्या नव्या मतांप्रमाणं बापाचा दर्जा जसा मुलाला उगीचच्या उगीच उपयोगी पडूं नये असं तुम्ही म्हणतां तसंच बापाचं वाईट बोलणंचालणंही मुलाला बाधूं नये असंही झालं पाहिजे नाहीं का ? "

तिच्या बोलण्यांतली खोंच ध्यानांत येऊन शिरीषकुमारांना हंसूं आलें. ते म्हणाले, " हंसा, खट्याळ आहेस तूं फार. पण माझा नाइलाज झाला आहे. तुझ्या वडिलांनींच खरं म्हणजे मला तुला शिकवण्याची बंदी केली."

" बाबा करायचेच बंदी ! त्यांना आपल्या घराचा राणीचा बाग करायाचाय्. आम्हांला साऱ्यांना अगदीं पिंजऱ्यांतल्या जनावरासारखं वागवायला हवं त्यांना सनातनं ! "

" आणि हें जनावर पिंजऱ्यांतून बाहेर पडून इकडं आलं आहे, हें माहीत आहे का त्यांना ? थट्टा राहूं दे हंसा; पण तूं इकडे येतांना आपल्या वडिलांना विचारून आली आहेस कां ? "

" नाहीं. "

'तुझा माझ्यावर विश्वास आहे ना ? '

हंसानें नुसत्याच गंभीरपणानें शिरीषकुमारांकडे पाहिलें.

" मग मी तुला सांगतों, तूं आलीस तशी तावडतोब निघून जा. मी कठोरपणानं तुझ्याशीं वागतों आहें. पण माझा इलाज नाहीं. माझ्याकरितां एवढं कर. आलीस तशी जा. "

" पिंजऱ्यांतल्या जनावरांशीं कठोरपणानंच वागलं पाहिजे! जातें मी. पण मास्तर, मी आतां शिक्षण सोडून देणार आहें. बाबांची तरी मनांतनं कुठं इच्छा आहे मी शिकावं म्हणून. त्यांच्या ऐश्वर्याचं प्रदर्शन करीत फिरणारी एक चालती बोलती तावदानी पेटी समजतात ते मला. या पेटीला तकाकी येण्यापुरता शिक्षणाचा उपयोग आहे असं ते मानतात. तुमच्या आग्रहानं मी इतकी तरी शिकले. नाहीं तर एव्हांना शरीरानं आणि मनानं अस्ताव्यस्त होऊन एखाद्या अजगरासारखी कुठं तरी लोळत पडलें असतें. तुमची शिकवणी संपली, आणि माझं शिक्षणही संपलं. जातें मी!"

आणि ती निघून जाऊं लागली. तिच्या डोळ्यांतून आंसवें गळालीं! शिरीषकुमारांनीं तिला हांक मारली, " हंसा ! "

नुसतीच मान मागें मुरडीत तिनें खिन्नपणानें म्हटलें " जातें मी!" आणि ती निघून गेली.

नीरेकडे पाहात शिरीषकुमारांनीं म्हटलें, " पाहिलास, हा पैशाच्या गुरुत्वाकर्षणामुळं झालेला उल्कापात ! "

× × ×

एकदां एक लाट आली कीं, ती अनेक लहान मोठे तरंग उठविल्या-शिवाय ओसरूं नये, असा जणूं समाजाचा संकेतच आहे. शिवलालच्या गिरणींतील बायकांनीं केलेली मारामारी आणि त्याचें संपांत झालेलें पर्य-वसान तेवढ्यावरच थांबले नाहीं. मॅनेजर शापुरजी जोशी यांचा इस्पितळांत अंत झाला आणि त्याला प्राणांतक मार कारण झाला असें डॉक्टरांनीं जें निदान सांगितलें, त्या प्रकारचा इतर गिरणीचालकांवरही फार मोठा परिणाम झाला. श्री. जोशी यांच्या मृत्यूचा बदला घेण्याची सूक्ष्म इच्छा काहीं व्यवस्थापकांना मनांतून वाटूं लागली. त्याचप्रमाणें शिवलालच्या गिरणीं-तील दोनशें बायकांवर अन्याय झाला असें मानून त्या गिरणींतील इतर कामगारांनीं जो संप पुकारला त्याचे प्रतिध्वनि ठिकठिकाणीं उठल्याशिवाय

राहिले नाहींत. कांहीं गिरण्यांतील विणकऱ्यांनीं संप केले. दोनच्या ऐवजीं तीन सांचे चालवावयास सांगून कामगारांची बचत करण्याची जी नवी क्लृप्ति चालकांनीं काढली तिचा निषेध म्हणून हे संप झाले होते! कांहीं ठिकाणीं त्रासन खात्यांतील कामगारांनींही संप पुकारले. असे संप संघटित स्वरूपांत झाले, तरी ते करतांना बेकायदेशीर अत्याचार होऊं नयेत अशी दक्षता बाळगण्याचें भान कामगारांना राहात नसे. एका गिरणींत वीव्हिंग मास्तरला असाच अत्याचार करून मारण्यांत आलें. हा मार प्राणांतक ठरला. या मारामारीत सुमारे दोनशें कामगारांनीं लोखंडी शिगा हातीं घेऊन वीव्हिंग मास्तरवर हल्ला केला होता!

संपांत मोकळ्या झालेल्या कामगारांना गांवीं जाण्याकरितां किंवा मुंबईतच राहाण्याकरितां पैसे हवे होते. हे पैसे नेहमींच हाताशीं असलेल्या कामगारसंघनिधींतून खर्च करणें इष्ट नव्हतें. अशा स्थितींत चालू संपामुळें बेकार झालेल्या लोकांना अन्नपाण्याकरितां पैसे देतां यावे म्हणून एक नाट्यप्रयोग घेण्याचें ठरलें! हा नाट्यप्रयोग करणारे मंडळ हें सुशिक्षितांचें असून त्याची सर्वांत अपूर्व योजना म्हटली म्हणजे स्त्रियांच्या भूमिका स्त्रियांनींच करण्याची त्या मंडळानें पद्धत सुरू केली होती ही होय! शिवाय जें नाटक होतें तेंही आजच्या सामाजिक विषयांवर अगदीं आधुनिक नाट्यतंत्राचा अवलंब करून तयार केलेलें होतें. त्याच्या प्रयोगाचीं तिकिटें ठिकठिकाणीं विकली जात होतीं. नीरेनेंही तिकीटविक्रीचें काम पतकरलें होतें. नाट्यमंडळ परगांवीं होतें. प्रयोगाच्या आदल्या दिवशीं नटनटी मुंबईत येणार होते. नाट्यमंडळाबद्दल नीरेला फारसें कुतूहल नव्हतें. तिकीटविक्रीच्या कामाची मात्र ती निकड करीत होती!

## प्रकरण २० वें

# वत्सलेची मेनका !

नाटकगृह प्रेक्षकांनीं अगदीं भरून गेलें होतें. लोकांना जागच्या-जागीं बसविण्याकरितां स्वयंसेवक तत्परतेनें नाटकगृहांतून फिरत होते. नीराही स्वतां खपविलेल्या तिकिटांची सोय करण्यांत गुंतली होती. तिच्याप्रमाणेंच इतरही स्वयंसेविका नाटकगृहांतील व्यवस्था राखण्याची दक्षता बाळगीत होत्या. ऐनवेळीं तिकिटें घेण्याकरितां येणाऱ्या हौशी लोकांची निराशा होत होती. नीरेसारख्या स्वयंसेविकांना गांठून तिकिटें मिळविण्याची खटपट करणाऱ्या कित्येक लोकांना तिला मोठ्या नाइलाजानें 'जागा नाहीं,' हें उत्तर द्यावें लागत होतें.

नीरा नेमून दिलेल्या कामाची व्यवस्था करण्याच्या नादांत असतांनाच कांहीं कॉलेजकुमारांनीं तिला गांठून आपल्याला कसेंही करून जागा देण्याबद्दल विनंति केली. पण कोणत्याही रांगेतील एकही जागा आतां रिकामी नव्हती. त्यामुळें नीरेनें 'नाहीं,' म्हणणें ओघानेंच आलें. तिच्या नाहीं म्हणण्यानें अर्थातच त्या कॉलेजकुमारांची फार निराशा झाली. आपल्या या निराशेवर उतारा म्हणूनच कीं काय, कांहींही कारण नसतां त्यांतल्या एकानें म्हटलें, "आम्ही तर त्या मिसेस पटवर्धनांना सांगून ठेवलें होतें !"

नीरेनें सहज अजाणतेपणानें विचारलें,

"कोण मिसेस पटवर्धन ?"

"त्या शिरीषकुमार पटवर्धनांच्या..."आणि वाक्य पुरे होण्यापूर्वीच त्या तिघाचौघांनीं विचित्र हास्य केलें.

ते कॉलेजकुमार निघून गेले, तरीही नीरेच्या अंतःकरणांत त्यांच्या त्या हास्याची विचित्र खोंच थैमान घालीत होती ! क्षणमात्रच तिच्या दृष्टीसमोरचें सारें नाटकगृह उलटेंपालटें फिरल्याचा तिला भास झाला ! तिचें मन एकदम चवताळून गेलें. तेवढ्या अवधींत तिला नाटकगृहाच्या व्यवस्थेबद्दल कुणीतरी कांहीं प्रश्न विचारला. त्याचें सरळ उत्तर तिला देतां आलें नाहीं. त्या प्रश्न विचारणाराच्या मागोमाग शिरीषकुमार होते. त्यांनीं हळूच विचारलें,

'नीरे, थोडंसं काम केलंस कीं लागलींच त्याचा कैफ आला वाटतं तुला ? त्या माणसानं तुला काय विचारलं तिकडं लक्ष न देण्याइतकी तूं बेभान कशानं झालीस ?'

या प्रश्नानें तर ती मनस्वी गोंधळून गेली. तिनें उत्तर दिलें, "सारखं दिवसभर उन्हांतून फिरल्यामुळं माझं डोकं अगदीं भणाणून गेलं आहे."

पण ती वेळ जास्त बोलत बसण्याची नव्हती. शिरीषकुमारही कांहीं पाहुणे मंडळीबरोबर बोलत बोलत तेथून निघून गेले.

नाटक सुरू व्हावयास दहापांच मिनिटांचा अवधी होता. नीरेच्या मनांतील मघांच्या तीव्र खेदाची तळमळ अद्याप विरलेली नव्हती. नाटकगृहाच्या आवारांतून झपाट्यानें बाहेर पडून जवळच्याच कोपऱ्यावरील एका इराण्याच्या दुकानांत जाऊन ती एका राखीव खोलींत जाऊन बसली. स्प्रिंगवर फिरणारें लाकडी दार उजव्या हातानें खेचून धरीत त्या दुकानांतला पोऱ्या तिच्यासमोर हुकमाची वाट पाहात कितीवेळ तरी उभा राहिला ! त्याच्याकडे न पाहातांच तिनें म्हटलें, 'पंखा चालो !' कांहीं खाद्यपेयांचा हुकूम होईल म्हणून त्यानें कांहीं वेळ वाट पाहिली. तरीही नीरेच्या तोंडून कसलाच उद्गार निघाला नाहीं. तो पोऱ्या मुकाट्यानें निघून गेला. आणि पंखा चालू झाला !

ती त्या ठिकाणीं कितीवेळ बसली होती तें तिचें तिलाच कळलें नाहीं. तिनें मनाला एकच प्रश्न अनेकदां विचारला, 'काय या चाहाटळपणाचा अर्थ ?' आणि त्याचें उत्तर शोधतां शोधतां तिचें मन आपल्या पूर्वायुष्याच्या साऱ्या मार्गाचा मोठ्या लगबगीनें प्रवास करून आलें. त्या धांवत्या प्रवासांत तिला त्याच त्या गोष्टी पुन्हां पुन्हां आढळून आल्या !

त्या साऱ्या गोष्टींच्या जाणीवेनें तिचें तिलाच आश्चर्य वाटलें, आणि मग तिनें आपली स्वतांचीच समजूत करण्याचा प्रयत्न करीत म्हटलें, " लोकांचा तर्क काय खोटा आहे ? आपल्या मनानें आजपर्यंत शिरीषकुमारांच्या साहचर्याचा अभिलाष बाळगला नाहीं कां ? शिरीषकुमारांच्या अनेक हालचालींच्या मागोमाग आपल्या मनानें धावपळ केली नाहीं कां ? त्यांचे निरनिराळ्या प्रसंगींचे उद्गार पुन्हां पुन्हां आठवण्यांत आपल्या अंतःकरणानें आनंद मानला नाहीं का ? त्यांच्या सुखस्पर्शाची जाणीव आपल्या मनांत एकसारखी घोळवीत ठेवण्याचा आपण अट्टाहास करीत नाहीं का ? आतांचेंच पहाना ! पूर्वस्मृतींच्या महासागरांत पाणबुड्यासारखी बुडी मारून आपल्या मनानें काय वेंचून आणलें ? मोत्यें ! कसली मोत्यें आहेत हीं ? सारीं मोत्यें म्हणजे शिरीषकुमारांच्या नामस्पर्शानें अंकित झालेल्या अनेक सुखदुःखाच्या आठवणी ! आईबाप, मैत्रिणी, शिक्षकिणी इत्यादींबद्दलच्या साऱ्या आठवणी म्हणजे केवळ शंख–शिंपलें ! पोरपणाच्या खेळाला कांहीं काळ ते उपयोगीं पडलें ! भातुकलीचा खेळ संपला आणि त्या शंखशिंपल्यांचा कारभार आटपला ! आयुष्यांतल्या खऱ्या खेळाला आरंभ केला, आणि या मोत्यांच्या माळा गुंफल्या ! या मोत्यांच्या माळा इतरांना दिसल्या तर त्यांत आपल्याला अभिमानच वाटला पाहिजे. त्या तशा दिसल्याशिवाय कशा राहातील ? "

याच विचारसरणीच्या अनुरोधानें तिच्या मनांत आलें कीं, 'ज्या लोकांनीं मघां फाजिलपणा केला त्यांना शिरीषकुमारांबद्दल असूया वाटत

असली पाहिजे. शिरीषकुमारांचा लौकिक, त्यांची विद्वत्ता, त्यांची लोकप्रियता यांतल्या कशाचाच वांटा या मूर्खांच्या नशिबी नाहीं. शिवाय कॉलेजांतल्या वातावरणांत स्वच्छंदीपणानें राहाणाऱ्या या तरुणांना एखाद्या सुंदर तरुणीनें आपल्यावर प्रेम करीत राहाण्याचा उन्मादक आनंदही प्रत्यक्षांत अनुभवितां येत नाहीं. आपल्याला या तरुणांनीं पुष्कळ वेळां पाहिलें असेल; त्यांना आपल्याबद्दलची अभिलाषबुद्धि वाटली असली पाहिजे ! पण ती अभिलाषा सरळ मार्गांनीं तृप्त करण्याइतकें सद्गुणांचें आकर्षण त्यांच्यामध्यें नाहीं. वाईट मार्गांनीं ती तृप्त करून घेण्याइतका त्यांचा स्वभाव साहसी नाहीं. अशा स्थितींत ही अतृप्तता हे लोक असल्या उद्गारांच्या आनंदावरच भागवून घेत असले पाहिजेत ! मघां त्यांची दृष्टि आपल्यावर किती विचित्र तऱ्हेनें खिळलेली होती. त्या डोळ्यांत नुसती भूकच नव्हती तर परमावधीच्या अधाशीपणाचा हव्यास होता ! हा त्यांचा हव्यास आपल्या दर्शनानें जागृत झाला ! आपलें दर्शन !.........'

स्वतःच्या सुंदर आकृतीबद्दलचे विचार मनांत आल्याबरोबर तिनें समोरच्या आरशांत पाहिलें. स्वतःच्याच प्रतिबिंबाचा तिला विलक्षण मोह वाटला. आज अनेक लोकांच्या दृष्टीस पडावयाचें असल्याकारणानें तिनें आपली वेषभूषा साहजिकच विशेष काळजीपूर्वक केली होती. सोनसळी रेशमी पातळ आणि अस्मानी ब्लाऊझ या दोहोंची रंगसंगति आरशांतल्या प्रतिबिंबांत विशेष खुलून दिसत होती. तिचा मूळचाच गौरवर्ण होता. पण आज तिनें मुखभूषेची विशेष दक्षता राखली होती. विविध लेपनांच्या मिश्रणानें मुखाची कांति जशी खुलून गेली होती तशीच त्या लेपनांच्या अनेक सूक्ष्म गंधांच्या मिश्रणानें वृत्तीला येणारी प्रसन्नताही तिच्या चर्येवर प्रतिबिंबित झाली होती. मस्तकाच्या पुढल्या भागावरील काजळी कुरळे केस जणूं त्या उन्मादक वासांच्या मोहानें कपाळावर झेंपावत होते ! अग्रभागीं खालीं वळलेलें नाक मुखलेपनाच्या वासांचें अघ्राण करण्याकरितां किंचित् विस्फारित झाल्यासारखें वाटत होतें ! आणि

रात्रींच्यावेळची त्या दुकानांतील रोषणाई या सौंदर्याचें वैभव शतगुणित करीत होता. मुखलेपनाच्या वासाच्या निमित्तानें आपल्या सौंदर्याचा दरवळ वातावरणांत पसरत असल्याचा तिला भास झाला. ती आपल्या प्रतिबिंबाकडे रोखून पाहात होती. तें तिला केवळ सुंदरच वाटलें असें नाहीं, तर उन्मादक वाटलें! क्षणमात्रच तिच्या मनांत एक विलक्षण कल्पना येऊन गेली. तिला वाटलें, 'यावेळीं आपण पुरुष असतों तर अतृप्तपणानें या कांतिकडे पाहात राहिलों असतों, त्या हिमगौर शरीराच्या गाढ आलिंगनासाठीं परमावधीची उत्कंठा बाळगली असती, त्या अवखळ कुरळया केसांना बोटांच्या नाजुक पकडीनें थोपवून धरून साफ बजावलें असतें कीं, मर्यादाभंग करून हें सुवासित सौंदर्य अतृप्तपणानें अनुभवण्याचा तुमचा हा निर्लज्जपणा निदान माझ्या देखत तरी चालावयाचा नाहीं! आणि शिरीषकुसुमाहूनही नाजुक असलेलें तें ओष्ठसंपुट.......... '

पण त्या कल्पनेनें तिची तीच लाजली! तिनें आपल्या ओंठावरून चटकन् जीभ फिरविली आणि तेथली विजेची घंटा दाबली. पोऱ्या दिसल्याबरोबर तिनें कसलेंसें पेय मागविलें, आणि समोरच्या प्रतिबिंबाकडे पाहात ती तें पेय संथपणानें पुष्कळवेळ पीत राहिली. जणूं त्या गोड पेयाच्या प्रत्येक घोटाबरोबर आपण स्वतां काय आहों याचा त्या समोरच्या प्रतिबिंबाच्या साहाय्यानें तिला अनुभव येत होता! आणि असल्या अनुभवांत ती अधिकाधिक तल्लीन होत गेली. तिच्या साऱ्या वृत्ती प्रसन्न झाल्या. आणि त्या दुकानांतून उठून ती नाटकगृहांत गेली. नायिका गाणें म्हणत होती. 'माधवजूलियन' कवींचें 'संगमोत्सुक डोह' हें भावगीत त्या नाटकांत मुद्दाम घालण्यांत आलें होतें. नायिका तन्मयतेनें गाणें म्हणत होती. सारा श्रोतृसमाज डोळयांत अश्रु आणून तें गाणें ऐकत होता. गाण्याबरोबर फिडलच्या तारा आर्तस्वरानें साथ करीत होत्या! सारें नाटकगृह चित्रांत रेखलेल्या सभागृहासारखें स्तब्ध होतें. नायिका म्हणत होती—

**खाऊन रवीचा प्रखर ताप,**
**कष्टून, लागून जीवाला धाप,**

प्रदोषसमयीं येती
क्षणैक विसावा घेतीं,
घरास वळतीं माणसें गुरें;
अन् माझें अन्तर निःशब्द झुरें.

त्या तटस्थ प्रेक्षागारांत शिरल्यावर नीरेच्या मनावरही तेथील गांभीर्याचा परिणाम झाला. स्वत:साठीं राखून ठेवलेल्या जागेवर ती बसली. व तिनें रंगभूमीकडे विशेष बारकाईनें लक्ष पुरविण्याकरितां मन एकाग्र केलें. मात्र रंगभूमीकडे पाहिल्यावर तिच्या मनाला विलक्षण आश्चर्य वाटलें !

कारण गाणें म्हणत असलेली रंगभूमीवरील नायिका तिची बाल-मैत्रीण वत्सला होती ! तिला वत्सलेची ओळख पटावयास फार वेळ लागला नाहीं. आपल्या जुन्या मैत्रिणीची अशा आकस्मिकरीतीनें एकदम ओळख पटल्यावर तिच्या मनाची एकाग्रता पार कोठच्याकोठें निघून गेली ! वत्सलेच्या निमित्तानें तिनें आपल्या पूर्वायुष्याचा पुन्हां एकदां मनानें प्रवास केला.

कितीतरी वर्षांपूर्वीच्या गोष्टी ! पण त्या तिला अगदीं काल घडल्यासारख्या भासूं लागल्या. मराठी शाळेपासून वत्सला तिच्याबरोबर होती. शनिवार रविवारच्या सुट्टीच्या दिवशीं एकत्र जमून नेहमीं कसले ना कसले खेळ खेळण्यांत त्यांचें बालपण अगदीं एकमेकींच्या निकट सहवासांत गेलें होतें. वत्सलेचे वडील एक मराठी शाळामास्तर होते. त्यामुळें नीरा आणि प्रमिला यांच्या मानानें वत्सलेची घरची फार गरिबी होती. तिच्या वडिलांना गांवांतले सारे लोक ‘ देवमाणूस ’ म्हणत. आणि तिचे वडील या पदवीला अगदीं योग्य होते. त्यांचा जीवनक्रम अगदीं सरळमार्गी होता. सकाळच्या प्रहरीं अनेक ओळखीच्या मुलांमुलींना आपल्या घरीं जमवून पाढे, आणि अक्षर शिकविण्याचा त्यांचा शिरस्ता होता. त्यानंतर अकरा ते पांच शाळा ! संध्याकाळीं घराजवळच असलेल्या एका तालमींत जाऊन शारीरिक

व्यायाम करून दिवेलागणीला घरीं परत यावयाचें. जेवण्याची वेळ होई-पर्यंत वाड्यांतील लहान बालगोपालांना एकत्र जमवून मनोरंजक गोष्टी सांगावयाच्या आणि त्या मुलांनाही निरनिराळ्या गोष्टी सांगावयास लावा-वयाच्या, हा त्यांचा ठराविक दिनक्रम असे. स्वत: शाळामास्तर आणि गरीब असूनही ते कधीं कुणाचे मिंधे राहिले नाहींत. आसपासच्या साऱ्या लोकांना उपयोगीं पडण्यासबंधांत मास्तरांचा पाय नेहमीं पुढें असावयाचा! असल्या उपयोगीं पडण्याबद्दल त्यांनीं कधींही मोबदल्याची अपेक्षा केली नाहीं. उभयतां पतिपत्नी आपला प्रपंच अतिदक्षतेने करीत असत. सहज बघणाराला त्यांच्या संसारांत कधीं चणचण दिसली नाहीं. मास्त-रांना फुलझाडांचा फार नाद. आसपासच्या अनेक ओळखीच्या सुखवस्तु लोकांच्या घरांतील बागतून ठिकठिकाचीं फुलझाडे आणून मुद्दाम लावावयाचीं, व त्यांच्या बागांची मशागत करणाऱ्या माळयाला, निर-निराळीं रोपें कशी वाढवावयाची इत्यादि सारी माहिती मास्तर फार तत्परतेनें पुरवावयाचे! सुटीच्या दिवशीं किंवा कधीं कधीं पहाटें मास्त-रांच्या घरांतून गाण्याचें गुणगुणणें ऐकूं येत असे. त्यांचें गाणें मोठ्यानें व्हावयाचें तें फक्त एखाद्या भोजनप्रसंगीं पंक्तींत श्लोक म्हणण्याच्या निमित्तानें! एरवीं आसपासच्या लोकांना आपला त्रास होईल म्हणून ते कधींही मोठ्यानें गाणें गात नसत.

वत्सला मास्तरांची एकुलती एक मुलगी होती. तिचे लाड मात्र आईबापांनीं अगदीं श्रीमंताच्या मुलीसारखे केले. नीरा किंवा प्रमिला यांच्या बरोबरीनें हिंडल्याफिरल्याकारणानें कित्येकवेळा वत्सला लहानपणीं महाग जिनसांकरितां हट्ट धरीत असे. त्यावेळीं कधींही त्रागा न करतां मास्तरांनीं तिचे सारे हट्ट पुरविले होते. वत्सलेच्या घरी खेळण्याकरितां साऱ्या मुली कधीं कधीं जमत. त्यावेळीं मुलींना मास्तरांच्या शांत स्वभावाचें फार आश्चर्य वाटे. कारण प्रत्येकीचा आपल्या स्वतांच्या घरचा अनुभव अगदीं वेगळा असे. त्यामुळें वत्सलेच्या घरीं आपण कितीही

दंगा केला तरी तिचे वडील एका शब्दानेंही कधीं रागावत नाहींत याचें साऱ्याच मुलींना फार आश्चर्य वाटे !

नीरा आणि प्रमिला यांच्या बरोबरीनें वत्सलेचा सारा शिक्षणक्रम व्हावा ही मास्तरांची फार मोठी महत्त्वाकांक्षा होती. वत्सलेला त्यांनीं गायनाच्या वर्गांत पाठविलें, व्यायामशाळेंत घातलें आणि मुलींच्या शाळेंत तिचें नांव नोंदवून तिचें शिक्षण मोठ्या दक्षतेनें चालू केलें. लहानपणीं नीरा लाहोर अमृतसरकडे गेली आणि गाण्याच्या चढाओढींतलें बक्षीस मिळवून आली त्यावेळीं वत्सलेला पाठविण्याची मास्तरांनीं सारी योजना केली होती. पण वत्सला ऐनवेळीं आजारी पडल्यानें तिला नीरेबरोबर जाणें शक्य झालें नाहीं. नीरा बक्षीस मिळवून परत आल्यावर मास्तरांनीं आपल्या घरीं नीरेला फराळाकरितां बोलवून तिची मुक्तमनानें स्तुति केली.

वत्सलेला नीरेनें प्रथम पाहिलें तो दिवसही नीरेला नेहमीं स्पष्टपणानें आठवत असे. हुजूरपागेंतील प्राथमिक शाळेंत त्यावेळीं नीरा मराठी दुसरींत होती. नेहमींप्रमाणें वर्ग चालू झाले होते. त्यावेळचे प्रसिद्ध गोगटे मास्तर नीरेच्या वर्गावर शिकवावयास असत. त्या दिवशीं वर्गांत भाषाविषयाचा तास चालू असतांना एक मुलगी नवीन प्रवेशपत्रिका हातीं घेऊन वर्गाच्या दाराशीं आली. तिचे डोळे तेजस्वी म्हणजे विलक्षणच तेजस्वी होते, आणि चेहऱ्याच्या किंचित् श्यामवर्णामुळें ते डोळे सहजच आकर्षक भासत होते. काय असेल तें असो, पण त्या मुलीनें वर्गांत प्रवेश केल्यापासून साऱ्या मुली तिच्याकडे एकसारख्या वळून पाहात होत्या. शेवटीं मास्तरांनीं आपली फुटपट्टी टेबलावर आपटून सर्वांना रागें भरून पाठाकडे लक्ष देण्यास सांगितलें तेव्हां साऱ्या जणींनीं आपली दृष्टी मारूनमुटकून पाठ्य विषयावर लावली. ही तेजस्वी डोळयांची मुलगी म्हणजेच वत्सला ! त्या पहिल्या दिवसापासूनच नीरेला तिच्याबद्दल एकदम जिव्हाळा वाटूं लागला. पहिल्याच दिवशीं संध्याकाळीं शाळा

सुटल्यावर नीरेनें तिला आपल्या गाडींत बसून चलण्याविषयीं किती आग्रह केला ! पण वत्सलेनें तो आग्रह तितकासा मानला नाहीं. नीरेला त्याबद्दल वाईट वाटलें तरी दुसऱ्या दिवशीं मधल्या सुट्टींत थोडावेळ तिला गांठून तिनें तिच्या घरचीं हकिकत समजावून घेतली. आणि त्या दिवसापासून त्या दोघींचें संघटन एकसारखें वाढतच गेलें !

मास्तरांनीं वत्सलेला शिकविण्याची किंबहुना पदवीधर करण्याची पराकाष्टा चालविली होती. पण मध्यंतरी इन्फ्लुएंझाची सांथ आली आणि तिनें मास्तरांचा बळी घतला. ती सांथ महाराष्ट्रांत सर्वत्र पसरली होती. त्या सांथीचा प्रतिकार करण्याचें उपाय त्यावेळीं लोकांना माहित नव्हते. आणि ते उपाय अमलांत आणण्याइतका अवसरही लोकांना लाभला नाहीं. या नवीन सांथीला दिवसाकांठी शेंकडों लोक बळी पडत होते, आणि समाज या हाहाःकाराकडे नुसता आश्चर्यानें पाहात होता !

वडिलांच्या मृत्यूनें वत्सलेचा सारा आयुष्यक्रम पार पालटला. तिची खेळकर आणि अल्लड वृत्ति एकदम नाहींशी झाली. तिच्या चेहऱ्या-वरच्या निरागस माधुर्यात कारुण्याची अशी कांहीं एक विचित्र छटा भरून गेली कीं, पाहाणाराला प्रथमदर्शनीं त्या कारुण्याचाच बोध होत असे ! वडिलांच्या मृत्यूनंतर ती कांहीं दिवसच फक्त शाळेंत आली. त्यानंतर तिनें शाळा सोडली; आणि पुन्हां कांहीं दिवसांनीं एकदां शाळेंत अक-स्मात् येऊन तिनें आपल्या लग्नाचें आमंत्रण साऱ्या मैत्रिणींना दिलें. तें आमंत्रण देतांना ती जितकी लाजली होती तितकीच दुःखी झाली होती. मुद्दामच मधल्या सुट्टीच्या बेतानें ती शाळेंत गेली होती. सर्व मैत्रिणींना तिनें आपल्या लग्नाची बातमी दिली, तेव्हां तिला मुलींनीं निरनिराळे प्रश्न विचारून अगदीं भंडावून सोडलें. वत्सला साऱ्यांचीच फार आवडती होती. एका मुलीनें तिला अगदीं जिव्हाळयानें विचारलें, 'अन् मग वत्सले, तूं पुढं शिकणार नाहींस कां ?' त्या मुलीकडे आपल्या कारुण्यपूर्ण तेजस्वी डोळ्यांनीं वत्सलेनें रोखून पाहिलें, आणि घळघळां आंसवें गाळलीं !

वत्सला लग्न होऊन सासरीं गेल्यावर आरंभीं आरंभीं माहेरीं वरचे-वर येत असे, पण पुढें पुढें तिचें माहेरीं येणें कमी झालें, आणि त्यामुळें नीरा व प्रमिला यांच्याशीं तिचें प्रत्यक्ष संघटन राहूं शकलें नाहीं. कधीं-मधीं पत्रव्यवहारानें काय जो मनें उघड करून सांगण्याचा प्रकार घडे तेवढाच ! नीरा आणि प्रमिला कॉलेजांत जाऊं लागल्यावर वत्सला एकदां पुण्यास आली होती. त्या दोघींच्या आग्रहावरून ती त्यांच्याबरोबर त्या दिवशीं कॉलेजांत गेली होती, त्यावेळीं वर्गातल्या कांहीं मुलांनीं मुली वर्गांत शिरतांना वत्सलेला उद्देशून 'या आईसाहेब !' म्हणून जी तिची मर्मभेदक चेष्टा केली, त्यामुळें ती विषण्ण झाली. त्या प्रसंगाचा वत्सलेनें आपल्या मनावर विचित्र परिणाम करून घेतला. आपण आणि आपल्या बालमैत्रिणी यांच्यामध्यें शिक्षणाचें, संस्कारांचें, आणि सामाजिक विचार-प्रवाहांचें फार मोठें अंतर पडलें आहे अशी तिनें जाणीव करून घेतली. त्यामुळें त्या मुक्कामांत नीरा व प्रमिला यांच्याबरोबर फिरण्याचा ती फार संकोच बाळगूं लागली.

वत्सलेचें सासर बऱ्यापैकीं आहे, अशी पुण्यांतल्या तिच्या साऱ्या मैत्रिणींची समजूत होती. तिचा नवरा चांगला शिकलेला होता. पण नोकरी करण्यापेक्षां स्वतंत्र व्यवसाय करण्याची त्याची महत्त्वाकांक्षा होती, असें वत्सलेनेंच आपल्या मैत्रिणींना आरंभी आरंभीं सांगितलें होतें. तिचा नवरा एकदम श्रीमंत होण्याच्या आशेनें लग्नानंतर लागलीच मुंबईस गेला होता. पांच सहा महिने स्वतंत्र व्यवसाय करून तो परत आला. आपली आशा सफल न झाल्याचीं चिन्हें लोकांना स्पष्ट दिसावींत अशा बेतानेंच तो परत आला होता. त्यानंतर इमारतींचा कॉंट्रॅक्टर, स्टेशनरी व किराणा मालाच्या दुकानांचा भागीदार, सोन्याचांदीच्या दुकानाचा मुनीम, आणि विमा एजंट असे निरनिराळे व्यवसाय तो एकामागून एक करीत गेल्याचेंही लोकांच्या ऐकिवांत होतें ! अलीकडे कितीतरी वर्षांत वत्सलेची प्रत्यक्ष गांठ पडली नव्हती, त्यामुळें तिचा संसार कसा काय

चालला आहे, याचें ज्ञान तिच्या मैत्रिणींना जवळ जवळ मुळींच नव्हतें म्हटलें तरी चालेल.

जुन्या चालीच्या प्रपंचांत मुरून गेलेली वत्सला, अशा रीतीनें रंग-भूमीवरील एका नाटकांत नायिका म्हणून दिसेल, अशी नीरेची कल्पना नव्हती. अजूनही तिचा त्यावर विश्वास बसत नव्हता. वत्सलेच्या अभिनयांत, भाषणांत आणि शरीरसौष्ठवांत इतका आधुनिकपणा भरून राहिला होता कीं, तिच्या पूर्वायुष्याशीं या साऱ्या गोष्टींचा मेळ घालणें कुणाही माहीत-गाराला मोठ्या मुष्कीलीचें वाटलें असतें! नाहीं म्हणावयास तिचे डोळे पूर्वीच्या वत्सलेची चटकन् ओळख पटवून देत होते. 'संगमोत्सुक डोह' हें भावगीत संपल्यावर नायिकेनें स्तब्धपणानें 'शून्यां'त पाहात राहावें अशी नाटककाराची बहुधा सूचना असावी! कारण त्या गाण्याच्या शेवटच्या स्वराची आर्त लकेर उंच उंच नेत क्षीण करून जेव्हां ती आपल्या तेजस्वी डोळयांनीं क्षितिजाकडे पाहिल्याचा अभिनय करूं लागली तेव्हां ती अगदीं निश्चल आणि स्तब्ध होती. मात्र तिच्या दृष्टींत नुकत्याच विरलेल्या दुःखपूर्ण सुरांची आर्तता भरून राहिली होती.

त्या डोळयांवरून नीरेनें वत्सलेची ओळख पटवून घेतली. पहिल्या अंकाचा पडदा पडल्यावरोबर लगबगीनें ती नेपथ्यगृहाकडे गेली. आंत शिरून तिनें वत्सलेच्या खोलीपर्यंतचा मार्गही संपविला, आणि आतां ती तिचें दार उघडून आंत डोकावून पाहाणार इतक्यांत वत्सलेनेंच दार उघडलें आणि नीरेला पाहून तिनें अगदीं क्षीण स्मित केलें. वत्सलेचे डोळे अश्रूंनीं भरलेले होते. तोंड म्लान झालें होतें. नीरा जवळ गेल्याबरोबर तिनें गद्गद स्वरानें तिला हांक मारली, आणि तिच्या खांद्यावर मान टाकून हुंदका दिला. "वत्सले, असं काय करतेस वेडयासारखं! तुझं काम सर्व प्रेक्षकांना किती आवडलं आहे त्याची कल्पना आहे कां तुला?"

"न आवडायला काय झालं? वेश्येचा शृंगार, पाहाणाराला तात्पु-रती भुरळ नाहीं का पडत. ? वेश्या शृंगाराचं नाटक करते. मी या विरह-

व्याकुळतेचा अभिनय केला. नाटकगृहांतले लोक 'क्षणैक विसावा घेती,' या जातीचे! त्यांना नाटकगृहांतला अभिनय रडवूं शकतो. पण व्यवहारांतला प्रत्यक्ष अभिनय त्यांच्यावर कांहीचाही परिणाम करूं शकत नाहीं! नीरे, किती अचानक आणि विचित्र ठिकाणीं आपली भेट झाली ही? पण स्वस्थपणानं बोलायला इथं फुरसत नाहीं. मला पुढल्या अंकांतल्या अभिनयाची पुन्हां तयारी करायला हवी! आतां इतक्यांत घंटा होईल. पण नीरे, नाटक संपल्यावर मला नक्की भेटशील? आपण दोघी मग माझ्याच खोलींत जाऊं. तुझ्याशीं मला खूप बोलायचं आहे. किती बदलली आहेस तूं! मला तर वाटतं, माझ्याऐवजीं तूं अशीच्या अशी रंगभूमीवर गेलीस तर नाटकाला जास्त रंग येईल."

पण जास्त बोलत राहाण्याची ती वेळ नव्हती. नाटक संपल्यावर भेटण्याकरितां नीरेला वरचेवर बजावून वत्सलेनें तिचा तात्पुरता निरोप घेतला, आणि आपल्या प्रसाधनक्रियेला घाईघाईनें आरंभ केला!

× × ×

नाटक चालूं असतांनाच मध्यंतरी शिरीषकुमारांना बाजूला गांठून नीरेनें आपण नाटक संपल्यावर वत्सलेबरोबर जाणार असल्याचें सांगितलें. आणि मग नाटक संपल्यावर त्या दोघीजणी मिळून मोटरींत बसून वत्सलेच्या बिऱ्हाडीं आल्या.

लॅमिंग्टन रोडवरील एका सहा मजली इमारतीच्या अगदीं वरच्या मजल्यावर वत्सलेची जागा होती. नटींच्या प्रसाधनक्रियेला आणि रुबाबाला शोभून दिसण्यासारखाच त्या जागेचा शृंगार होता! थोडक्यांत म्हणजे रंगभूमी आणि ती जागा यांच्यामध्यें कोणताच भेद करतां आला नसता. खोलींत पाऊल टाकल्याबरोबर वत्सलेनें विजेच्या दिव्यांचीं बटनें दाबलीं, त्याबरोबर खोलींत चित्रविचित्र रंगांची मंद प्रकाशकिरणें भरून राहिलीं. खोलीभर पसरलेल्या मऊ गालिच्यावर उंची आसनें मांड-

केलीं होतीं. त्या आसनांचा शरीराला होणारा स्पर्श हा इतका सुखकारक होता कीं तीं आसनें आपल्या शरीरापासून अलग होऊं नयेत असेंच बसणाराला वाटावें !

एका आसनावर बसून त्या आसनाच्या हिंदकळ्यानें शरीराला मृदु हेलकावे घेत वत्सलेनें नीरेला म्हटलें,

" पाहिलंस, मी किती श्रीमंत झाले आहें तीं ! सातां जन्मांचं दारिद्र्य मी नाहींसं करून टाकलं असं वाटल्याशिवाय राह्यचं नाहीं, इतकं ऐश्वर्य मी मिळविलं आहे. "

' खरंच, तुझा हा बदल पाहिला म्हणजे शकुंतलेला उचलून नेऊन मेनकेनें जसं तिला मारीचाच्या आश्रमांतल्या सुखमय वातावरणांत ठेवलं त्याची आठवण होते. तसल्या एकाद्या अदृश्य मेनकेन तुला गरीबपणांतून आणि जुन्या जगांतून अचानक उचलून या जगांत एकदम आणून ठेवलं असावं, असा हा प्रकार पाहून भास होतो." नीरेनें उत्तर केलें. 'हो, माझ्याही आयुष्यांत मेनका अवतीर्ण झाली होती !' या वत्सलेच्या प्रत्युत्तराचें नीरेला फार आश्चर्य वाटलें.

पण तिला असें फार वेळ आश्चर्य करीत बसण्याचें कारण पडलें नाहीं. वत्सलेनें आपण होऊनच तिला म्हटलें, 'हेंच तर सांगण्याकरितां मी तुला मुद्दाम इथें आणलें. कांहींतरी अतिमानुष प्रकार होऊन एकादी यक्षिणीची कांडी फिरल्याप्रमाणें माझ्या आयुष्यांत बदल झाला आहे असें जें तुला वाटतें आहे, तें अगदीं चुकीचं आहे, असं तुला आढळून आल्याशिवाय राहणार नाहीं. बाकी वरवर पाहाणाराला असं वाटणं अगदीं साहजिक आहे. कारण अतिशय बाल्बोध राहाणीनें वागणाऱ्या एका शाळामास्तराची मी मुलगी ! फारसं शिक्षण न होतां माझं लग्न झालेलं. लग्न झालं तेंही एका बाळबोध घराण्यांत. तेव्हां अशा मुलीनें रंगभूमीवर धंदेवाईक काम करण्यापर्यंत मजल मारावी ही गोष्ट आश्चर्यकारक नाहीं

असं कोण म्हणेल ? पण असलं आश्चर्य करणारांनीं माझ्या लग्नापासून रंगभूमीवरील माझ्या प्रवेशापर्यंतचं सारं आख्यान एकदां नीट ऐकावं अशी माझी फार फार इच्छा आहे. तूं मला मघां रस्त्यानं येतांयेतां सांगितलंस कीं, तूं इथल्या एका अनाथालयांत व्यवस्थापिकेची नोकरी धरली आहेस म्हणून. तसं तूं सांगितल्याबरोबर माझ्या मनांत कल्पना येऊन गेली कीं, आमची मराठी रंगभूमी ही सुद्धा एक अनाथालयच आहे. ज्यांना कुठें कांहीं सन्मानानं जगण्याचा समाजमान्य मार्ग सांपडत नाहीं, त्यांना या अनाथालयांत यावं लागतं ! तुमच्या अनाथालयांत तुम्ही काय शिकवतां ? हस्तव्यवसाय करून समाजांत आदरणीय मार्गानं पोट भरतां यावं असलंच कांहीं शिकवतां ना ? आमच्या अनाथालयांतही आम्हाला शिक्षण मिळतं. चोवीस तास एकसारखा खोटा अभिनय करीत राहाण्याचं हें शिक्षण असतं. आमच्या चेहऱ्यांचे खरे रंग जसे आम्ही पालटतों तसे अंतःकरणाचेही खरे रंग पार बदलून आम्ही वागायला शिकतों. समाज मात्र आमच्यासंबंधानं कल्पना करीतच असतो कीं, आम्हाला नीति—अनीतीची चाड नाहीं, सत्यासत्याचा विधिनिषेध नाहीं, सर्वसामान्य सुखदुःखाची जाणीव नाहीं ! आमचं आयुष्य म्हणजे एकजात विलासांनीं माखलेलं असतं अशी या लोकांची समजूत असते. आणि हे लोक कोण ? तर समाजाची धारणा करणारे वकील, शिक्षक, संपादक आणि सारे संभावित लोक ! यांच्यापैकीं आमच्याकडे येणाऱ्या शेंकडा नव्वद लोकांना आमच्याकडे कामुक दृष्टीनं पाहिल्याशिवाय चैन पडत नाहीं. कुलीन नटी रंगभूमीवर आल्याबद्दल त्यांचं तोंड भरून जाहीर अभिनंदन करणारे हे लोकच आम्हांला अकुलीन बनविण्याकरितां केव्हां संधि सांपडेल त्याची वाट पाहात असतात. आम्ही अकुलीन बनण्याच्या कामीं यांचं आम्हांला होणारं साहाय्य हें मात्र अगदीं खरंखुरं सक्रीय असतं ! परवांचं कुठल्यातरी मासिकांत एका इंग्रजी गोष्टीचं एक भाषांतर मीं वाचलं होतं तें मला फार आवडलं.

तू सुद्धां ती गोष्ट वाचली असशील ! एकदां दोन धर्मोपदेशक आणि त्यांचे दोन स्नेही सहज नौकाविहार करतां करतां एका बेटावर उतरले, आणि त्यांनीं इकडेतिकडे थोडासा शोध घेऊन एका मध्यमशा खानावळींत आपली उतरण्याची सोय केली. दिवसभर त्या बेटावर फिरून, ते धर्मोपदेशक व त्यांचे ते गृहस्थपेशाचे स्नेही खानावळींत परत आले. दुसऱ्या मजल्यावर त्यांना जागा मिळाली होती. रात्रीचीं जेवणं होऊन निजण्याची वेळ झाली. त्या धर्मोपदेशकांनीं गंभीर आवाजानें प्रार्थना म्हटली आणि दुसऱ्या दोघांनीं स्तब्धपणानें डोळे मिटून ती प्रार्थना ऐकली. एकमेकांचा निरोप घेऊन ते आपल्या शय्येवर अंग टाकणार इतक्यांत त्या खानावळीच्या तिसऱ्या मजल्यावरून विलासी गाण्यांचे सूर उठूं लागले. हास्यकल्लोळांचे ध्वनी, मद्यपानांचा आवाज आणि बीभत्स गाण्यांचा कडाखा यांचा भर एकसारखा वाढत चालला. त्या बेटांत दुसरी खानावळही नव्हती. त्यामुळें ते सारे प्रकार ऐकत त्यांना ती रात्र काढावी लागली. दुसऱ्या दिवशीं रात्रीं पुन्हां तोच प्रकार सुरू झाला ! तेव्हां एक धर्मोपदेशक माडीवर गेला. त्यानें त्या रूपयौवनसंपन्न वेश्येची गांठ घेतली, आणि तिला एकांतांत भेटण्याची आपली इच्छा दर्शविली. तिनें ताबडतोब त्याला एका खोलींत नेलें. तेथें त्या धर्मोपदेशकानें अगदीं गंभीरपणानें तिला नीतीचा महिमा पटवून देण्याचा प्रयत्न केला. ' रोज माझ्या या उपदेशाची आठवण करीत जा,' असें तिला सांगून तो खालीं आला. तिसऱ्या दिवशीं या मंडळींपैकीं गृहस्थपेशाचे म्हणून जे लोक सांगितले, ते या धर्मोपदेशकांना न कळत मुकाट्यानें माडीवर गेले. त्यांचें मन वळविण्याकरितां कालचाच धर्मोपदेशक वर गेला, आणि त्यानें त्यांच्या मनावर नीतीचा महिमा ठसवला ! दुसऱ्यादिवशीं त्या दोघांनाही त्या धर्मोपदेशकांनीं बोटीनें आपल्या जाग्यावर पाठवून दिलें. ते गेल्यावर हे दोन धर्मोपदेशक तेथें राहिले. आठदहा दिवस त्याच त्या गोष्टी कानावर पडत गेल्याकारणानें पूर्वी दोनदां वर जाऊन आलेल्या धर्मोपदेशकाचीं पावलें जिन्याकडे वळलीं. दुसऱ्या दोस्तानें त्याला थोपविलें, तेव्हां

त्यानें उत्तर केलें, ' मी त्या स्त्रीला सन्मार्गावर आणण्याचा पुन्हां एकदां प्रयत्न करणार आहे.' तो वर गेला. पुष्कळवेळानें तो खालीं येऊं लागला. त्यावेळी जिन्याच्या तोंडाशीं त्याला घालविण्याकरितां आलेली ती वेश्या मर्मभेदकपणानें मोठमाठ्यानें हसत होती. खालीं असलेल्या दोस्तानें कानोसा घेतला, त्यावेळीं ती मोठ्यानें म्हणत होती, ' मूर्खा, ज्या जागीं तू मला नीतीचे पाठ शिकविण्याचा प्रयत्न केलास, त्याच जागीं आपला स्वतःचा अधःपात करून घेतलास!' हो, पण मी तुला असल्या गोष्टी काय सांगत बसलें. एखादे वेळीं तूं म्हणशील कीं, या असल्या गोष्टी सांगायला कां तूं मला इतक्या अपरात्रीं इथं आणलंस? पण मला राहावत नाहीं. डोकं अगदीं विचारांनीं भडकून जातं."

कांहीं वेळ थांबून वत्सला जागची उठली, पलीकडच्या खोलींत गेली आणि तिच्या तैनातीकरितां मुद्दाम कंपनींत राहिलेल्या म्हाताऱ्या आचाऱ्याला उठवून, त्याला कॉफी करण्यास सांगून परत आली.

नीरेशेजारीं बसत तिनें म्हटलें, "नीरे, किती दिवस तुझ्यासारख्या जिवाभावाच्या बालमैत्रिणीच्या भेटीची मी वाट पाहातें आहें. आज अशी अचानक गांठ पडली. आनंद झाला मला! आतां सुंदर कॉफी पिऊन आपण आपली ही आकस्मिक भेट साजरी करूं हं."

"पण तूं मला इथं आणलंस तें कॉफी पिण्याकरितां......"

नीरेचें हें वाक्य पुरें होण्यापूर्वींच वत्सलेनें चटकन् उत्तर केलें, "कॉफीबरोबर माझी सारी माहिती पाजण्याकरितांही आणलं! तेंच मी तुला सारं सांगणार आहें. लग्नानंतर आरंभीं आरंभीं मी पुण्यास माहेरपणाकरितां येत असें. तेव्हां मी सासरकडची जी हकिकत सांगत असें त्याची तुला आठवण असेल!"

'हो. आम्हाला त्यावेळीं खरोखर असं वाटत होतं कीं, कॉंट्रॅक्टर म्हणून किंवा किराणा मालाच्या दुकानाचे भागीदार म्हणून तुझे पति

दिवसेंदिवस श्रीमंत होणार. आपल्या समाजांत स्वतंत्र धंदा सहसा शिकलेले लोक करीत नाहींत. तेव्हां आम्हाला उलट तुझ्या पतींचं नेहमीं नेहमीं कौतुक वाटत असे. ''

'कौतुक वाटण्यासारखीच कामगिरी त्यांनीं सुरुवातीला केली हें कांहीं खोटं नाहीं. त्यांच्या हातीं जो पैसा असे त्याचा, संसार अधिकाधिक सुंदर बनविण्याच्या कामीं ते उपयोग करीत. पुढें सोन्याचांदीच्या दुकानांत मुनीम म्हणून कामावर असतांना अनेक वेळां फिरतीवर जाण्याचे प्रसंग येत. हे एकटेच महिनेचेमहिने घरापासून दूर असत. त्यांच्या सोन्याचांदीच्या महाग जिनसांना अनेक श्रीमंत गिऱ्हाइकें मिळत. त्या गिऱ्हाइकांत घरंदाज बायकांप्रमाणेंच वारयोषिताही असत. मला या गोष्टी अर्थातच मागाहून कळल्या. असल्या बायकांकडे वरचेवर जाण्याचे अनिष्ट परिणाम होऊं लागले होते, त्याचाही मला खरं म्हणजे त्यावेळीं पत्ता नव्हता. या बायकांसारखा खोटा अभिनय करायला मी शिकलें नव्हतें, म्हणून त्यावेळीं मी त्यांना आवडेनाशी झालें. एकदां एका पत्राच्या निमित्तानें मला या साऱ्या गोष्टी कळल्या. किती झालं तरी मी हिंदु पत्नी होतें. मला जास्त काय करतां येणार होतं ? मी रडलें, उपास काढले, त्रागा केला, अबोला धरला ! यांतल्या कोणत्याच गोष्टीचा त्यांच्यावर फारसा परिणाम झाला नाहीं. ते माझ्यापासून दूर होत होते, त्याची मला तीव्रपणानें जाणीव होत होती. पण जाणीव करून घेण्यापलीकडं माझ्या हातून जास्त काय होणार होतं ?

पण पुढें एका प्रवासाहून ते परत आले ते आजारी पडूनच आले. माझ्यावर झालेला अन्याय विसरून मी त्यांची मनापासून शुश्रूषा केली. डॉक्टर येऊन पाहून जात, पथ्यपाणी सांगत पण रोग कोणता आहे त्याचा फारसा उच्चार करीत नसत, डॉक्टरांची संमति घेऊन आणि मला एकटीला सारा शुश्रूषेचा ताण पडतो, अशी सबब पुढें करून त्यांनीं खूप पगार देऊन एक गडी ठेवला. तो त्यांची हलकीसलकी

शुश्रूषेचीं कामें करी. एकदां तो गडी आमच्याइथलें काम आटपून आपल्या घरीं निघाला होता. पाऊस फार पडत होता, म्हणून तो आमच्याच घराच्या बाहेरच्या बाजूस वळचणीखालीं पाऊस थांबण्याची वाट पाहात विडी ओढत उभा राहिला. तेवढ्यांत त्याचा कुणीतरी मित्रही त्याच्या जोडीला आला. वरच्या बाजूला खिडकींत मी सहज उभी होतें. त्या दोघांचें खालीं चाललेलें बोलणें माझ्या कानीं पडलें. त्या बोलण्यांत आमच्या इथल्या त्या गड्यानें भयंकर संसर्गजन्य रोगाचा उच्चार करून आमच्या घरांतल्या ज्या खोलींत यांचें अंथरुग असे, त्या खोलीकडे बोट केलें. तें ऐकून माझ्या काळजांत चर्र झालें. त्याक्षणीं माझ्या डोळ्यांसमोर माझ्या वडिलांची मूर्ति उभी राहिली. क्षणाक्षणाला आपलं आचरण पवित्र राखण्याकरितां जीवाचं रान करणारा तो ‘ देवमाणूस ’ कुणीकडे, आणि त्याच माणसाच्या कन्येचा जाहीर रीतीनें पति असलेला हा हीन आचरणाचा पुरुष कुणीकडे ? किळस आली मला साऱ्या प्रकरणाची ! त्यांच्या आजाराचा जोर कमी होण्याची वाट पाहात मी बरेच दिवस काढले. संधि साधून हा विषय आपण काढावा आणि आपला संताप व्यक्त करावा असा माझा विचार होता.

ते हिंडूंफिरूं लागले. आणि मी वाट पाहात होतें त्या संधीचा मी फायदा घेण्यापूर्वींच एके रात्रीं त्यांनीं मजजवळ माझ्या पत्निधर्माची निर्लज्ज मागणी केली ! क्षणमात्र माझें भान नाहींसें झालें. शरीराचा अणून्-अणु विलक्षण आगीनं होरपळून निघतो आहे, असा मला भास झाला. माझा संताप अनावर झाला; पण कसाबसा तोल राखून मी इतके दिवस विचारीन विचारीन म्हणून म्हणत होतें तो सवाल रोखठोक विचारून घेतला ! ते भयभीत झाल्याचा मला क्षणमात्र भास झाला. पण आपल्या भ्याडपणावर आरण विजय मिळविला पाहिजे अशी बहुधा त्यास जाणीव झाली असावी. कारण त्यांनीं माझ्या शरीरावर हल्ला करण्याकरितां पाऊल पुढें टाकलें. मी धावत धावत माझ्या खोलींत गेलें आणि आंतून घट्ट कडी लावून घेऊन स्वस्थ पडलें !

त्या दिवसापासून मला हिस्टेरियाच्या फिट्स् येऊं लागल्या. बेशुद्धावस्थेंत मी नेहमीं बडबडत असें. माझ्या घरांतली मोलकरीण माझें बडबडणें मी शुद्धीवर असलें म्हणजे मला सांगत असे. तें ऐकून माझी मलाच लाज वाटे. तेव्हांपासून त्या घरांत मला दिवसांदेखील भय वाटायला लागलं. पण माझ्या फिट्स्चा त्यांनीं आपल्या वर्तनाकडे साळसूदपणानें उपयोग करून घतला. त्यांनीं बाहेरचा नाद उघडपणें चालू केला. आसपासचे लोक आणि सगेसोयरे त्यांच्या या बाहेरच्या नादाचें मूळ माझ्या मूर्खपणांत आहे असें मानूं लागले. मी त्यांच्या मार्गांतून आपण होऊनच दूर झाल्याकारणानें त्यांना आपल स्वैराचार करण्यास कोणताच आडकाठी उरली नाहीं.

मी त्या घरांतच राहात होतें. पण माझ्या मनाचा असह्य दाह होत होता. शरीर एका खोलींत कोंडून घ्यायचं, मनाचा एकसारखा कोंडमारा करून घ्यायचा! हेंच कां आपलं आयुष्य? असा मला प्रश्न पडे. विचार करून करून मी वेडी होईन कीं काय अशी मला भीति वाटूं लागली. माझ्या प्रकृतीवरही त्याचा परिणाम झाला. मी आजारी पडलें. हवाफेराकरितां मला कुठेंतरी पाठवावें, असा यांनीं बेत केला. आईकडे जाण्याची माझी इच्छा नव्हती. यांच्या साहाय्यानें हवाफेर करीत आयुष्य कंठणें मला लाजिरवाणें वाटूं लागलें. अशा स्थितींत मला आमच्या या कंपनीची 'कुलीन नटनटी पाहिजेत,' अशी जाहिरात, वाचावयास मिळाली. जाहिरात ज्या गांवाहून दिली होती त्या गांवीं जाऊन मी प्रत्यक्ष चौकशी केली. आणि माझी खात्री पटली कीं, चार सभ्य लोक एकत्र येऊन नवीन प्रकारचा एक प्रयत्न करीत आहेत. साहजिकच मला वाटलें कीं, आपल्या आयुष्यांत आपल्याला दुसरं कांहींएक करतां येणार नाहीं. शिक्षण अर्धवट झालेलं, त्यामुळं दुसरा कोणताही पोट भरण्याचा व्यवसाय करणं अवघड होतं. मी मनाशीं म्हटलें, आजपर्यंत आपण आयुष्याशीं धाडसी खेळच केला, मग पुढें तरी हा आणखी एक डाव टाकून पाहायला काय हरकत आहे?

आणि मग एकें दिवशीं यांना परस्पर पत्र पाठवून मी या कंपनींत नोकरी धरली. ही कंपनी म्हणजे माझ्या आयुष्याच्या शाकुंतलांतली मेनका आहे. मी शिकलें नसलें तरी माझी ग्रहणशक्ति चांगली आहे. शिवाय माझा गाण्याचा तर शास्त्रशुद्ध अभ्यासच झाला होता. मी हा जगाविरहित प्रकार करतांना केवढा हिय्या केला असेल त्याची कल्पना करून पाहा. नात्यांतल्या आणि माहितींतल्या साऱ्या लोकांनीं, ' ही उठून गेली,' म्हणून केवढी तरी हाकाटी केली ! मी हा मार्ग पतकरला म्हणजे अनीतीच्या मार्गाला लागलें असं साऱ्या लोकांनीं आपल्या मनाशीं नक्की ठरवून टाकलं आहे. अजूनपर्यंत मी अनीतिकारक कांहीं केलं नसलं तरी पुढचा भरंवसा मी तरी कशी देऊं ? पुढें एकादेवेळीं माझा अधःपात घडला आणि तो कितीही वाईट असला, तरी त्याचा दोष सर्वस्वी माझ्यावर कसा येतो, असा प्रश्न मात्र मी विचारल्याशिवाय राह्यची नाहीं ! मुंबईला इथं एक कसलंसं मंडळ आहे. कायदेकौन्सिलांत एकपत्नीव्रताचा ठराव पास करून घ्यावा म्हणून, समाजांतल्या अनेक स्त्रीपुरुषांच्या अनुकूल सह्या मिळविण्याचं काम या मंडळाचे सभासद करीत असतात. आमच्या कंपनींतही सह्या मागण्याकरितां लोक आले होते. मीं सही दिली नाहीं, कारण तसल्या अर्जावर माझा विश्वासच बसला नाहीं. एकपत्नीव्रत पाळायला लावायचं म्हणजे काय करायचं, तर दुसरा जाहीर विवाह करूं द्यावयाचा नाहीं ! पण वेश्यागमन आणि स्वैराचार यांना आळा घालण्याची या बिलांत जोंपर्यंत योजना नाहीं, तोंपर्यंत माझे जसे एकव्रताचें धिंडवडे निघाले तसे सर्वत्र निघणार नाहींत का ? तुला काय वाटतं नीरे ?'

वत्सलेच्या बोलण्यानें नीरेच्या मनावर फार परिणाम केला होता. वत्सलेच्या प्रश्नाला तिनें उत्तर केलें, 'हें असलं कांहीं ऐकलं म्हणजे आपण अद्याप पाळण्यांतलं कुक्कुबाळ आहों असं मला अगदीं मनापासून वाटतं. कित्येकवेळां वाटतं कीं हा सारा समाज घुसळण्याकरितां कांहीं तरी अघोरी चळवळ व्हायला पाहिजे !'

इतक्यांत आचाऱ्यानें चौपाईवर कॉफीचीं उपकरणें मांडलीं. त्या दोघींनी अगदीं स्तब्धपणानें कॉफीपान केलें.

सकाळीं वत्सलेचा निरोप घेतांना नीरेला वाटलें, 'कालचं नाटक हें आतां संपलं. या खोलींत वत्सलेनं आपलं हृदय मोकळं केलं, तो त्या नाटकांतला कळसाचा प्रसंग होता !'

---

## प्रकरण २१ वें

# मला सारे विकार आहेत, पण—!



त्या दिवशीं कामगारांची प्रचंड सभा भरली होती. आणि कामगारांना उद्देशून शिरीषकुमारांचें भाषण व्हावयाचें होतें. नीरनें शिरीषकुमारांचीं कांहीं भाषणें आजपर्यंत ऐकलीं होतीं. पण अशिक्षित कामगारांच्यापुढें अगदीं व्यावहारिक दृष्टीनें केलेलें भाषण मात्र ती पहिल्यांदाच ऐकणार होती! हजारों कामगार श्रोते त्या मैदानांत आधींपासूनच येऊन बसले होते. ती गर्दी आणि ती सभाजनांचा उत्साह नीरेला अपूर्व वाटला. तिला हा प्रकार परिचयाचा नव्हता. ती एकटीच आज या मैदानाकडे आधींपासून गेली होती. शिरीषकुमार कुठें तरी कामाला गेले होते, ते परस्परच सभेकडे येणार होते. बरोबर वेळेच्या आधीं पांच मिनिटें शिरीषकुमार तेथें आले आणि सभेचें काम निरध्यक्ष-रीतीनें सुरू झालें. कामगार तल्लीन होऊन भाषण ऐकूं लागले. नीरा व्यासपीठाजवळच बसली होती. त्या भाषणांतील तळमळ तिला विशेष आकर्षक वाटत होती. शिरीषकुमार म्हणत होते—

‘ कामगारांनीं आपली शिस्त आणि संघशक्ति वाढविली पाहिजे. संघ कशाला पाहिजे असा प्रश्न तुमच्यापैकीं बरेचजण विचारतात असें मी ऐकलें आहे. या प्रश्नाचें तुम्हाला मी नीट उत्तर द्यावयाचें म्हणजे तुम्हांला सध्यांची कारखान्यांची पद्धत कशी काय असते, तें समजावून सांगितलें पाहिजे. साठसत्तर वर्षांपूर्वीं घराघर हातमाग चालत असत, ते दिवस आतां गेले. गिरण्या सुरू झाल्या. गिरण्यांतून दहापंधरा हजार माणसें काम करतात. आतां या सर्व कामगारांना कामाची वेळ व पगार

या बाबतींत सारखेच नियम लागू असतात. सुशींवर काम करा किंवा चार पावडीवर काम करा. सर्वांना कामाचे तास सारखे. पगारांचें प्रमाण ठराविक. या कारखान्यांमुळें प्रत्यक्ष मालकाला भेटणें शक्य नसतें. मालक फक्त एक नोटीस दारावर लावतो. याचा अर्थ काय कीं, प्रत्यक्ष मालकाला तुमच्याशीं बोलतां येत नाहीं. जसें मालकांचें तसेंच मजुरांचें नाही काय ? कारखान्यांच्या युगांत मालक व मजूर यांचा प्रत्यक्ष संबंध येणें अशक्य आहे. जसें मालक नोटीस लावून किंवा दुसऱ्या अंमलदारांच्या मार्फत सर्व मजुरांस जें काय सांगावयाचें तें सांगतों, त्याप्रमाणेंच मजुरांनींही आपलें म्हणणं संघातर्फे सांगितल्याशिवाय गत्यंतर नाहीं. एकेक मजुराला आपलें गाऱ्हाणें कसें सांगतां येणार ?

व्यापारी चढाओढीच्या दृष्टीनें पाहिलें तरी संघाचें महत्त्व पटण्यासारखें आहे. कापडाच्या धंद्याची गोष्ट इतर धंद्याहून जरा निराळी आहे. तुम्हांला एकादा कपडा घ्यावयाचा झाला, तर स्वस्त असेल तोच तुम्ही घेतां ! उदाहरणार्थ, मलमल घ्या. ही मलमल तुम्हाला सोलापुरची मिळते, मुंबईची मिळते, कानपुरची मिळते; विलायत, जपान वगैरे ठिकाणचीही मिळते. समजा, सोलापुरची मलमल साडेआठ आणे वार, मुंबईची नऊ आणे वार, जपानची साडेसात आणे वार व विलायतेची सहा आणे वार अशी आहे. तर कोणची मलमल तुम्ही घेणार ? तुम्ही स्वतः स्वस्त माल घेतां. पण तो घेत असतांना तुम्ही व्यापारी चढाओढींत कशी भर टाकतां हें तुमच्या लक्षांत येत नाहीं. दुसरीकडचा माल स्वस्त मिळूं लागला कीं, तुमचा माल पडून राहातो. मग याला मालक एक उपाय करतात. कांहीं सांचे बंद ठेवावयाचें, मजुरांचे टक्के कापावयाचें, इत्यादि उपाय अमलांत येऊं लागतात. समजा, कानपुरास टक्के कापून कानपुरची मलमल मुंबईच्या भावानें विकतां आली, म्हणजे कानपूर व मुंबई येथील भाव सारखे होतात. त्यांमुळें मुंबईचा माल पूर्वीसारखा खपेनासा होतो. मग ही टक्के कापण्याची पद्धत मुंबईतही उपयोगांत

आणावी लागते. अशीं संकटें वारंवार येणार, आणि एवढ्याकरितां मुंबईवाल्यांनीं कानपुरवाल्यांना आपलें मानलें पाहिजे.

तुमचे कामाचे तास निदान आठ झाले पाहिजेत. वर्षांतून कांहीं दिवस हक्काची रजा मिळाली पाहिजे. दंड नाहींसे झाले पाहिजेत. नोकरीची शाश्वती असली पाहिजे. बेकारपण, आजारपण, म्हातारपण वगैरे अडचणींच्यावेळीं पैशाची मदत कायद्यानें मिळाली पाहिज. पण हें सर्व घडवून आणणें तुमच्याही हातांत नाहीं व तुमच्या मालकांच्याही हातीं नाहीं. हें सर्व सरकारच्या हातांत आहे. सरकारवर साऱ्या मजुरांनीं संघाच्याद्वारें जोराचें दडपण आणल्याशिवाय सरकार कांहींही करणार नाहीं.

विलायतेंतील स्थिति सांगितली तर खरी सुद्धां वाटणार नाहीं. तेथें आठ तास काम पडतें. तुमच्यापेक्षां चौपट पांचपट पगार मिळतो. दंडाची भाषा कधींही ऐकू येत नाहीं. कामावरून काढणें म्हणजे काय हें तेथील मजुरांस माहीत नाहीं. प्रत्येकाला चारपांच खाल्यांच घर मिळतें. पलंग, गाद्या, ग्रामोफोन हीं सारी प्रत्येकाला सहज मिळतात. तिकडील मजूर कांहीं स्वर्गातून आले नाहींत. त्यांनाही तुमच्यासारखेच हाल सोसावे लागले. पण संघशक्तीच्या जोरावर त्यांनीं ते नाहींसे केले आहेत. विलायतेंत तर पूर्वी सरकार संघामध्यें जाणाऱ्या कामगारांना तुरुंगात घालीत असे. पण ते आतां सर्व बदललें आहे. सध्यां तुमचे मालक साशंक आहेत. दोन बैल समोरासमोर आले कीं, तिरवें बघूं लागतात पण गाडीला जुंपले कीं, व्यवस्थित चालतात! आम्हांला गिरण्यांचा धंदा बुडवावयाचा नाहीं. मात्र मालकांस हें नीट समजावयास हवें.

आजकाल एकसारखे पुष्कळ संप होत आहेत. परंतु प्रसंगाचें गंभीर स्वरूप ध्यानांत घेऊन त्याला तोंड देण्याची कामगारांची तयारी विशेषशी दिसत नाहीं. आहे हा फंड आणि नवीन जमवून त्यांत भर घातली तर

दीड लाख लोकांना वर्षसहा महिनें पोसणें शक्य होणार नाहीं. लहान लहान संप निष्कारण करून हजारों कामगारांनीं आतांपर्यंत हजारों रुपयांची प्राप्ति बुडविली! व तोच क्रम अद्यापि चालू आहे! अशानें आणखी एकदोन महिन्यांत सार्वत्रिक संप करणें शक्य होणार नाहीं. आणि संप केलाच तर नीट टिकविणें फार जड जाईल. संपाची तयारी चांगल्या रीतीनें केली तर मालकांना अगोदरच पुढील परिणाम कळून चुकतील व ते पगार कापण्याच्या फंदांत पडणार नाहींत. नाहींपेक्षां कामगार गाफील असलेले पाहून पगार कापण्याचा आपला पुष्कळ दिवसांचा बेत ते अमलांत आणतील.

संप केल्यास तो टिकविण्यासाठीं शांततापूर्वक वागण्याची व्यवस्था झाली पाहिजे. शांततेचा भंग झाल्यास चटकन् संप मोडेल. इतकेंच नव्हे तर कामगारांच्या चळवळीस कायमचा भयंकर धक्का बसेल!

कोणताही उद्योगधंदा घेतला तर त्यांतील मालकशाहीची चैन, संपत्ति व शक्ति हीं त्या त्या धंद्यांत पोटाची टीचभर खळगी भरण्याकरितां गुलामगिरी पतकरलेल्या कामगारांच्या अज्ञानाचा व भोळयाभाबड्या सरळ स्वभावाचा फायदा घेऊन त्यांना फसवण्याच्या कलेवर अवलंबून असतात, हें आतां सर्व कामगारबंधूंना कळावयास लागलें आहे. बहुजनसमाज अज्ञानी नसता तर संपत्तीची विभागणी इतकी विषम न होऊं देण्याची समाजानें खास खबरदारी घेतली असती. मालकशाहीची मदार व चैन रक्ताचें पाणी होईपर्यंत देह झिजविणाऱ्या कामगारांच्या श्रमांवरच चालते. मालकशाहीची दृष्टि दोन पैसे स्वतःला अधिक फायदा कसा होईल याकडे नेहमीं लागून राहिलेली असते.

थोडयाशाही फायद्याकरितां धनिक लोक न्याय-अन्यायाची फिकीर न बाळगतां आततायी मार्ग स्वीकारतात. मनुष्य कितीही स्वार्थी असला तरी समाजाची सहानुभूति मिळविण्याकरितां स्वतःच्या स्वार्थावर चांगुलपणाचा पेहराव चढविण्याचा प्रयत्न करणें, नीतीचा आधार शोधणें, व बुद्धीच्या साहाय्यानें स्वतांच्या वर्तनाचें समर्थन करणें हा मनुष्यस्वभाव आहे. या

सर्वसाधारण मनुष्यस्वभावाला अनुसरून मालकलोक स्वार्थ साधून दोन पैसे जास्त फायदा होण्याकरितां अनेक गोष्टी करतात कामगारांच्या पगारावर कात्री चालवितांना सामान्य लोकांची सहानुभूति आपल्याकडे वळावी म्हणून ते स्वतांच्या समर्थनाकरितां अनेक खरीं खोटीं कारणे व सबबी पुढें करीत असतात धंद्याशीं संबंध नसलेला सामान्य बुद्धीचा त्रयस्थ मनुष्य त्यांच्या भुलथापांना बळीही पडतो.

'आमच्या धंद्याला मंदी असल्यामुळ आम्हाला फायदा होत नाहीं, व त्यामुळें कामगारांचा पगार कापण्याशिवाय आम्हांला गत्यंतर नाहीं, फायदाच नाहीं, तर इतका पगार आम्ही कोठून देणार ? पूर्वींचाच पगार द्यावयाचा झाला तर आम्हाला आमच्या धंद्यांत तोटा होतो, त्यापेक्षां आम्ही आमचा धंदा बंद करूं. पण धंदा बंद केल्यास धंद्यांत असलेल्या असंख्य कामगारांच्या नशीबीं हाल अपेष्टा येतील. त्या चुकविण्याकरितां केवळ भूतदयेनें प्रेरित होऊनच आम्हीं आमचा धंदा सुरू ठेवतों.' असें बोलून मालक संभावितपणाचें सोंग इतकें उठावदार उठवितात कीं, कोणालाही ही विचारसरणी ऐकतांक्षणीं पटल्यासारखी वाटते. वरवर विचार करणाऱ्या मनुष्यास मालक लोक सच्चे असावेत व त्याचें म्हणणें रास्त असावें असा भास झाल्याशिवाय राहात नाहीं. फायदा नसतांना पगार कोठून देणार असा मालकांचा सवाल ऐकला म्हणजे गरीब कामगार आपला पगार कापून देण्यास तयार न होण्याचें एकच कारण म्हणजे तो दुराग्रही असला पाहिजे असा दोष त्याच्या माथीं मारण्यास मनुष्य तयार होतो. मालक लोक सच्चे आहेत, ते केव्हांहीं विश्वासघात करीत नाहींत, व धंद्यांत त्यांना खरोखरच फायदा न होतां तोटा होतो, असें क्षणभर गृहीत धरून चालले तरी धंद्यांत होणाऱ्या तोट्याला कामगार जबाबदार कसे, हा मुख्य प्रश्न आहे. तोटा होत असतां, तोटा होण्याचीं मूळ कारणें शाधून न काढतां कामगारांच्या पगारावर मनमुराद कात्री चालविणें हा निव्वळ अन्याय होय. फायदा न

झाल्यास मालकांना पगार कापण्याशिवाय गत्यंतर नसतें हें जर खरें, तर पगारांत काट झाली असतां पोट भरत नाहीं, व जीव जगविणें मुष्किलीचें होतें म्हणून पगार कांपू न देणें कामगारांचें कटु कर्तव्य असतें हें सत्य बुद्धीला जास्त पटतें. पोटाकरितां काबाडकष्ट करूनही उपासमार टाळतां येत नाहीं, अशा स्थितींत मिळत असलेल्या पगारांत छाटाछाट करूं देण्यास कामगार कसा तयार होईल? त्यानें तयार तरी कां व्हावें? असल्या छटाछाटीला कामगारांनीं निमूट तयार व्हावें, अशी जर समाज अपेक्षा करींत असेल तर समाजाच्या या पक्षपाती वृत्तीला सामाजिक जुलूम हेंच नांव शोभेल. कामगार काबाडकष्ट करण्यास तयार असतो तो पोटापुरतें अन्न मिळावें म्हणून! काबाडकष्ट करण्यास तयार असलेल्या प्रत्येक प्रामाणिक माणसास समाजाकडून पोटापुरतें मागण्याचा, समाजाचा घटक या नात्यानें जन्मसिद्ध हक्क आहे.'

× × ×

हें भाषण झाल्यावर शिरीषकुमारांनीं साऱ्या कामगारांना शिस्तीनें मिरवणूक काढण्याची विनंति केली. ती मिरवणूक म्हणजे एक हुल्लड आहे असा थोडासादेखील भास उत्पन्न होतां कामा नये, असें त्यांनीं ही विनंति करतांना सर्वांना बजावलें होतें. सभेच्या आसपास आधींपासूनच पोलीस होते. अशी मिरवणूक काढण्याची योजना कामगारांना जरी आतांच सांगण्यांत आली होती, तरी तिची व्यवस्था शिरीषकुमारांनीं पूर्वीपासूनच करून ठेवली होती. केवळ कामगारांना शिस्तीनें आणि संघशक्तीनें काम करण्याचा वस्तुपाठ मिळावा म्हणूनच अशा मिरवणुकी काढण्याची जरूर भासत असे. आजची मिरवणुक ही अशाच प्रकारची होती. तरीही हजारों अशिक्षित कामगारांच्या मनावर शांततामय मार्गाचा परिणाम कायमची पकड बसवूं शकत नाहीं, हीही गोष्ट कांहीं खोटी नव्हती. कामगारांमध्यें साध्या शद्बावरूनही एकेरीवर येण्याचे प्रसंग घडतात! त्यांतून या जमावांत केव्हां बिघाड होतो हें जागरूकपणानें

मुद्दाम पाहात राहिलेल्या पोलिसांना एखाद खुसपट काढण्यास वाटेल तेवढया संधी लाभणें अशा मिरवणुकींत सहज शक्य होतें. या मिरवणुकीचा प्रकार काय झाला त्याचा अंदाज कांहीं दिवसांनीं प्रसिद्ध वर्तमानपत्रांतून जो वृत्तांत आला त्यावरून कुणालाही सहज अजमावतां येईल. असल्या वृत्तांतांतून लिहिलें होतें,

' त्या दिवशीं संपामुळें कांहीं गिरण्या बंद होत्या. गिरणीकामगार निरनिराळ्या ठिकाणीं गोळा झाले होते व त्यांच्या सभा भरत होत्या. अशाच एका सभेंत एका पोलिस कॉन्स्टेबलला मारहाण झाल्याची बातमी टेलिफोननें पोलिस खात्यांत पसरली. पोलीसखात्यांतील डेप्युटी इन्स्पेक्टर, व इतर अधिकारी कामगारांची मिरवणुक ज्या मार्गानें जाणार होती त्या मार्गावर हजर झाले सुपारीबाग रस्त्यावर करीरोडचें जें वळण आहे त्या वळणाशीं मिरवणूक आली. तेथपर्यंत मिरवणूक शांतपणानें आली. पुढें मिरवणुकींतल्या लोकांतच कांहीं बोलाचालीचा प्रसंग निर्माण होऊन मारामारी होईल असा रंग दिसूं लागला. पांच हजार कामगारांचा जमाव व पांचपन्नास पोलीस अशी स्थिति झाल्यामुळें पोलिसांनीं दंगा आवरण्याकरितां जालिम उपाय अमलांत आणण्याची तयारी केली. तेवढयांत चाळींच्या खिडक्यांतून व दरवाजांतून दगड, बाटल्या वगैरेंचा वर्षाव होऊं लागला. बऱ्याच पोलिसांना दुखापती झाल्या. शेवटीं दंगा आटोक्यांत आला. आतांपर्यंत गिरण्यांतल्या कामगारांनीं संप करून मिरवणुकी काढल्या तरी त्या निरुपद्रवी असत. परवांचाच प्रकार विशेष मारामारीचा झाला. या कामगारांपुढें भाषण करणारे पुढारी श्री. पटवर्धन हे भाषण होऊन मिरवणूक निघण्याच्या सुमारास घरीं निघून गेले. त्यांची प्रकृति आकस्मिक रीतीनें बिघडली म्हणून त्यांना जावें लागलें असें म्हणतात. त्यांच्या गैरहजरींत इतर पुढाऱ्यांना तितक्या धोरणानें वागतां आलें नाहीं, असें म्हणणें भाग आहे ! ''

× × ×

आणि शिरीषकुमारांचा आजार हा खरोखरच आकस्मिक होता. त्यांना जडलेली हृदयाच्या विकाराची व्याधि केव्हां डोकें वर काढील याचा नियम नसे. महिनेंचे महिने त्यांचे कार्यक्रम बिनबोभाट चाललेले असावयाचे, पण एकाद्याच वेळीं छातींत दुखूं लागून कळा येऊं लागल्या म्हणजे मात्र अंथरूण धरण्याशिवाय गत्यंतर उरत नसे. त्या सभेच्यावेळीं असेंच झालें. भाषण संपण्याच्या बेताला त्यांच्या छातींत दुखूं लागलें. मिरवणूक निघावयाच्या वेळीं तर उभें राहाणें अशक्य वाटूं लागलें. म्हणून त्यांनीं बरोबरीच्या इतर पुढाऱ्यांना कांहीं तांत्रिक गोष्टी सांगून गाडीनें घरचा रस्ता धरला. बऱ्याच दूर असलेल्या नीरेला कळवून जाण्याइतकाही त्यांना धीर निघाला नाहीं.

त्यामुळें ते एकटेच घरीं आले. आल्याबरोबर त्यांनीं न्हाणीघरांत जाऊन डोक्यावर बरेंचसें पाणी घेतलें. स्वच्छ डोकें पुसून आपल्या खोलींत आल्यावर हंथरुणावर पडण्यापूर्वी त्यांनीं कपाटांतील अशा प्रसंगीं मुद्दाम राखून ठेवलेलें कसलेसें औषध प्यालें. आणि मग हंथरुणावर पडून विशेष त्रास पडणार नाहीं अशा बेतानें त्यांनीं त्या दिवशींच्या वर्तमानपत्रावर नजर फिरविण्यास सुरुवात केली. त्या औषधानें त्यांना किंचित आराम वाटून त्यांचा डोळा लागला.

× × ×

रात्रीं त्यांना जाग आली त्यावेळीं भोंवतालीं अंधारच होता. त्यांनीं त्या अंधारांतच आसपास जरा रोखून पाहिलें तों नीरा त्यांच्या उशागतीं बसली असल्याचें त्यांना आढळून आलें !

अंथरुणावर उठून बसत शिरीषकुमारांनीं विचारलें,

'नीरे, मी मागें एक दोनदां तुझ्याजवळ तुझ्या जिव्हाळ्याची मागणी केली, ती मागणी पुरविण्याचा तुला फार लवकर प्रसंग आला नाहीं ?'

'असल्या बाबतींत जिव्हाळा कसला आला आहे ? माझं मी कर्तव्यच करतें आहें.'

'नीरे, तूं ज्या कर्तव्याला 'माझं' म्हणतेस, तें कर्तव्य खरोखरच तसं आहे कां ?'

"कां ? तसं नसायला काय झालं ? पण तो वाद आतां राहूं द्या. तुम्ही पडा पाहूं पुन्हां अंथरुणावर! मी तुमची छाती जरा चोळतें, म्हणजे तुम्हाला बरं वाटेल. तुमचं सभेतलं भाषण संपतांसंपतांना तुमच्या चेहऱ्यावरूनच मला सारं कांहीं समजून आलं. मी ताबडतोब ओळखलं कीं, स्वारीला कांहीं तरी होतं आहे आज !"

'हृदयाचं दुःख लपवितां येत नाहीं म्हणतात ना ! तसंच झालं माझं ! शेवटीं शेवटीं तर अगदीं असह्य झालं, तेव्हां मग तडक निघून आलों. तूं केव्हां आलीस ?'

'मीही कांहीं मग फार वेळ राहिलें नाहीं तिथं ! मिरवणूक निघ-ण्याच्या बेताला मी निघून आलें.'

'काय झालं आहे पुढं त्या मिरवणुकीचं कुणास ठाऊक ? हातीं घेतलेलं काम मला हें असं माझ्या हृदयामुळं अर्धवट टाकावं लागतं. भारी त्रास होतो मग माझ्या मनाला ! हें माझं 'हृदय' आणखी कशा कशाच्या आड येणार आहे कुणास ठाऊक ?'

'पण मी म्हणतें, तुम्ही जरा स्वस्थ निजून राहिलं तर काय बिघडेल ?'

मग नीरेनें आग्रहानें शिरीषकुमारांना निजावयास लावलें. त्यांच्या अंगावर नीट पांघरूण घालून ती त्यांच्याजवळ बसली. शिरीषकुमारांनीं म्हटलें, 'बसायला जशी तुझी परवानगी नाहीं, तशी बोलायलाही नाहीं असं मी समजायचं कां ?'

'छे. बोलायला कोण नाहीं म्हणणार आहे ? पण बोलायचं तें आतां या तुमच्या चळवळीसंबंधानं मुळींच नको.'

'मग कशाविषयीं बोलायचं ? वास्तविक हा प्रसंग एखाद्या कादंबरीकाराची प्रतिभा जागृत करणारा आहे. बाहेर पसरलेला धूसर चंद्रप्रकाश, सर्वत्र स्तब्धता, खोलींत पूर्ण शांतता, तो अंथरुणावर पडलेला, ती त्याच्याजवळ बसलेली ! दोघेंही पूर्ण जागीं. आणि त्याचा हृदयाचा विकार जागृत झालेला ! आणि ती त्याच्या....'

'इश्श; चळवळींसंबधानं बोलायला नको म्हटलं कीं, लागलीच असलंच बोलायला पाहिजे असा त्याचा अर्थ होतो कां ?'

'तूं कशाला म्हणायला पाहिजेस ? आजच्या आधुनिक जगांत दोन भुकांचा शोध लागलेला आहे नीरे. त्या दोन भुका प्रत्येक माणसाच्या जीवनाला सर्वस्वी व्यापून राहिलेल्या आहेत, असं आजच्या शास्त्रज्ञ पुढाऱ्याचं म्हणणं आहे.'

'कोणत्या त्या दोन भुका ? एक भाताची आणि दुसरी भाकरीची असंच ना ?'

'एक भूक मात्र तूं बरोबर ओळखलीस. भाकरीची भूक म्हणतात ती तूं बरोबर सांगितलीस! जगांतली ही सारी धावपळ भाकरीकरितां म्हणजे अन्नक्षुधेकरितां आहे, असं स्पष्ट झालेलं आहे, आणि तें साऱ्यांना पटलेलं आहे; दुसरी भूक मात्र अगदीं नैसर्गिक रीतीनें माणसामध्यें जागृत होते, हें मात्र पुष्कळांना पटत नाहीं. परंपरेच्या संस्कारामुळें त्यांना तें पटवून घेतां येत नाहीं. तुला सुद्धां तें पटायचं नाहीं !'

'कां ? मला न पटायला काय झालं ?'

'मी तुझ्या चालचर्येवरूनच हें बरोबर ताडलं आहे. ही भूक प्रत्येक प्राणिमात्राला अगदीं नैसर्गिकरीतीनें लागते आणि अन्नक्षुधेसारखीच ही भूक भागविण्याची जबाबदारी समाजावर आहे हें म्हणणं आजच्या समाजांतले बुद्धिजीव लोक चटकन् कबूल करणार नाहींत. ते

तत्त्वज्ञाची भूमिका घेऊन लागलीच उपदेश करण्याचा आव आणतात. पण तूंच पहा. मघांशी मी कामगारांच्य संबंधानं बोललों, तें बोलणं या भाकरीच्या भुकेसंबंधानं होतं. त्या बोलण्याला तूं बंदी केल्याबरोबर मीं जें बोलणं चालू केलं तें या दुसऱ्या भुकेसंबंधानं होतं !'

'कांहींतरीच बोललं म्हणजे त्यांतून शास्त्र निर्माण होतं वाटतं ? जगाच्या आरंभापासून लोक ही असली चंद्रप्रकाशाची आणि प्रणयी लोकांचीं वर्णनं केवळ करमणुकीकरितां करीत आले आहेत. त्या प्रकारांत उगीचंच एकदां शास्त्रीय तत्व शोधीत बसण्याची हल्लीं एक नवीन टूम निघाली आहे झालं !'

'नवीन टूम निघाली आहे, ती शास्त्रीय तत्व शोधीत बसण्याची नव्हे तर कोणत्याही तर्कसिद्ध शोधाला तो शास्त्रीय नव्हे असं मानीत राहाण्याची ! पहा ना, ही कामक्षुधा अगदीं नैसर्गिक आहे, प्रत्येक माणसाच्या जीवनाच्या विकासाला या क्षुधेची जरूर असते असं जर मी म्हटलं तर तुला कसं पटेल ?'

'नाहींच पटणार. कारण प्रत्येक माणसाच्या जीवनाच्या विकासाला या क्षुधेची जरूर आहे असं मला प्रत्यक्ष अनुभवानं आढळून आलेलं नाहीं. मग मला तें कसं पटावं ! तुमचंच उदाहरण पहा. तुमच्या जीवनांत या भुकेला आजपर्यंत कुठें जागा मिळाली आहे ?'

नीरेकडे स्तब्धपणें पाहात शिरीषकुमारांनीं नुसतें स्मित केलें आणि म्हटलें, 'oh, how strange of you to ask !'

पण वरील प्रश्न विचारतांना नीरेनें शिरिषकुमाराकडून कांहीं वेगळ्याच उत्तराची अपेक्षा केली होती. आजपर्यंत जो प्रश्न विचारण्याची संधि आली नव्हती, तो सहज संभाषणाच्या ओघांत विचारण्याचा प्रसंग तिला लाभला होता, आणि तो तिनें मोठ्या चातुर्यानें साधून घेतला होता. उंचावरून खालीं येणारा चेंडू आपण सहज झेलूं अशा कैवारानें

एकाद्यानें उभें राहावें, आणि तो चेंडू हातांच्या ओंजळींवर आपटून दूर उडून जावा म्हणजे झेलणारांच्या मनाला जसें पराजयाचें सूक्ष्म शल्य बोचून जातें, तसें नीरेच्या मनाचें झालें !

त्या पराजयाच्या शल्यानें ती व्याकुल होत असतांनाच शिरीषकुमारांनीं म्हटलें, ' किती माझ्याबद्दलची चुकीची कल्पना आहे तुझी ! '

या वाक्यानें तर तिला दुसरा घाव बसल्यासारखें झालें. अलीकडे अलीकडे तर ती आपल्या मनाला मोठ्या अभिमानानें बजावीत आली होती कीं, शिरीषकुमारासारख्या उदात्त वृत्तीच्या पुरुषाशीं समरस होण्याकरितां आपण जी धडपड करतों आहे, तींत आपल्याला असामान्य यश येत चाललें आहे. त्याच्या सारख्या कर्तव्यकठोर पुरुषाला न आवडणाऱ्या गोष्टीही तो आपल्याकरितां म्हणूनच करूं लागला आहे! कशामुळें झाला हा बदल? हा बदल केवळ आपल्यामुळें झाला ! पैसे खर्चून फुलें घेणें न आवडणाऱ्या माणसानें आपल्याला वासाची वेणी मुद्दाम घेऊन दिली, याचा अर्थ काय ? स्वतांच्या जेवण्याखाण्याची हेळसांड करणाऱ्या पुरुषानें केवळ आपल्या आग्रहाखातर आपण करून घातलेले जिन्नस खाण्यांत हौस दाखवावी, याचा अर्थ उघड उघड हाच कीं त्याला आपण जाणलें आहे, अगदीं बरोबर जाणलें आहे. आणि मग आपल्या मनांत ' चुकीची कल्पना ' आहे, हें कसें ?

" खरंच नीरे, माझ्याबद्दल तुझी कल्पना अगदीं चुकलेली आहे. तुला असं कां वाटतं कीं मी मनुष्य नाहीं. मी माणूस आहें आणि माणूस असल्याकारणानें मला या अन्नाच्या भुकेप्रमाणेंच कामक्षुधाही आहे. तुझ्यासारखेच इतरांचेही मजबद्दल गैरसमज असण्याचा संभव आहे. मी हरिभाऊ आपट्यांचा 'भावानंद' नाहीं. भावानंदाइतकं ज्यांना उदात्त होतां येत असेल त्यांच्याबद्दल मी नेहमीं आदरच बाळगीन ! पण समाजांत खऱ्याखुऱ्या कृतीचे ' भावानंद ' फार थोडे. ज्यांना आपली कामवासना सर्वस्वीं गौण राखतां येऊन तिचा आपल्या आयुष्यावर एकाद्या दिवशींही मोठासा तीव्र

परिणाम न होऊं देतां जीवित यशस्वी रीतीनें घालवितां आलें, असे लोक अतिशय थोडे. किंबहुना तो एक आदर्श आहे. आणि ध्येयपूर्ण आदर्शापर्यंत सामान्य लोकांना पोचतां न येणं यांतच त्या आदर्शाचा आदर्शपणा आहे ! ''

'' मग आदर्शासारखं वागतां न येणाऱ्या माणसानं आपल्या नैसर्गिक भुकेची उपासमार करूं नये हेंच तर समाजाचं म्हणणं आहे ! ''

'' हो. समाज नुसतं म्हणायला तयार आहे पण आपली जबाबदारी ओळखायला कुठं तयार आहे ? बदलत्या काळाबरोबर समाजाची जबाबदारी वाढत गेलेली आहे, घरोघरीं शेतवाडीची सुबत्ता होती त्या काळांतील ही नैसर्गिक भूक भागविण्याची पद्धत आज अमलांत आणून कशी चालेल? शरीराला सतराव्या अठराव्या वर्षीं जी कामतृप्ति करून घेण्याची इच्छा उत्पन्न होते ती पूर्वींच्या काळीं वैवाहिक जीवनामुळें तात्काल समाजमान्य मार्गांनीं भागत असे. संसार चालवायला जरूर असलेली स्वस्थता व सुखरूपता अगदीं हाताशीं असे. आतांच्या जगांत ही ती जागृत होण्याचें वय बदललें नाहीं, पण ती समाजमान्य मार्गांनीं तृप्त करून घ्यायला ज्या लग्नबंधनाची जरूर आहे तें स्वीकारण्याकरितां आवश्यक असलेली सांपत्तिक अनुकूलता मात्र हातीं लागते ती तिसाव्या वर्षी ! अठरापासून तिसाव्या वर्षापर्यंतचा बारा वर्षांचा काल हा कसा काढायचा? बायकांचंही असंच. त्यांचे प्रौढविवाह इतके उशिरां होण्याचं कारण या सांपत्तिक प्रतिकूलतेंत आहे. एकपत्नीव्रत, घटस्फोट जातीजातींतील विवाह, रजिस्टरपद्धतीचा प्रचार इत्यादि गोष्टीबद्दल समाजांत जे वाद चालले आहेत तें पाहून मला हसूं येतं. हाडापर्यंत खोल गेलेल्या व्रणाच्या वरच्या पापुऱ्यावरच लोकांची जोरजोरानें मलमपट्टी चालू आहे. पण त्या आंतल्या व्रणाचं काय? एकपत्नीव्रत, घटस्फोट इत्यादि प्रकार हे सुस्थिर, अशा कोणत्याही स्वरूपाच्या, समाजमान्य लग्नसंस्थेच्या अनुषंगानें निर्माण होतात लग्नंच होण्याची जिथं पंचाईत आहे तिथं घटस्फोटाची भाषा गैरलागू नाहीं का? विवाहांचे मुहूर्त

ह्रीं अक्षरशः टळताहेत ! नैसर्गिक वासनेला फार वेळ मारीत राहाण्याचा प्रसंग येतो आणि लग्नाचा मुहूर्त साधतां येत नाहीं असं आजच्या समाजांत स्पष्टपणानं दिसतं आहे. त्याचं कारण सांपत्तिक अनुकूलता लाभल्याशिवाय लग्न करतां येत नाहीं हेंच होय ! ही सांपत्तिक अनुकूलता समाजानं दिली पाहिजे. ज्यानं ज्यानं म्हणून प्रामाणिकपणानं आपल्या बुद्धीचं किंवा शरीराचं समाजाला दान केलं आहे त्याला त्याला माणुसकीला योग्य अशा साऱ्या सुखसोयी बिनबोभाट मिळाल्या पाहिजेत ! हो. पण मी हें काय बरळत सुटलों ? असलं तत्वशोधन केलेलं तुला आवडत नाहीं, हें मी विसरलों ! ”

‘ पण माणसानं अगदीं सदासर्वदा असलं व्यावहारिक बोलणं बोलत राहिलं तर जीवनांत आनंद निर्माण होणं कधीं शक्य आहे का ? प्रत्येक लहानसहान हालचालींत देखील कार्यकारणभाव पाहात राहून एकसारखी चिकित्सा करण्यानं आयुष्यांत रंग उत्पन्न होत नाहीं, हें खोटं आहे का ? ’

‘ अज्ञानाच्या आनंदानं निर्माण होणारा रंग हा फसवा असतो. पूर्ण ज्ञानानं किंवा अनुभव जमविण्याची धडपड केल्यानंतर मिळणारा आनंद हा प्रत्येकानं उपभोगण्याचा प्रयत्न करण्यांत खरी प्रगति आहे. डोहाच्या काठावर उभं राहून पाण्याचे लहानमोठे तरंग नुसते लांबून पाहाण्यांत कांहीं वेळ मौज वाटेल ! पण त्या डोहांत उडी घेऊन पाण्याचा प्रचंड खळबळाट उडवून, तीरावर परतून मागें मुरडून पाहाण्यांत जो आनंद मिळतो त्याची सर पहिल्या नुसत्या प्रेक्षकाच्या भूमिकेंत कधीं अनुभवायलाच मिळायची नाहीं ! साऱ्या आकाशांत काळे ढग गच्च भरून राहातात, आणि आकाशाच्या हजाऱ्यांतून सहस्र कारंजीं ओसंडूं लागतात ! अशा देखाव्याकडं नुसतं पाहाण्यांत काय मौज आहे ? त्या पर्जन्यधारांचा मारा अंगावर घेतघेत खूपसं भिजून आलं म्हणजे त्या मेघांची वर्षाव करण्याची शक्ति किती अवर्णनीय असते तें समजून येतं ! ’

‘ काळे ढग ! त्यांचा मारा सहन करीतच कितीकांचे तरी जन्म जातात ! ढगांची वृष्टि संपत नाहीं. माणसं मात्र काकडून मरून जातात !’

‘ पण सृष्टींतला सारा खळमळ त्या ढगांतून उतरणाऱ्या हजारों जलधारांनीं पार वाहून जातो! काकडून मरणारीं माणसं आपापल्यापुरता विचार करतात. साऱ्या सृष्टीबद्दल आणि समाजाबद्दल विचार करीत नाहींत. चारदोन माणसं काकडून गेलीं तरी सारी सृष्टि धुवून निघते, तिच्यांत नवीन चैतन्य येतं. समाजावर असा काळ्या ढगांचा एकसारखा वर्षाव होत राहिला पाहिजे. काळ्या ढगांनीं आकाशांत गर्दी केली म्हणून मूठभर माणसं, आपली तात्पुरती हिंडण्याफिरण्याची मौज आपल्याला अंतरणार म्हणून दुःखी होतील, आणि कांहीं निराश्रित माणसं आपण काकडून जाणार या भीतीनं आधींच गारठून जातील. पण सारी सामाजिक सृष्टि अधिक तेजस्वी, अधिक निर्मल आणि अधिक सुंदर होईल. चारदोन व्यक्तींना त्या ढगांचा मारा असह्य झाला तरी साऱ्या समाजसृष्टीला तो चैतन्यप्रद होईल ! सृष्टीकडं आणि समाजाकडं आजच्या प्रत्येक सामाजिक घटकानं अगदीं शास्त्रज्ञाच्या दृष्टीनं पाह्यला शिकलं पाहिजे ! प्रत्येक जीव म्हणजे एक स्वतंत्रपणानं वाढण्याचीं ईर्ष्या बाळगणारं रोपटं आहे. यांतल्या प्रत्येक रोपट्याला सारीं नैसर्गिक सुखं कोणतीही अडचण न येतां मिळालीं पाहिजेत. कांहीं रोपट्यांवर सांवली ठेवावयाची, कांहींच्यावर केवळ सूर्यप्रकाशच राखायचा, कांहींच्यावरच फक्त पाऊस पडूं द्यायचा आणि कांहींना पावसाच्या पाण्याचा एक थेंबही स्पर्श करणार नाहीं असं बंदिस्त राखायचं, असं करणाऱ्या बागवानाची बाग विशोभित झाल्याशिवाय राह्यची नाहीं. समाज विशोभित होतो, तेव्हां असलंच कांहींतरी झालेलं असतं. प्रत्येक रोपट्याला सारीं नैसर्गिक द्रव्यं, पाहिजे तेवढ्या प्रमाणांत मिळतील असं करायला पाहिजे !’

'शिरीष, स्पष्टच विचारतें तुम्हाला, माझं जीवित म्हणजे सुद्धां एक रोपटंच आहे ना ! मग त्याची नैसर्गिक वाढ व्हायला नको कां ? तुम्ही मघां सांगितल्या त्या क्षुधा माझ्यांतही जागृत झाल्या तर....'

'स्पष्टच विचारतें,' म्हणून तिनें म्हटलें खरें. पण तिच्या मनाचा विचित्र संकोच झाला. आकाशांत कललेल्या चंद्राचें किरण समोरच्या खिडकींतून आंत शिरत होतें. नीरेच्या मांडीपर्यंत तें पोंचत होते पण त्या मांडीला स्पर्श करावा कीं न करावा अशा संकोचानें त्यांचा त्या खोलींत संचार होत होता. तिच्या वस्त्रापासून ते किरण परावर्तन पावून खोलींतल्या धुसर प्रकाशाला किंचित उजळा मिळत होता.

शिरीषकुमाराजवळ ती बसलेली होती. कमरेपर्यंत चादर अंगावर ओढून घेऊन शिरीषकुमारही तिच्याजवळ बसले होते. ती गोंधळून थांबली तेव्हां त्या खोलींत शांतता अगदीं भरून राहिली. जवळच्याच स्टेशनवरची शंटिंग करणाऱ्या इंजिनची कर्णकर्कश शिटी, त्या मधुर चंद्रकिरणांना त्यांच्या संकोचाबद्दल आपल्या तारस्वरानें जणूं हिणवीत होती. !

शिरीषकुमारांनीं म्हटलें, "नीरे, नैसर्गिक वाढ होऊं देण्याची ऊर्मि आंतूनच असली पाहिजे. नुसत्या बाहेरच्या माऱ्यानं काय होणार ? पाण्याच्या डोहांत बाहेरून दगड फेकले तर क्षण दोन क्षण त्या पाण्याची हालचाल होईल, त्यावर तरंग उठतील. पण ते तरंग म्हणजे त्या पाण्याच्या जीवंतपणाचें द्योतक नव्हेत ! समुद्राच्या लाटा जशा आंतल्या उमाळयाच्या असतात, तशी जीवितांतल्या लहानमोठ्या प्रयत्नांची ऊर्मि ही आंतल्या उमाळ्याची असली पाहिजे. तुझा उमाळा खरा असेल तर तुला मार्ग सांपडल्याशिवाय कसा राहील ?"

"तो उमाळा खरा आहे ! अगदीं हृदयापासूनचा आहे. माझ्या हृदयांत चाललेल्या तांडवाला वृंदवादनाची साथ नाहीं, म्हणून त्याचे ध्वनि ऐकूं येत नाहींत ! आजपर्यंतच्या निःशब्द तांडवाला साथ मिळावी म्हणून..."

"नीरे, समजत नाहींत कां मला तुझ्या मनाच्या यातना ! पण मी तरी काय करूं ? मी भावानंद किंवा विवेकानंद नाहीं म्हणून म्हटलं तें मुळींच खोटं नाहीं. आतांचंच पहा ना. माझं मन मीं स्पष्ट करून सांगितलं तर तुला खरंसुद्धां वाटायचं नाहीं,"

आणि कांहीं वेळ थांबून अगदीं आर्तपणानें त्यांनीं म्हटलें, 'नीरे, तुझा मला आजपर्यंत कितीदां तरी मोह वाटत आलेला आहे. तुझ्या-बद्दलची माझी प्रीति मीं आजपर्यंत अप्रकट राखली असली तरी माझं मन त्या प्रीतीच्या उमाळ्यांनीं अनेकवेळां उचंबळून आलेलं आहे. तुझ्या हालचालींचं, हावभावाचं, बोलण्याचालण्याचं आणि कित्येक अर्धव्यक्त भावनांचं आणि गुणांचं एकट्याशींच चिंतन करीत बसण्यांत मीं तासचेतास घालविले आहेत. मघां मीं चेष्टेनं म्हटलं कीं हा प्रसंग कादंबरींतील कल्पित प्रणयप्रसंगाला अनुकूल आहे म्हणून ! पण ही रात्रीची निःस्तब्ध शांतता, चंद्रप्रकाशाचा उन्मादक संचार, प्रीतीच्या ओढीनं आर्त झालेलीं आपलीं अन्तःकरणं, ही एकांताची खोली, ही शय्या, आणि चंद्रप्रकाशाच्या फिकट छायेंत उठून दिसणारी तुझी शरीरकांति या साऱ्या गोष्टी माझ्या मनाला मोह घालीत आहेत ! तुला जवळ घ्यावी, आपल्या अप्रकट प्रीतीच्या उन्मा-दानं भरून राहिलेलं हृदय तुझ्या हृदयाला मिळवावं, आणि तुझं सारं शरीर अंकित करून त्या आनंदांत तन्मयतेचं असह्य सुख उपभोगावं, असं मला वाटतं ! अगदीं खरंखरं, मनापासून वाटतं !'

' आणि मग त्या प्रेमसंन्यासांतल्या जयंतासारखं म्हणावंसं वाटतं ना, कीं लीले, दूर हो, मन पापी असतं, आणि हा निर्मल बंधुप्रेमाचा ओघ आहे !'

' नीरे, जयंतासारखा मी दुबळाही नाहीं. ज्या जागीं बंधुप्रेम नाहीं, त्या जागीं तें आहे, असा खोटा भास उत्पन्न करून घेणारा मी

स्वप्नाळू कवि नाहीं. माझी तुझ्यावर प्रीति आहे. तुला अंकित करण्याची मला लालसा आहे!'

'मग शिरीष, विनय बाजूला सारून विचारतें, तसं अंकित करायला मी तुम्हाला आडकाठी केली आहे का?'

'हो!'

त्या एकाक्षरी उत्तरानें नीरेला धक्काच बसला. ती चमकली, आणि तिनें आश्चर्यानें विचारलें, 'म्हणजे?'

'तूं मला आडकाठी केली आहेस! आपल्या दोघांच्या आयुष्य-क्रमाची मूस ही एकेकटी इतकी भिन्न स्वरूपाची आहे कीं, तिचा दुस-रीशीं संपर्क करणं अशक्य होईल.'

'कां? अशक्य कां होईल? तुमच्या आयुष्याच्या प्रवाहांत माझं आयुष्य मिसळून द्यायला मी तयार आहे. तुमचें जें ध्येय तेंच माझं! तुमचा जो दिनक्रम तोच माझा! असं मानून वागायला मी तयार आहे.'

'नीरे, तूं प्रामाणिकपणानं या गोष्टी करायला तयार आहेस हें खरं. पण तयार असणं वेगळं आणि प्रत्यक्ष कृतीनं करणं वेगळं. माझा जन्म खडतर हालअपेष्टांत जाणार आहे. खडतर आपत्तींनीं गजबजलेला आयुष्यक्रम दुरून पाह्यला मनोवेधक असतो. त्यांत प्रत्यक्ष सामील होण्यानं तो मनोवेधकपणा तसाच टिकून राहाणं अशक्य होऊन बसतं. संपत्तीची सुखं अनुभवून तुझं शरीर तुझ्या नकळतच विलासी बनलं आहे. त्याला माझ्याबरोबरची कष्टप्रद वाटचाल झेंपायची नाहीं.'

'पण माझ्याबरोबर संपत्तीचीं कांहीं सुखं आपोआपच आलीं तर—'

'समजलों मी तुझ्या बोलण्याचा अर्थ! तुझ्या पित्याची संपत्ति आपल्या उपयोगीं पडेल असं तुझं म्हणणं! पण ती संपत्ति सुखानं अंगीं लावून घेण्यासारखं माझं वर्तन असलं पाहिजे ना! माझ्यासारखे तरुण कार्यकर्ते पाहून तुझ्यासारख्या काव्यबुद्धीच्या मुलींना भावनेच्या

पहिल्या आवेशांत जबरदस्त आकर्षण वाटतं. यांतले कांहीं कार्यकर्ते बापाच्या जीवावर ऐश्वर्यसंपन्न बनलेले असतात, आणि बाहेरून मात्र सर्वसंगपरित्यागी फकिराचा आव आणतात. असली खोटी फकिरी विवाहाला साहाय्यक होते, उत्तेजक होते. माझ्या पाहाण्यांत कांहीं कामगार कार्यकर्ते असे आहेत कीं, जे श्रमपूर्वक मिळविलेल्या संपत्तीचं स्तोम गातात, विनाश्रम मिळालेल्या पैशाचा आणि तो पैसा स्वीकारणाऱ्यांचा जळजळीत निषेध करतात, आणि स्वत: मात्र बापानं वारसाहक्कानं दिलेला मेलेला पैसा मुकाट्यानं स्वीकारून, त्याच्या मोबदल्यांत साऱ्या आपत्तींपासून अगदीं अलग राहातात आणि साऱ्या जगाला केवळ देखावा करून फसवितात! कॉलेजांतल्या खुळ्या मुली त्यांच्या नादीं लागतात, त्यांच्या वरपांगी तत्वज्ञानाला भुलतात आणि त्यांच्यामागें लागून आपल्या आयुष्याचा खेळखंडोबा करतात. असले कार्यकर्ते दुसऱ्याच्या पैशाचा एखाद्या वेळीं अपहार करायलाही मागेंपुढें पाह्यचे नाहींत! असल्या कार्यकर्त्यांनीं केलेलीं लग्नं सुखाचीं होतात तीं ध्येयप्रीतीच्या उन्मादक आनंदानं नव्हेत, तर बापजाद्यांच्या पैशावर केलेल्या विलासांनीं आणि त्यागाच्या दांभिक आचरणानं होतात. नीरे, मला असला दांभिकपणा करायचा नाहीं. माझ्या मनाला कोणत्याही प्रकारानं न फसवितां मला अगदीं प्रामाणिकपणानं जगायचं आहे. मला समजतं कीं, असलं जगणं फार खडतर आहे. किंबहुना तसं जगणं म्हणजे उघड्या डोळ्यांनीं मरणाच्या खाईत उडी घेण्यासारखं आहे! तसल्या आयुष्यांत प्रत्येक क्षणाला मरणाच्या यातना अनुभवावयाच्या असतात. त्या आयुष्यांत मरणाला बरं म्हणविणाऱ्या भयंकर यातनांची घोडदौड एकसारखी थैमान घालीत असते, आणि अनेक वासनांचा आणि भावनांचा चेंदामेंदा करून टाकीत असते. त्या आयुष्यांत शरीर जर्जर होतं आणि मन रक्तानं न्हाऊन निघतं. त्या आयुष्याचं वर्णन, 'where they dig their graves and call them trenches' अशा शद्बांनींच फक्त करतां येतं! असल्या आयुष्याची वाट मी चालायला लागलों आहे. ती वाट तुला झेंपायची नाहीं.

तुझ्या मनाचा उत्साह फार मोठा आहे. पण कष्ट आणि आपत्ति भोगण्याच्या कामीं तुझं मन आणि शरीर हीं दोन्हीं फार दुबळी आहेत. असल्या पंगु माणसाला बरोबर घेऊन धापा टाकीत चालणं मला झेपायचं नाहीं, अशी मला भीति वाटते. माझी भीति आतांपर्यंतच्या अनुभवानं खरी ठरलेली आहे. आजपर्यंत तूं ज्या सुखासीन मार्गावरून पुढं गेलीस त्या मार्गावरून परत फिरण्यांत मौज नाहीं. आपले रस्ते एकरूप नाहींत. समांतर आहेत ! या समांतर रस्त्यांवरून चालतांनाच दुरूनच आपण एकमेकांना उंचउंच हात करून इशारत देत राहूं, आणि आपापले मार्ग प्रामाणिकपणानं चालून गेल्याचा आनंदही अशा इशारतींनंच एकमेकांना कळवूं. नीरे, माझ्याकरितां एवढं कर. माझं तुला तळमळीचं सांगणं आहे. तुझा जिव्हाळा मला दे. नीरे, काय करूं. हातांची ओंजळ उलगडून, तींतून, जमीनीवर पैसे ओतावेत त्याप्रमाणें हृदय उघडून साऱ्या भावना तुझ्यापुढं ओताव्यात असं वाटतं ! पण शब्द सांपडत नाहींत."

'शिरीष, माझं मागणं कांहींही नाहीं. मला तुमची माना. माझं मन आणि शरीर हीं तुमचीं आहेत. एवढी कल्पना सुद्धां मला त्या समांतर मार्गावरून चालंत राह्यला उमेद आणील. मोठ्या आनंदानं मीं माझ्या मनाला सांगत राहीन कीं, 'पहा माझा सहचर त्या समांतर रस्त्यावरून चालला आहे. तो माझं सर्वस्व आहे. तसल्या समजुतींनंही माझं मन एकसारखं हर्षभरित होईल !'

'नीरे, कल्पित कादंबऱ्यांतील समाज हें वागणं आणि प्रेमिकांच्या या विचित्र समजुती मान्य करतो, पण खरा समाज, ज्या समाजांत राहून आपल्याला जगायचं आहे, तो हें मान्य करायला तयार व्हायचा नाहीं, तुझं म्हणणं मला कळतं. लौकिकांतलं लग्नबंधन खऱ्या प्रीतीला काय करायचं आहे, हाच त्या म्हणण्याचा आशय ! पण कायदा, व्यवहार आणि धर्माचार हे जोपर्यंत स्त्रीचं पत्नीत्व आणि मातृत्व हीं मनुष्य निर्मित बंधनांच्या पलीकडचीं आहेत, तीं नैसर्गिक आहेत, निरुपाधिक आहेत आणि तशीं असण्यापुरतींच त्यांची समाजांत व्याप्ति मानावी, हें म्हणणें मान्य करीत नाहींत, त्यावर मंजुरीचं शिक्कामोर्तब करीत

नाहींत तोपर्यंत आमच्या समाजांतील प्रीतीचीं रोपटीं कुंड्या फोडून आकाशाला भिडणाऱ्या मार्गाला लागायचीं नाहींत ! नीरे, गैरसमज करून घेऊं नकोस ! पण मला आपण एकत्र असण्याची कल्पना अशक्य वाटतें आहे ! प्रितीच्या चोरट्या पळवाटा समाजानं राजमार्ग म्हणून सर्वस्वीं मान्य केल्याशिवाय त्यांचा आश्रय करणं हानिकारक आहे, असं मला प्रामाणिकपणानं वाटतं, त्याला मी काय करूं ?'

झपाट्यानें जाग्यावरून उठून नीरा पलीकडच्या खोलींत गेली, तिनें दार बंद करून घेतलें, दाराला वेडीवाकडी कडी अडकविली, आणि आपल्या वळकटीवरच्या उशीवर आपलें तोंड टेकीत असाहाय्य हुंदका दिला, आणि म्हटलें, 'आई आई ग, काय अपराध केला आहे मी ? '

आणि दाराच्या बाहेरच्या बाजूला आपलें डोकें टेकीत, डोळ्यांतलीं आंसवें पुसतां पुसतां शिरीषकुमारांनीं म्हटलें, 'नीरे, तूं अपराधी नाहींस, आणि मी....मीही अपराधी नाहीं ! माझं मन समजावून घे. तुझ्या मजबद्दलच्या जिव्हाळ्यांत अंतर पाडूं नकोस !'

या रुद्ध भाषणाचा प्रतिध्वनि आंतल्या खोलींतून तशाच गहिंवरलेल्या गळ्यानें उमटला !

"मी दुबळी आहे, वेडी आहे."

× × ×

उन्हें पडून गेलीं तरी तीं दोघेंही जागीं झालीं नाहींत.

दारावर खूप खडखडावल्याचा आवाज झाला तेव्हां नीरा जागी झाली. ओचे खोवीत आणि केस सावरीत ती दाराशीं गेली. दार उघडलें तों दाराशीं जगन्नाथ होता. त्याच्या डोक्याला मोठी पट्टी बांधलेली होती आणि त्याचा हात गळ्यांत बांधलेल्या फडक्याच्या सैलसर गांठींत अडकवलेला होता.

नीरेनें चहा तयार केला, तो घेत असतांना त्या तिघांपैकीं कुणीही कांहीं भाषण केलें नाहीं. चहाचा घोट घेऊन जगन्नाथाच्या कपा-

ळावरील पक्षीकडे पाहात शिरीषकुमारांनीं म्हटलें, 'एकूण काल शांतता टिकली नाहीं तर ! कालचा दिवस साऱ्या अपेक्षा फोल ठरविणाराचा होता म्हणायचा !'

आणि त्यांनीं पुन्हां चहाचा घोट घेतला. नीरेच्या हातांतील पेला थरथरत होता. आंसवांनीं भरलेली तिची दृष्टि शिरीषकुमारांच्या गळ्यापासून कपाळाच्या वरच्या क्षितिजापर्यंत काळवंडलेल्या भागावर खिळलेली होती. तिचे ओठ थरथरत होते.

इतक्यांत दाराशीं तारवाल्यानें तार आल्याची इशारत दिली. नीरेचें नांव घेऊनच त्यानें हाक मारली होती.

हातांतील भरलेली कपबशी खालीं ठेवतांना वेडवाकडी होऊन हिंदकळली, तिकडे दुर्लक्ष करीत नीरा तार घ्यावयास गेली.

तारेंत लिहिलें होतें,

आई अत्यवस्थ आहे. ताबडतोब ये. एन्. व्ही. जोग.'

तार वाचून नीरेनें ती शिरीषकुमारांच्या हातीं दिली. त्यांनीं ती वाचून नीरेकडे नुसतें पाहिलें !

तिनें म्हटलें 'जातें मी !'

आणि त्यांनीं मानेनेंच होकार दर्शविला.



## प्रकरण २२ वें

# 'भृंगा ! हृदय न मम कळलें !'

——:०:——

टांग्यांतून उतरून नीरा घरांत शिरली, तेव्हां ओसरीवरच टांगलेल्या पिंजऱ्यांतल्या त्या पोपटानें जागच्याजागीं पंखांचा फडफडाट करीत आपली चोंच वासून जोरजोराचा चीत्कार केला. जणूं अनेक दिवसांच्या सांठलेल्या आठवणी त्याला तिला सांगायच्या होत्या. सांगाण्याकरितां शब्द सांपडत नव्हते म्हणूनच जणूं तो बंदिस्त पक्षी आपली चोंच दिनवाणेपणानें वासून सारे प्राण गोळा करून आर्त स्वरानें चीत्कार करीत होता. नीरेला हाताला धरून घरांत न्यावें, आणि सारा अनर्थ तिला प्रत्यक्ष दाखवावा म्हणूनच जणूं बिचाऱ्याच्या शरीराचा दुर्दमनीय फडफडाट चालला होता !

ती आंत गेली, सर्वत्र सामसूम होती, माजघरांत आणि माडीवर ती जाऊन आली तरी सर्वत्र शांतता होती. वडिलांच्या खोलींत तिनें डोकावून पाहिलें तों, तिचे वडील स्तब्ध बसून अश्रू ढाळीत असल्याचें तिला आढळून आलें. ती पुढें झाली, तिच्याकडे वडिलांनीं पाहिलें. त्यांनीं एक अवाक्षरही केलें नाहीं. मात्र त्यांच्या डोळ्यांतून गळणारी आसवांची धार अधिक स्निग्ध झाली. 'काय झालं हें !' अशी खूण करणारा हात त्यांनीं नीरेला उद्देशून केला, आणि आपले तोंड फिरविलें.

× × ×

दुपारीं नीरा आपल्या खोलींत अस्वस्थपणानें येरझारा घालीत होती. फोनोग्राफचें यंत्र, निरानिराळ्या गाण्यांच्या तबकड्या, आईनें भरलेला मोर, टेबलावर अंथरलेला आईच्याच हातचा विणलेला रुमाल,

पलंगावरच्या उशीचा तिनें शिवलेला अभ्रा आणि त्यावर नीरेनें मुद्दाम काढून दाखविलेल्या अक्षराबरहुकूम निळया रेशमाच्या धाग्यानें विणलेले. ‘ Remember me ’ हे शब्द, इत्यादि सर्व गोष्टी तिच्या दृष्टीपुढून वरचेवर सरकत होत्या. तिची खोली, ती गेली त्या दिवसासारखीच अगदी सज्ज राखलेली होती. आरशावरसुद्धां धुळ बसलेली नव्हती. टेबलाच्या वरच्या अंगाला टांगलेल्या आईच्या फोटोकडे पाहात नीरेनें म्हटलें, ‘आई, तुझी मुलगी स्वार्थी आहे, दुबळी आहे. काल माझी शेवटची भेट घेण्याकरितां तुझे प्राण इकडे कासावीस होत होते, त्यावेळीं आपली प्रणयपूर्ति व्हावी म्हणून मी प्राण पाखडीत होते. आई, तूं माझी वाट पाहात होतीस म्हणून बाबांनी सांगितलं स्वार्थीपणाचा खेळ खेळण्यांत मी रमून गेलें, आणि तुझ्यापासून दूर राहिलें. चूक झाली माझी...’

इतक्यांत मागून पावलांची चाहूल आली, म्हणून तिनें वळून पाहिलें. तिच्या दोन्ही खांद्यावर हात टेकीत तिच्या वडिलांनीं म्हटलें,

“नीरे, तिनं तुला निरोप सांगितला आहे. लग्न कर आणि सुखी हो.”

× × ×

आणि काळाच्या अखंड वाहत्या प्रवाहानें नीरेच्या आयुष्यांत हाही एक तरंग निर्माण केला ! त्या तरंगानें तिचें स्वरूप पार पालटलें होतें !

बेळगांवच्या टिळकवाडींतल्या ‘ व्हॅक्सीन डेपो ’ च्या मागच्या गल्लीतल्या एका बंगल्यावर ती पाटी होती. पूर्णिमेच्या चंद्रप्रकाशांत त्या पाटीवरील अक्षरें स्वच्छ उठून दिसत हाती. ‘ डॉ. मनोहर श्रीपाद घाणेकर एम्. बी. बी. एस. ’ त्या पाटीच्याखालींच दुसरी एक लहानशी पाटी होती. तिच्यावर लहान लहान डौलदार अक्षरांनीं लिहिलें होतें, ‘सौ. नीराबाई घाणेकर, बी. ए.’ आणि त्या चंद्रप्रकाशांत बंगल्याच्या पुढल्या बागेंतल्या बाकावर डॉ. घाणेकर व सौ. घाणेकर अशीं दोघेंजण बसलीं होतीं.

डॉक्टर नीरेच्या पुढ्यांत गवसणींतून काढलेला दिलरुबा ठेवीत होते. त्याच्याकडे पाहातां पाहातां तिला मागल्या आयुष्यांतली पुसट दृश्यें दिसत होतीं. विजेच्या पंख्याचें फिरणें थांबवावें म्हणून बटन दाबून तो बंद केला, तरी त्याच्या गिरक्या कांहीं वेळ तशाच टिकून राहातात! प्रत्यक्ष प्रसंग घडून गेल्यावर त्याचीं आंदोलनेंही मनांत अशींच किती वेळ तरी होत असतात! तिच्या लग्नानिमित्त स्वतःच्या दिलरुब्याची ही भेट शिरीषकुमारांनीं मुद्दाम पाठविली होती.

डॉक्टर म्हणत होते, "बाबांनीं मला सांगितलं कीं, तूं दुहेरी पदवीधर आहेस म्हणून!"

आणि कांहीं वेळानें त्यांनीं पुन्हां म्हटलें, "लाहोर–अमृतसरपर्यंत जाऊन दिलरुबा वाजविण्यांत तूं बक्षीस मिळविलेंस आणि गाणें म्हणून पदवी मिळविलीस! ती पदवी तूं ज्या गुणावर मिळविलीस, तो आपल्याला तर कांहीं अजून दिसला नाहीं बुवा! असा चंद्रप्रकाश पडलेला, गार वारा वाहातो आहे, बागेतलीं हीं सारीं फुलझाडं त्या वाऱ्यानं डोलताहेत हें सारं पाहून त्या फुलझाडांचा मला मत्सर वाटतो. मला डोलवयाला लावणाऱ्या स्वरलहरी.........."

नीरेनें आपल्या मनाला सांवरलें!

तिनें दिलरुबा सरसावून धरला आणि वाजविण्यास सुरवात केली. दिलरुब्याच्या सुरांत सूर मिळवून ती म्हणत होती,

**मोहविण्या मम झटसी! भृंगा। हृदय न मम कळलें।**
**भृंगा। हृदय न मम कळलें॥**

ती गाणें म्हणत होती, आणि तिच्या मनांत येत होतें,

'सारें जग म्हणजे एक प्रदर्शन आहे, आणि त्यांतील माणसांचे व्यवहार प्रदर्शनांतील फेराच्या लांकडी चित्रावर फेर धरणाऱ्या लहान मुलांसारखे चालू आहेत! कुणी घोड्यावर बसतात, कुणी हत्तीवर बसतात,

कुणी बांकावर बसतात, आणि कळीची किल्ली संपेपर्यंत त्या फेरांत एकसारख्या गिरक्या घेत राहातात. किल्ली संपेपर्यंत गिरक्या घेतल्या पाहिजेत. घेरी आली तरी गिरक्या घेतल्या पाहिजेत.'

तिची दृष्टी डॉक्टरांच्या चेहऱ्यावर खिळली होती. त्यांच्या गळ्या-पासून कपाळाच्या वरच्या भागापर्यंतचा काळवंडलेला भाग ती अनिमिष दृष्टीनें पाहात होती !

आणि दिलरुब्याच्या स्वरलहरींचा अखंड स्रोत उठत असतांना ती म्हणत होती,

'मोहविण्या मज झटसी ! भृंगा । हृदय न मम कळलें ।
भृंगा । हृदय न मम कळलें ।

---